


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








ISSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

जानेवारी ते मार्च २०२०

## २३ एप्रिल जागतिक पुस्तक दिन

## पुस्तकं सांगतात गोष्ट

वाहून गेलेल्या दिवसांची, युगायुगांची, विश्वाची,
माणसाची, आजची, कालची, उद्याची, एका-एका क्षणाची.
झाड हिरव्या पानांनी सळसळावं अशा सुखाची
निष्पर्ण फांदीच्या एकाकीपणासारख्या दु:खाची
वाऱ्यावर झुलणाऱ्या रंगीत फुलाची, युद्धात आईबाप मेलेल्या मुलाची
जिंकलेल्या रणाची, हरलेल्या मनाची, प्रेमाची, द्वेषाची,
श्वासाचीही पुस्तकं सांगतात गोष्ट.
मग ऐकणार ना गोष्टी पुस्तकांनी सांगितलेल्या?
पुस्तकं काही सांगू इच्छितात, तुमच्या सावलीत रांगू इच्छितात.
पुस्तकात पक्ष्याची चोच बोलते, पुस्तकात हिरवंगार रान हलते,
पुस्तकात असतो झऱ्याच्या पाण्याचा अवखळपणा
पुस्तकात दिसतात पऱ्या बागडतांना
पुस्तकात असतो क्षेपणास्त्रांचा विध्वंस
काळ्या कृत्यात बुडालेला महाभारतातला कंस
पुस्तकातल्या शब्दांना करुणेची झाक आहे
सर्वे संतु निरामय विज्ञानाची हाक आहे
पुस्तक म्हणजे वसुधैव कुटुंबकम्, आयुष्य पथावरचा नया कदम
मग येणार ना तुम्ही ह्या रस्त्यावर चालण्यासाठी?
छे हो ! वाट मुळीच अवघड नाही,
रस्त्यावरून चालताना आपण दुकानावरच्या पाट्या वाचतो
तेवढ्या सहज पुस्तकं वाचायची बस !
अहो वाचायला तर लागा म्हणजे पोहचायला लागाल. हव्या त्या ठिकाणी.
पुस्तकं काही सांगू इच्छितात, तुमच्या सावलीत रांगू इच्छितात.



दासू वैद्य
(सफदर हश्मी यांच्या कवितेचा भावानुवाद)

अनुक्रमणिका













मराठी भाषा दिनानिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा सावेडी उपनगर व शांतीकुमारजी फिरोदिया मेमोरियल फाऊंडेशन आयोजित अहमदनगर येथे प्रथमच संपन्न झालेले बालकुमार साहित्य संमेलन उस्फूर्त सहभागाने रंगतदार झाले. संमेलन अध्यक्ष ल.म.कडू, मसापचे नरेंद्र फिरोदिया, जयंत येलूलकर व अनेक मान्यवर उपस्थित होते.



महाराष्ट्र साहित्य परिषद आणि 'शब्दसारथी' यांच्या संयुक्त विद्यमाने मराठी भाषा दिनानिमित्त आयोजित करण्यात आलेल्या हस्ताक्षर-अभिवाचन स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ.




महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र.३६९, जानेवारी-मार्च २०२०

संपादक
**डॉ. पुरुषोत्तम काळे**

संपादन समिती
**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी**
**डॉ. भास्कर ढोके । डॉ. रणधीर शिंदे**
**डॉ. वर्षा तोडमल**

प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.
दूरभाष । ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ । www.masapapune.org
ई-मेल । masaparishad@gmail.com

कार्यालयाची वेळ ।
सकाळी ९.०० दुपारी १२.००
दुपारी ४.३० ते रात्री ८.००



अनुक्रमणिका




▮ मुद्रक-प्रकाशक
प्रकाश पायगुडे
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०

▮ जाहिरात व्यवस्थापक
वि. दा. पिंगळे
९८८१२३५०३३

▮ संपादकीय संयोजन
संदीप खाडे

▮ अक्षरजुळणी व सजावट
लक कलाकल्य

▮ मुखपृष्ठ
जयदीप कडू

▮ मुद्रितशोधन
आरती देवगांवकर

▮ मुद्रणस्थळ
एस. ए. प्रिंटर्स, एल. एल. पी.
फ्लॅट नं. ५, ३ रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९

मूल्य : १५ रुपये

▮ प्रकाशन क्र. ३६९
जानेवारी- मार्च २०२०





# अंतरंग


- संपादकीय : सावध ऐका पुढल्या हाका...
  पुरुषोत्तम काळे । ३

▫ भाषण

- समीक्षा वाचण्याची जिज्ञासा साहित्यप्रेमींमध्ये वाढली तरी आपल्या सांस्कृतिक जाणिवा प्रगल्भ होतील ! । रेखा इनामदार- साने । ५
- मराठी साहित्याची समृद्धता, बोली आणि विविधतेच्या परंपरांमुळे । डॉ. किसन पाटील । १३

▫ समीक्षा

- मराठी कादंबरीचे बदलते स्वरूप: एक अवलोकन
  डॉ. अरुण कोळेकर । १७
- ज्ञानदेव व ज्ञानेश्वरीविषयक अभ्यासाची परंपरा
  डॉ. शिरीष लांडगे । २४
- समाजपरिवर्तनातील संतांचे योगदान । डॉ. सुधाकर शेलार । ३०

▫ लेख

- साहित्यातील स्त्रीवाद । डॉ. तुकाराम रोंगटे । ३२

▫ परीक्षण

- नदीष्ट-ही तुमच्या-माझ्या पॉलिटिक्सची गोष्ट । रवि आमले । ४०
- भेद्य-अभेद्य । डॉ. उषा तांबे । ४४
- शालोम : प्रतिमेतून प्रतीकाकडे । डॉ. सुधीर देवरे । ४६
- असो आता चाड : अधांतरी जगण्याचे आक्रंदन।
  मनोहर सोनवणे । ५१
- मानवी जीवनातील वाताहतीची 'यसन'। प्रेमसागर राऊत । ५४
- कार्यवृत्त । दीपक करंदीकर । ५६


अनुक्रमणिका



संपादकीय

# सावध ऐका पुढल्या हाका...

हे संपादकीय लिहीत असताना देशात आणि महाराष्ट्रात 'कोविड-१९' या कोरोना विषाणूचा प्रसार होत आहे. यावर सरकारने प्रतिबंधात्मक-आदेश काढून या विषाणूचा मुकाबला कसा करायचा याबाबत-मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. सर्व सरकारी आस्थापने, विद्यापीठे आणि सार्वजनिक गर्दीची ठिकाणे बंद करण्यात आलेली आहेत. सर्व कार्यक्रम अनिश्चित काळासाठी पुढे ढकलण्यात आलेले आहेत. ही अभूतपूर्व अशी जागतिक साथ असून राष्ट्रीय आपत्ती आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सर्व जाहीर कार्यक्रम रद्द करण्यात आलेले आहेत. तसेच काही कार्यक्रम पुढे ढकलण्यात आलेले आहेत. सर्व नागरिकांनी या काळात विषाणूचा प्रसार होऊ नये म्हणून अधिकृत आरोग्य अधिकाऱ्यांच्या सूचनांचे पालन करावे आणि या महासाथीचा मुकाबला धैर्याने करावा.

लेखक साहित्यातून त्यातही कादंबऱ्यांमधून कल्पित-वास्तवाची निर्मिती करीत असतात. त्यांनी कादंबऱ्यांतून उभे केलेले कल्पित वास्तव हुबेहुब वास्तवासारखे वाटते. लेखकाने आपल्या-प्रतिभेने उभे केलेले; पण संभाव्य वाटणारे हे कल्पित वास्तव जेव्हा कालौघात खरे वास्तव म्हणून अवतरते, घडते तेव्हा वाचक लेखकाच्या द्रष्टेपणाने स्तिमित होतो. अमेरिकन कादंबरीकर डीन कुंट्झ यांनी लिहिलेल्या, १९८१ साली प्रकाशित झालेल्या 'द आईज ऑफ डार्कनेस' (The eyes of darkness) या कादंबरीत आज जगात वेगाने पसरणाऱ्या या महाभयानक साथीचे संसूचन केले होते. जैविक युद्धामध्ये वापरण्यात येणारा विषाणू चिनी प्रयोगशाळेत तयार केला जातो. 'ली चेन' हा वैज्ञानिक हे भयानक जैविक अस्त्र घेऊन अमेरिकेचा आश्रय घेतो. पर्वतारोहण करायला गेलेला आपला मुलगा, डॅनी गमावलेली ख्रिस्तिना इव्हान्स आणि डॅनीला नक्की काय झाले याचा तिने घेतलेला शोध हे या कादंबरीचे मुख्य कथानक आहे. कुंट्झ यांनी 'वुहान-४००' या वुहान शहराबाहेरील प्रयोगशाळेत तयार केलेल्या विषाणूचे वर्णन आणि सध्या आलेली कोरोना विषाणूची साथ यातील साम्यस्थळे स्तिमित करणारी आहेत. अर्थात ही कल्पित भविष्यवाणी तंतोतंत खरी नाही. कोविड-१९ हा वुहान-४०० या विषाणू इतका विषावतता पसरवणारा, उत्पात घडवणारा नाही. कुंट्झ यांनी वर्णिलेला विषाणू हा १००% धोकादायक आहे, तर कोविड-१९ चा मृत्यूदर २% आहे. अशीच कल्पित भविष्यवाणी सिल्व्हिया ब्राऊनी या लेखिकेने 'एंड ऑफ डेज : प्रेडिक्शनस् अँड प्रॉफेसिज् अबाऊट द एड ऑफ द वर्ल्ड' या २००८ साली प्रकाशित झालेल्या पुस्तकात, २०२० साली तीव्र स्वरूपाचा न्युमोनियासारखा आजार जगात पसरेल आणि त्याने फुफ्फुसे, वायुकोश यांना संसर्ग होईल. फुफ्फुसे निकामी होतील. हा आजार कोणत्याही प्रचलित औषधांना दाद देणार नाही, अशी भविष्यवाणी वर्तवली होती. या 'फिक्शन प्रॉफेसिज', अगदी तंतोतंत खऱ्या ठरत नाहीत हे मानवजातीचे सुदैवच ! कोविड-१९ वर लस आणि परिणामकारक औषधे लवकरच शोधली जातील अशी खात्री आहे. प्रख्यात कादंबरीकार आणि वैज्ञानिक आर्थर सी क्लार्क यांनी १९४५ भूस्थिर उपग्रहाबाबत भाष्य केले. पुढे १९५७ साली रशियाने 'स्पुटनिक' हा भूस्थिर उपग्रह सोडला. कार्यालयात न जाता घरून काम करता येणे आणि



अनुक्रमणिका

पृथ्वीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत तात्काळ संपर्क साधता येणे हे क्लार्क यांनी वर्तविलेले अंदाज आज तंतोतंत खरे ठरले आहेत.

वास्तवाचा अर्थ लावून आगामी काळाबद्दल अंदाज बांधणे हे कादंबरीकारच करतात असे नाही, तर विचारवंतही करतात. अशा दोन विचारवंतांचे नुकतेच निधन झाले. स्त्रियांच्या हक्कांसाठी नारी समता मंच, सखी मंडळ, मिळून साऱ्याजणी हे नियतकालिक आणि अक्षरस्पर्श ग्रंथालय या संस्थांमार्फत आयुष्यभर कार्यरत राहणाऱ्या विद्या बाळ यांचे निधन ३० जानेवारी २०२० रोजी झाले. ज्येष्ठ पत्रकार, माजी संपादक, प्रभावी वक्ते आणि अभ्यासू राजकीय विश्लेषक अनंत दीक्षित याचे ९ मार्च २०२० रोजी निधन झाले. पुरोगामी विचार आणि प्रचलित वास्तवाचे अर्थनिर्णयन करून समाजजीवनाला दिग्दर्शन करण्याची असामान्य क्षमता ही या दोन्ही विचारवंताची वैशिष्ट्ये होत. विद्या बाळ, अनंत दीक्षित आणि समाजाचे आरोग्य प्रबोधन करणारे धन्वंतरी पूण्यभूषण डॉ. ह. वि. सरदेसाई यांना म.सा.परिषद आणि म. सा. पत्रिका यांच्याकडून भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण करतो.

उस्मानाबाद येथे झालेले ९३ वे अ. भा. म. सा. संमेलन नीटनेटकेपणाने आणि कमी खर्चात पार पडले. संमेलनाध्यक्ष मा. फादर फ्रान्सिस दिब्रिटो यांचे संयत भाषण आणि त्यांनी प्रतिपादिलेले चार पातळ्यांवरील संवादसूत्र हे त्यांच्या भाषणाचे वैशिष्ट्य. मराठी भाषेबद्दलचे सकारात्मक चित्र त्यांनी उभे केले. सातत्याने होणारी साहित्य संमेलने ही त्याची निदर्शक आहेत. 'भाषा ही धर्माधारित नसते' हे त्यांनी अनेक उद्धातांतून स्पष्ट केले. संमेलनाला आणि संमेलनाध्यक्षांना विरोध असताना संयत संवाद प्रकियेचा वापर करून संमेलन यशस्वी करणारे अ.भा.म.सा. मंडळाचे अध्यक्ष डॉ. कौतिकराव ठाले पाटील, महामंडळाचे सर्व सदस्य आणि संयोजन समितीचे अभिनंदन!

या अंकामध्ये म. सा. परिषदेच्या समीक्षा संमेलनाच्या अध्यक्ष रेखा इनामदार-साने यांच्या अध्यक्षीय भाषणाचा उत्तरार्ध, ख्यातकीर्त बोलीभाषा-अभ्यासक डॉ. किसन पाटील यांच्या बोली भाषा संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणाचा संपादित अंश प्रकाशित करीत आहोत. डॉ. कोळेकर, डॉ. शिरीष लांडगे, डॉ. सुधाकर शेलार, डॉ. तुकाराम रोंगटे यांचे लेख, 'यसन', 'नदिष्ट' या कादंबऱ्यांचे आणि 'असो आता चाड', 'शालोम' या काव्यसंग्रहांचे परीक्षण-लेख ही या अंकांची वैशिष्ट्ये आहेत.

महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री आणि राज्य सरकारचे मनःपूर्वक आभार! शेवटी करोना या विषाणूच्या महासाथीबरोबरच समाजात असलेल्या धर्म जाती-धर्म भेदाच्या विषाणूचा निग्रहाने मुकाबला करू या. भयावर मात करून खऱ्या अर्थाने निरोगी समाजनिर्मितीसाठी प्रयत्नशील राहू या.

महाराष्ट्र राज्य सरकारतर्फे देण्यात येणारा 'विंदा करंदीकर जीवनगौरव पुरस्कार' ज्येष्ठ कवयित्री मा. अनुराधा पाटील यांना जाहीर झाला, प्रकाशन संस्थेला देण्यात येणारा 'श्री. पु. भागवत पुरस्कार' पुण्यातील पद्मगंधा प्रकाशनाला जाहीर झाला आणि 'कविवर्य मंगेश पाडगावकर भाषा संवर्धक पुरस्कार' मा. अनिल गोरे यांना जाहीर झाला. मा. अनुराधा पाटील मा. अरुण जाखडे आणि मा. अनिल गोरे यांचे मनःपूर्वक अभिनंदन!

दहावीपर्यंत मराठी सक्तीचा निर्णय मा. मुख्यमंत्री उद्धवजी ठाकरे यांच्या महाविकास आघाडी सरकारने घेतला. मा. मुख्यमंत्री आणि राज्यसरकारचे मनःपूर्वक आभार!

मुखपृष्ठावर छापण्यात आलेल्या सफदर हश्मी यांच्या कवितेचा भावानुवाद प्रसिद्ध कवी दासू वैद्य यांनी केला आहे. ती वापरण्यास परवानगी दिल्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार!

---

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

---

(हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



अनुक्रमणिका



भाषण

# समीक्षा वाचण्याची जिज्ञासा साहित्यप्रेमींमध्ये वाढली तरी आपल्या सांस्कृतिक जाणिवा प्रगल्भ होतील !

**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा धुळे यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित समीक्षा संमेलनाच्या अध्यक्ष डॉ. रेखा इनामदार- साने यांच्या अध्यक्षीय भाषणाचा उत्तरार्ध.**

**डॉ. रेखा इनामदार-साने**

कोणत्याही कलेच्या समीक्षेविषयी आणि समीक्षकांविषयी साधारणपणे काही (गैर)समजुती समाजामध्ये प्रचलित आहेत. त्यांचे यथाशक्ती, यथामती निराकरण याठिकाणी करणे इष्ट ठरेल. यांपैकी पहिली गैरसमजूत म्हणजे कलावंत म्हणून जे अपयशी ठरतात अथवा स्वतंत्र निर्मिती करण्याची क्षमता ज्यांच्या ठिकाणी कमी असते किंवा नसते ते समीक्षेकडे वळतात कारण कलावस्तू निर्मिण्यापेक्षा कोणीतरी आधीच घडविलेल्या कृतीवर अभिप्रायात्मक बरे-वाईट वक्तव्य करणे, लिहिणे केव्हाही सोपे असते. त्यामुळे या क्षेत्रात सुलभपणे प्रवेश होतो आणि थोडीफार का होईना; परंतु प्रतिष्ठाही मिळते. वेळोवेळी लिहिलेल्या स्फुट लेखांचा एखाद दुसरा संग्रहही प्रकाशित होतो. नशीब जोरावर असले, तर त्या संग्रहाला दोन- तीन पुरस्कारांचा कृपाप्रसादही लाभू शकतो. आणखी काय हवे? किंबहुना ही समजूत प्रबळ असल्याने 'समीक्षक'हा हेटाळणीचा, तुच्छतेचाच नव्हे तर चेष्टेचाही विषय बनलेला दिसतो.

वस्तुतः व्यावहारिक अनुभव कलानुभवात संक्रमित करण्यासाठी लागणारी प्रतिभा आणि तिच्यातून प्रक्षेपित होणाऱ्या सौंदर्यदर्शनाची कारणमीमांसा करणारी समीक्षकांच्या ठायी असणारी परिणतप्रज्ञ तर्कशक्ती या दोन क्षमता एकमेकींपेक्षा पूर्णतः भिन्न आहेत. आजही प्रमाण मानल्या जाणाऱ्या भरतमुनीकृत 'नाट्यशास्त्र'मध्ये नाट्यप्रयोगातील गुण-दोष (म्हणजे सिद्धी व घात) पारखण्यासाठी समीक्षकाला समानार्थी 'सिद्धीलेखक' व 'प्राश्निक' अशा संज्ञा योजल्या आहेत. सिद्धीलेखक हे गुणज्ञ, रसिक, सहृदय व कुशल असावेत. सिद्धी व घात यांच्या आधारे नाटकाचे परीक्षण करून संबंधित नाटकमंडळींस त्यांनी पताका विजयचिन्ह द्यावे; पण त्यांच्यामध्ये काही कारणाने वाद झाला, तर ज्ञानी व मर्मज्ञ प्राश्निकांनी सिद्धी लेखकांशी सल्लामसलत करून त्या नाट्यप्रयोगाच्या दर्जाविषयी अंतिम निर्णय द्यावा. ते निर्लोभी, निःपक्षपाती व विद्वान असावेत. तसेच त्यांना अभिनय, गायन, वादन, रीतिरिवाज व भाषा यांचे पूर्ण ज्ञान असावे, अशा अपेक्षा भरताने व्यक्त केल्या आहेत. त्यातून समीक्षकाच्या पात्रतेची कल्पना येते.

उलट माणसाचा निसर्गाशी, समाजाशी आणि स्वतःशी जो संवादी वा विरोधी संबंध असतो त्यातून जे पेच, जे ताण उत्पन्न होतात किंवा निखळ आनंदमयता आसमंतात भरून राहाते अशी प्रतिसृष्टी कोणताही कलावंत आपल्या माध्यमावर पकड ठेवून मूर्त करीत असतो, तर त्या प्रतिसृष्टीला साकार करणाऱ्या घटकांकडे समीक्षक वाचकांचे लक्ष वेधत असतो. त्या घटकांचे परस्परसंबंध, त्यांची वीण तो उलगडून दाखवतो. उकल करण्याची ही प्रक्रिया, तिच्यातील अंधाऱ्या काना-कोपऱ्यांसकट, समजावून घेणे ज्यांना महत्त्वाचे वाटते, त्यांना जाणतेपणाचे, प्रगल्भतेचे मोल उमगलेले असते, त्यांना साहित्यसमीक्षेची गरज वाटते. त्यासाठी वाचकाकडे जिज्ञासा, ज्ञानलालसा असावी लागते; पण दुसरा समज असाही आहे की, समीक्षा म्हणजे कलावस्तूचे विच्छेदन, ते कशासाठी करायचे उलट अशा तऱ्हेच्या अव्यापारेषु व्यापारातून ज्या सौंदर्याने वाचकाचे भान



अनुक्रमणिका



हरपलेले असते. त्या सौंदर्याची हानी होते, म्हणून बौद्धिक काथ्याकूट, चर्वितचर्वण न करता केवळ त्या सौंदर्यानुभवात तल्लीनतेचा अनुभव घेणे, त्यात रमून जाणे बरे अशी ज्यांची भावना असते (आणि बहुसंख्य लोकांची तशी ती असते. त्यामुळे गावातल्या कितीतरी ग्रंथालयांमध्ये आणि पुस्तकविक्री करणाऱ्या दुकानांमध्ये, ग्रंथ प्रदर्शनांमध्येसुद्धा कथासंग्रह, कादंबरी, नाटक, काव्य आणि चरित्र-आत्मचरित्र असे विभाग असतात; समीक्षेला यामध्ये स्थानच नसते. कारण समीक्षा का, कशाला वाचायची? ती नाहीतरी साहित्याश्रयी असते मग साहित्य वाचून त्याचा जमेल तेवढा ब्रह्मानंदसहोदर आनंद घ्यावा आणि तो विषय संपवावा.) त्यांना समीक्षेची आवश्यकता मुळात जाणवत नाही. वस्तुतः कोडे घालणे जितके बुद्धीला धार लावणारे तितकेच ते सोडवणे आणि ते सोडवण्याच्या वेगवेगळ्या रीतींचा शोध घेऊन त्या आत्मसात करणे हे ही आव्हानात्मक असते. ज्यांना याचे मूल्य अधिक आहे, असे वाटते त्यांना साहित्य व्यवहारातील समीक्षेचे स्थान पटवून द्यावे लागत नाही किंवा बजावूनही सांगावे लागत नाही. ते आपसूक, स्वाभाविकपणे समीक्षा वाचतात, धडपड करून ती उकल समजावून घेण्यासाठी आपले आकलन व आस्वाद डोळस व्हावा यासाठी नेटाने प्रयत्न करतात.

खरे तर वाचकच नव्हे तर कोणत्याही लेखकाला निःस्पृह समीक्षक साहाय्यकारी ठरू शकतो. या दृष्टीने (संपादक म्हणून मोठा नावलौकिक कमावलेल्या) श्री. पु. भागवतांनी असंख्य लेखक-लेखिकांच्या साहित्यकृतींवर केलेली संस्करणे, त्यांच्याशी अथकपणे केलेल्या चर्चा, पत्रव्यवहार ही बारकाईने केलेली समीक्षाच होती. त्यांच्याशी झालेल्या संवादातून आपल्या साहित्यकृतीला कसे 'चार चाँद' लागले, त्यामुळे अर्थांची अनेकानेक वलये कशी विस्तारत गेली याचे ऋणनिर्देश विद्याधर पुंडलिक, श्री. दा. पानवलकर, प्रभाकर पेंढारकर, आशा बगे, गौरी देशपांडे, अंबिका सरकार, सानिया, प्रभाकर पाध्ये, विजय तेंडुलकर व महेश एलकुंचवार यांसारख्या कितीतरी मातब्बर साहित्यिकांनी केले आहेत. श्री. पु. भागवतांसकट राम पटवर्धन, रामदास भटकळ, अनंत व आनंद अंतरकर, केशवराव कोठावळे हे रूढ अर्थाने समीक्षक नव्हते, ते संपादक होते; परंतु ललित साहित्याची गुणवत्ता व कसदारपणा पारखण्याची दृष्टी त्यांच्या ठिकाणी असल्याने, उत्तमोत्तम साहित्यकृतींचा जन्म झाला. विजया मेहतांसारख्या नावाजलेल्या रंगकर्मी दिग्दर्शक, अभिनेत्रीचे के. नारायण काळे व गो. के. भट यांच्याशी अत्यंत सलोख्याचे संबंध होते. संस्कृत नाटकांचे पुनरुज्जीवन करताना त्यांच्याशी केलेल्या चर्चा अतिशय उपयुक्त ठरल्याचे विजयाबाईंनी वेळोवेळी नमूद केले आहे. साद-प्रतिसादाच्या या पोषक वातावरणामुळे कौटुंबिक परिस्थिती हलाखीची, प्रतिकूल असली तरी चि. त्र्यं. खानोलकरांसारख्या लेखकाच्या प्रतिभेला नवे धुमारे फुटले जे आजही रसिकांच्या व समीक्षकांच्या मनात पूर्वीइतकेच ताजे व टवटवीत आहेत. तरुण मुलांना आजही 'एक शून्य बाजीराव'मधील असंगततेवर आवर्जून बोलावेसे वाटते. संदेश कुलकर्णी यांना 'कोवळी उन्हे' (लेखक विजय तेंडुलकर) या स्तंभलेखनाला नाट्यरूप द्यावेसे वाटले हे कशाचे निदर्शक आहे? सतीश आळेकरांचे 'महानिर्वाण' हे नाटक नव्या संचात (२०१९) रंगभूमीवर सादर झाले. यानिमित्ताने त्यावर पुन्हा एकवार; पण कालौघात समीक्षेच्या पालटत गेलेल्या परिप्रेक्षातून पाहिले गेले, तर त्या कलाकृतीचे कितीतरी नवे पैलू प्रकाशात येऊ शकतात. अशा तऱ्हेने या साहित्यकृतींचे केवळ पुनरुज्जीवन नव्हे तर पुनर्मूल्यांकनही करण्याची संधी प्राप्त होते. असे घडले, तर ते लेखकालाही समाधान देणारे ठरते आणि त्यामुळे समीक्षेतील नव्या प्रवाहाचा वाचकांना, वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांना, प्राध्यापकांना व काही वेळा अभ्यासकांनाही व्यवस्थित परिचय होतो. ह्या परिचयाचे रूपान्तर पुढे त्या पाण्यात स्वतः उतरण्यामध्ये होऊ शकते. अपरिचित प्रवाहात बुडी मारून त्या पाण्याचा तळ गाठणे प्रत्येकाला जमेल, असे अजिबात नाही; पण किमान त्याच्या खोलीचा अंदाज तर बांधता येईल. आतापर्यंत ज्ञात नसलेले काही गवसेल ही शक्यता तर सदैव आहेच, मग ती का नाकारायची ? मात्र त्यासाठी न कचरता समीक्षकाने साहस करायला हवे. चक्रावून टाकणाऱ्या प्रश्नांच्या भोवऱ्यातून नाकातोंडात पाणी न जाता, न गुदमरता नीट श्वास घेऊन सुखरूप बाहेर पडण्यासाठी सारे धैर्य एकवटावे लागेल; परंतु स्वतःला अजमावून पाहण्याची संधी देणारा हा अनुभव खूप काही शिकवून जाईल, हे निश्चित. त्यासाठी काठावर सुरक्षितपणे बसण्यात धन्यता मानण्याची वृत्ती मात्र सोडायला हवी.

'समीक्षे'विषयी आणखी एक समज समाजामध्ये रूढ आहे, त्यात अंशतः तथ्य असल्याने मी त्याला 'गैर' म्हटलेले नाही. सामान्य लोक समीक्षा वाचत नाहीत. त्या ग्रंथांना स्पर्शसुद्धा करीत नाहीत, 'समीक्षक' म्हटल्या जाणाऱ्या व्यक्तींच्या जवळपास फिरकत नाहीत कारण हे प्रकरण अति क्लिष्ट, दुर्बोध, कठीण, डोक्याला (उगाचच) ताप देणारे व म्हणून कटकटीचे असते, तर निष्कारण ते कशाला ओढवून



अनुक्रमणिका

घ्या अशी त्यांची भावना असते. समीक्षात्मक लेखन एका मर्यादेपलीकडे 'सोप्पे' असू शकत नाही कारण त्यामध्ये तार्किक युक्तिवाद असतात, पद्धतशीरपणे केलेले सिद्धांतन असते, कारण ते शास्त्र आहे. त्यासाठी कलाकृती केवळ भावणे किंवा भोगणे व त्या अनुभवाचे भारून किंवा भारावून जाऊन वर्णन करणे पुरेसे नसते, तर त्या कलाकृतीची वैशिष्ट्ये सांगण्यासाठी काही निकषांचा संच, मूल्यविचार व संबंधित साहित्यप्रकारांचा संकेतव्यूह यांचे ज्ञान समीक्षकाला असावे लागते. याखेरीज साहित्याच्या समग्र परंपरेमध्ये विशिष्ट लेखकाचे स्थान निश्चितीही समीक्षक करत असतो. उदा. मर्ढेकर-युग कोणत्या पार्श्वभूमीवर निर्माण झाले? हे समीक्षकाला स्पष्ट करावे लागते. त्याकरिता त्याआधीची स्वच्छंदतावादी कवितेची परंपरा त्याला व्यवस्थितपणे ज्ञात असावी लागते. ही सामग्री असल्याशिवाय त्या कलाकृतीच्या विशिष्टतेचा व व्यापकतेचा, तिच्यातील पारंपरिकतेचा व आधुनिकतेचा वेध तो घेऊ शकत नाही. त्याची आयुधे किती धारदार व तीक्ष्ण आहेत, त्यांचा पडताळा त्याच्या समीक्षेमधून येतो. शिवाय 'सौंदर्य'विषयक उपपत्ती कोणत्याही एका काळात गोठवून ठेवलेल्या, कधीही पुसट न होणाऱ्या शिक्क्यांसारख्या नसतात. तशा त्या असत्या, तर ते छाप जसेच्या तसे उमटवून कलाकृतीतील सौंदर्यस्थळांवर शिक्कामोर्तब करणे एवढ्यापुरतेच समीक्षकाचे कार्य संकुचित झाले असते; पण साहित्यसमीक्षा ही संकल्पना मुळातच बहुपेडी व अनेक पदरी असल्याने तिच्यामध्ये साहित्यकृती विषयीचे मूल्यगर्भ व ज्ञानगर्भ अभिप्राय त्यांना आधारभूत असणारे सार्वत्रिक निकष (उदा. अनुभवाची व्यामिश्रता व रसवत्ता, भावार्थ घटकांची रचना इ.) निःसंदिग्धपणे शब्दांकित करणारी भाषा, साहित्यविषयक प्रश्नांची चर्चा, एखाद्या लेखकाच्या समग्र साहित्याचे मूल्यमापन, लेखनतंत्राचे, रचनेचे विश्लेषण आणि साहित्यकृतीच्या गुण-दोषांचे दिग्दर्शन या साऱ्यांचा अंतर्भाव होतो. म्हणून विशेषतः सैद्धांतिक समीक्षा एखाद्या अवघड गणितासारखी किंवा कूटप्रश्नासारखी वाटू शकते; पण कोणत्याही क्षेत्रातील उच्च कोटीचे ज्ञान संपादन करण्यासाठी अमूर्त चिंतन, विचार करण्याची सवय बरीच वर्षे असावी लागते. संकल्पनांची व्याप्ती, त्यांचे नेमके अर्थ उमजण्यासाठी कित्येकदा स्वतःशी झगडावे लागते. पारिभाषिक संज्ञांचा चक्रव्यूह भेदावा लागतो. त्यासाठी त्यातून काय सूचित वा स्पष्ट होते ते कळावे लागते, आणि हे कधीतरी छंद, लहर वा चूष म्हणून करून भागत नाही कारण समीक्षा ही गंमत म्हणून करण्याची, जाता जाताची करमणूक नसते किंवा ती लोळून वाचता येण्याजोगी गोष्ट नाही. समीक्षा लिहिण्यासाठीच नव्हे तर वाचण्यासाठीसुद्धा वाचकाची बुद्धी सदैव प्रज्वलित, तल्लख हवी. आता काळाच्या कोणत्याही टप्प्यावर पाहिले, बुद्धिजीवी विचारवंत संख्येने कमीच असतात. त्यातही औपचारिक अर्थाने शिक्षण व साहित्य क्षेत्रात वावरणारे आपल्यासारखे लोक कदाचित दिवसेंदिवस आळशी होत चालले आहेत की काय, अशीही शंका येते.

भौतिक सुबत्ता आणि व्यावहारिक पातळीवर स्थैर्य लाभले की, आपण लवकरच निश्चिंत व निवांत होतो, सहज जमले, तर बौद्धिक खटाटोप करतो. एरवी जीवनकलहात थकून गेल्याची सबब सांगून जमवलेल्या कोणे एके काळच्या पुंजीवर निर्वाह करीत राहतो. आणखी एका कारणाने विशेषतः सर्वसामान्य वाचकांना समीक्षा तापदायक वाटते ते म्हणजे तिची भाषा! ती प्रासादिक, ओघवती असावी. परिभाषेचा आधार अपरिहार्य असेल, तरच आणि तेवढाच घ्यावा, तिच्या जंजाळातून वाट काढणेच मुश्कील होईल असे लिहू नये किंवा विशिष्ट समीक्षा पद्धतीचा अवलंब केला म्हणजे ते लेखन जणू मौलिक ठरते असेही नाही. समीक्षा रटाळ, पाल्हाळिक व कंटाळवाणी झाली, तर तिचा हेतूच साध्य होणार नाही. ती वाचकांपर्यंत पोचणार नाही, तशी ती पोचली, पोचवली पाहिजे यावर कोणाचे दुमत असण्याचे कारण नाही; पण 'युजर फ्रेंडली'च्या नावाखाली ती हसतखेळत, रमतगमत करण्याची कृती नाही, हे अधोरेखित करणेही आवश्यक आहे.

समीक्षेतील बहुतांश सिद्धान्त पाश्चिमात्यांकडून (उदा. स्त्रीवाद, शैलीमीमांसा, संरचनावाद, विरचनावाद इ.) किंवा पौर्वात्यांकडून (रससिद्धान्त, काव्यानंदमीमांसा इ.) स्वीकारलेले असल्याने ते यथामूल अभ्यासावे लागतात. त्याकरिता संस्कृत आणि इंग्रजी भाषा अवगत असाव्या लागतात. बीजग्रंथ मिळवून ते व्यवस्थित नीटपणे वाचावे लागतात. त्यातील प्रतिपादन जसेच्या तसे यांत्रिकपणे भारतीय संदर्भात 'वापरता' येत नाही कारण मूळचे संदर्भ, पश्चिमेकडील इतिहासक्रम, सांस्कृतिकता व एकंदरच राजकीय, सामाजिक परिस्थिती आपल्यापेक्षा अंतर्बाह्य वेगळी आहे, याची जाणीव सतत जागृत नसेल, तर विधाने अतिशयोक्त, सवंग व पृष्ठस्तरीय होतात. संस्कृत आणि इंग्रजीचा आधार न घेता मराठी साहित्याचा अन्वयार्थ लावू पाहण्याचेही काही प्रयत्न झाले. मा. गो. देशमुख व उषा देशमुख यांनी सिद्ध केलेले 'मराठीचे साहित्यशास्त्र', अशोक केळकर लिखित 'रुजुवात' हा ग्रंथ, शरद पाटीलकृत 'अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र' ते थेट देशीवादाचा

पुरस्कार करणारे भालचंद्र नेमाडे यांच्या 'टीकास्वयंवर' या ग्रंथापर्यंत आपल्या मातीत आपली मुळे शोधण्याचे कसून प्रयत्न झाले; परंतु त्यांना म्हणावे तसे यश लाभले नाही.

काही वेळा काळ एखाद्या समीक्षापद्धतीला अनुकूल असतो. उदा. १९७५ ते १९९० या दरम्यान स्त्रीवादी विचारांच्या खुणा असलेले साहित्य व त्याची समीक्षा यांना बहर आला. याचे कारण १९७५ साली 'युनायटेड नेशन्स'ने जाहीर केलेल्या 'आंतरराष्ट्रीय महिला वर्षा'नंतर किमान पुण्या-मुंबईसारख्या मोठ्या शहरात तरी स्त्रीमुक्ती, स्त्रीवाद इ. संकल्पनांची चर्चा होत होती. स्त्रियांच्या मनातील आशा-निराशेची स्पंदने शब्दांकित करण्याच्या, तसेच सिमॉन द बोव्हा, जर्मेन ग्रिएर, बेटी फ्रीडन, शोवॉल्टर इ. पाश्चात्त्य स्त्रीवादी विचारवंतांचा परिचय करून देण्याच्या हेतूने 'स्त्री-उवाच', 'मिळून साऱ्याजणी' इ. नियतकालिकांचा जन्म झाला. त्यातून स्त्रियांचे अनुभवाधिष्ठित लेखन प्रकाशित होऊ लागले. स्त्रीमुक्ती चळवळीच्या निमित्ताने पाश्चिमात्यांकडे याविषयी झालेले विचारमंथन येथील स्त्री-पुरुष विचारवंतांना व कार्यकर्त्यांना जाणून घ्यावेसे वाटले. त्यामधून पुरुषसत्ताक समाजव्यवस्था, लिंगभावाधिष्ठित भेद, देहात्मक भान व त्यावर आधारित राजकारण या संकल्पनांच्या चर्चेस प्रारंभ झाला. स्त्रीसंबद्ध साहित्याचा शिस्तबद्ध अभ्यास व्हावा यासाठी देशातील विविध विद्यापीठांमध्ये 'स्त्री-अभ्यास केंद्रा'ची स्थापना झाली. त्यामधून स्त्रीवादी समीक्षेचा एक ठरीव साचा बनलेला दिसतो. आता तर यावर इतके लिहिले, बोलले गेले आहे की जागोजागच्या तरुण अभ्यासकांना मूळ ग्रंथ पाहण्या-वाचण्याचीसुद्धा तसदी घ्यावीशी वाटत नाही. विद्युत भागवत, अश्विनी धोंगडे, मंगला वरखेडे, प्रभा गणोरकर व शोभा नाईक इत्यादिंच्या लेखनाचा उपयोग ते करून घेतात. दुय्यम संदर्भ जसेच्या तसे उद्धृत केल्याने 'स्त्रीचे स्त्री' म्हणून सत्त्व सांगितले, तर पुरुषकेंद्री एकसत्त्ववादी भूमिकाच मान्य केल्यासारखे होते. स्त्रीवादी समीक्षेपुढील हा मूलभूत पेच आहे. (ले. मिलिंद मालशे, 'मराठी वाङ्मयकोश, खंड चौथा, समीक्षा संज्ञा') या विधानातील मेख त्यांना स्पष्टपणे सांगता येत नाही कारण ती त्यांना जाणवतही नाही.

स्त्रीवादी समीक्षेला उठाव आला याची काही कारणे परिस्थितीजन्य होती, आहेत; परंतु समीक्षेतील अन्य प्रवाह जोरदारपणे वाहते राहिलेले आढळत नाहीत. वस्तुतः आता मूळ ग्रंथ, संदर्भ मिळवणे पूर्वीइतके कष्टप्रद राहिलेले नाही. आंतरजाल म्हणजे इंटरनेट, विकीपिडिया, गुगल हे तरुणपिढीच्या परवलीचे शब्द झाले आहेत; परंतु त्या माहितीवर पूर्ण भरवसा ठेवता येत नाही. स्वतः परदेशप्रवास करून तिकडची ग्रंथालये पाहणे, संदर्भग्रंथ मागवणे त्यासाठी आर्थिक तरतूद करणे हे नोकरीत स्थिरस्थावर झालेल्या कोणाही अभ्यासकाच्या दृष्टीने सुलभ आहे; परंतु बाह्य परिस्थिती अनुकूल असूनही साहित्यसमीक्षेच्या क्षेत्रात तुरळक अपवाद वगळले तरी ज्यांची दखल आवर्जून घ्यायला हवी, असे सातत्याने विचारात गुंतलेले अभ्यासक दिसत नाहीत. किंवा हिरीरीने वाद-प्रतिवाद होत नाहीत. जसे ते रा. भा. पाटणकर व गंगाधर गाडगीळ अथवा भालचंद्र नेमाडे व विद्याधर पुंडलिक यांच्यामध्ये झाले. शांततेचा भंग करणारे काही परिचित आवाज ऐकू येतात, तेव्हा ते आश्वासक वाटतात कारण भोवतालची हवा कितीही बदलली, वारे कोणत्याही दिशेने वाहत असले तरी दमदार असल्याने ते आवाज दीर्घकाळ आपल्यावर आघात करीत राहातात. ग्लानीतून येणारे सैलावलेपण, सुस्ती व मरगळ झटकून टाकतात. असे आवाजही आता दिवसेंदिवस कमी होत चालले आहेत, ही खंत वाटते.

म्हणून मराठीमध्ये आजवर दोन का होईना पण समीक्षेतील संज्ञांचे विवरण करणारे कोश निर्माण झाले ही घटना प्रशंसनीय आहे. 'मराठी वाङ्मय कोश, खंड ४, समीक्षा संज्ञा' (समन्वयक-संपादकः विजया राजाध्यक्ष) आणि 'वाङ्मयीन संज्ञा संकल्पना कोश' (संपादकः प्रभा गणोरकर, वसंत आबाजी डहाके, जया दडकर, सदानंद भटकळ, आशा राजवाडे व रमेश वरखेडे) यांचा निर्देश याठिकाणी करता येईल. याखेरीज 'स्त्री साहित्याचा मागोवा' (आतापर्यंत चार खंड प्रकाशित) संपादकः डॉ. मंदा खांडगे व इतर हे साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या पुढाकाराने सिद्ध झालेले ऐतिहासिक दृष्टीने समालोचन करणारे ग्रंथ आहेत. एरवी पारिभाषिक संज्ञांच्या स्पष्टीकरणासाठी व ग्रंथकारांच्या तपशिलांसाठी संबंधित ग्रंथांचा शोध घेण्यात कितीतरी वेळ व शक्ती खर्ची पडली असती. 'तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, विज्ञान आणि देवधर्मविचार' या चार क्षेत्रांतील पौर्वात्य व पाश्चिमात्य प्रमुख विचारवंतांचा आणि त्यांनी मांडलेल्या विचारधारांचा प्राथमिक परिचय करून देणाऱ्या के. रं. शिरवाडकर लिखित 'आपले विचारविश्व' या ग्रंथाचा उल्लेखही येथे अवश्य करायला हवा. ज्ञानभाषा म्हणून इंग्रजीला का मान्यता आहे याचे एक साधे कारण अशा प्रकारच्या वैविध्यपूर्ण कोशनिर्मितीच्या संख्येतून व त्यांच्या दर्जेदारपणातून मिळते. 'की वर्डस' - रेमंड विल्यम्स, 'न्यू की वर्डस'- संपादक टोनी बेनेट, लॉरेन्स ग्रॉसबर्ग व मेघन मॉरीस, 'अ ग्लॉसरी ऑफ कंटेम्पररी लिटररी थिअरी' -

जेरेमी हॉथोर्न इत्यादींची साक्ष येथे सहजपणे काढता येईल. अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त ठरणारे हे कोशग्रंथ आपल्या विद्यापीठांच्या ग्रंथालयांमध्ये देखील आढळत नाहीत, हे केवढे मोठे दुर्दैव आहे.

अशीच दुरवस्था समीक्षेतील बीजग्रंथांच्या भाषांतराबाबतीत आहे. 'साहित्य सिद्धांत' हे रेने वेलेकच्या 'थिअरी ऑफ लिटरेचर'चे डॉ. स. गं. मालशेकृत भाषांतर, 'द सेकंड सेक्स' हे सिमॉन द बोव्हाच्या ग्रंथाचे करुणा गोखले यांनी केलेले भाषांतर अरिस्टॉटलच्या 'पोएटिक्स'चे गो. वि. करंदीकरकृत 'अरिस्टॉटलचे काव्यशास्त्र' हे भाषांतर, या खेरीज उदाहरणे देता येत नाहीत. इतकेच नव्हे तर अस्सल म्हणावेत असे भाष्यग्रंथही अत्यल्प आहेत. उदा. 'कांटची सौंदर्यमीमांसा'(लेखक रा. भा. पाटणकर, त्याला मे. पुं. रेगे यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेसकट वाचनीय), 'क्रोचेचा सौंदर्यविचार' (लेखक रा. भा. पाटणकर) हे अपवाद अत्यल्प आहेत. अशा दुरापास्त अवस्थेत समीक्षा कोठेतरी कोपऱ्यात लोटली गेलेली दिसते, यात नवल नाही.

मात्र पद, प्रतिष्ठा, पैसा आणि मुख्य म्हणजे जाणकारांच्या वा वाचकांच्या प्रतिक्रियांची पर्वा (चांगल्या अर्थाने) न करता काही समीक्षक कसोशीने बोलत, लिहित राहिले. त्यांच्यामुळे गेल्या २५ ते ३० वर्षांमध्ये समीक्षेतील अद्ययावत ज्ञान आपल्यापर्यंत झिरपले, असे म्हणता येईल. उदा. १९८० च्या दशकात 'वर्णनात्मक भाषाविज्ञाना'ची तोंडओळख झाली होती. त्यातून निष्पन्न झालेली शैलीवैज्ञानिक समीक्षा व चिन्हमीमांसा मराठीमध्येही परिचित झाली. लेखकाने योजलेल्या शब्दांचे, वाक्यांचे, परिच्छेदांचे व त्यातून निष्पन्न होणाऱ्या अर्थाचे नमुना विश्लेषण करणारी शैलीमीमांसा अशोक केळकर, रमेश धोंगडे व दिलीप धोंडगे यांनी मराठीमध्ये रुळवण्याचा प्रयत्न केला. सैद्धान्तिक व उपयोजित अशा दोन्ही पातळ्यांवर त्यांनी प्रस्तुत दृष्टिकोन पारखून घेतला. गंगाधर पाटील यांनी केलेल्या विस्तृत लेखनातून रोमान इनगार्देन, पॉल रिकर, रोमान याकोबसन, रोला बार्तस इ. विचारवंत महाराष्ट्राला परिचित झाले. अलीकडच्या काळात झ्याक डेरिडा, मिखाइल बाख्तिन, मिशेल फुको यांच्या सिद्धांतनाचा परामर्श डॉ. हरिश्चंद्र थोरात यांनी आपल्या समीक्षात्मक लेखनातून घेतलेला दिसतो. जोनाथन कलरप्रणीत साहित्यिक क्षमता (लिटररी कॉम्पिटन्स), बहुस्वरीय कादंबरी (पॉलिफोनिक नॉव्हेल) ही बाख्तिनची संकल्पना आणि व्होल्फगांग आयझरची 'गर्भित वाचका'ची (इंप्लाइड रीडर) संकल्पना आणि अशा कितीतरी संकल्पना व उपपत्ती मराठीमध्ये रुजविण्याचा चिकाटीने व परिश्रमपूर्वक प्रयत्न विशेषतः गंगाधर पाटील, मिलिंद मालशे व हरिश्चंद्र थोरात यांनी केला, करत आहेत. त्यामुळे समीक्षेची वाट प्रशस्त, रुंद झाली, (तसेच ती किती बिकट आहे, चढ-उतारांनी भरलेली आहे याचीही कल्पना आली) हे खरेच आहे.

परंतु यातून एक धोकाही पुरेपूर जाणवला, त्यामुळे त्या वाटेला जाण्याचेच काही जणांनी नाकारले, टाळले. मूळ सैद्धान्तिक मांडणी मराठीमध्ये जशीच्या तशी, यथातथ्य करण्याच्या आग्रहापायी ती कधीकधी इतकी जड, तर्ककर्कश व अगम्य होते की, वाचकाच्या मनात त्याविषयी एक प्रकारची अढी उत्पन्न होते. तो बिचकतो आणि मग त्या विवेचनापासूनच नव्हे तर ते करणाऱ्या व्यक्तीपासूनही सुरक्षित अंतरावर राहतो. त्याला ते पांडित्य पढिक व प्रदर्शनीय वाटून तो त्याचा तिरस्कार करू लागतो. वाचक व समीक्षक यांच्यामध्ये अशा प्रकारची भिंत उभी राहणे, हे एकूणच साहित्य व्यवहाराच्या दृष्टीने अजिबात हितावह नाही.

म्हणून यातून एक मध्यममार्ग काढणे इष्ट ठरते. तो म्हणजे पर्यायी शब्द जर बोजड होत असतील, तर विशिष्ट संकल्पनांचा अर्थ दोन किंवा तीन स्पष्टीकरणात्मक वाक्यात सांगणे. त्याहून महत्त्वाचे म्हणजे एखाद्या समीक्षापद्धतीचा प्रथम परिचय करून देऊन तिचे उपयोजन करून दाखविणे. उदा. 'चिन्ह आणि घाशीराम कोतवाल' यामध्ये राजीव नाईक यांना फर्डिनांड द सोस्यूरप्रणीत 'चिन्हमीमांसा' या पद्धतीचा आधार घेऊन प्रस्तुत नाटकाचे जे 'भिंगदार व विंचरक' अर्थनिर्णयन केले आहे, ते प्रारूप म्हणून स्वीकार्य व उपयुक्त वाटते. मात्र ते 'कोणालाही' कळेल, असे नाही. त्यासाठी वाचकाची बौद्धिक पूर्वतयारी हवी. यातून याआधी म्हटल्याप्रमाणे 'समीक्षे'बद्दल व 'समीक्षका'बद्दल सर्वसामान्य वाचकाला, रसिकाला अप्रीती उत्पन्न होऊ शकते याठिकाणी एक गोष्ट तात्काळ सांगायला हवी, ती म्हणजे चांगल्या समीक्षकाचा दरारा वा धाक असणे आणि त्याची दहशत निर्माण होणे या दोन्हींमध्ये फार फरक आहे. दुसरा प्रकार घातक आहे, तो शक्य तितका टाळायला हवा कारण त्यामुळे कलावंत आणि वाचक तर दूर जातातच; पण समीक्षकसुद्धा, संवादच खुंटल्याने एकाकी बेटावर राहतो. अशा परिस्थितीत वाचक अनभिज्ञ, तर समीक्षक आत्मसंतुष्ट राहण्याची शक्यता वाढते.

समीक्षक कोणाला तरी साहित्यकृती संबद्ध बोध घडवीत असतो, त्यासाठी वस्तुनिष्ठ प्रमाणकांचा आधार घेऊन आपली भूमिका प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे मांडत असतो. समीक्षा ही स्वान्तसुखाय केलेली कृती नसते. वाचक समक्ष असेल वा

नसेल; पण त्याचे अस्तित्व येथे गृहित धरलेले आहे. म्हणून जसे वाचकाचा अनुनय करणे त्याज्य, तसे वाचकाची अजिबात तमा न बाळगणेही गैर आहे, अयोग्य आहे. समीक्षा जर समाजविन्मुख झाली (आपले काय देणे घेणे?), समीक्षकामध्ये जर ज्ञानाचा दंभ, अहंकार शिरला, तर समग्र साहित्य व्यवहारच सीमित होतो. वाचकांची सांस्कृतिक व वाङ्मयीनच नव्हे तर एकूण जगण्याविषयीची व सभोवतालच्या जगाविषयीची समज संकुचित होते आणि शहाणपण कमावण्याचे त्याचे मार्ग खुंटतात. ज्या समाजाच्या ज्ञानव्यवहारात अनास्था व उदासीनता भरून राहिलेली असते त्या समाजाचे भविष्य उज्ज्वल कसे असणार? त्यामुळे कलानिर्मिती इतकेच समीक्षेचे अस्तित्वही अटळ आहे किंबहुना ज्या समाजाचे विचारविश्व अनेक आवाजी, वेगवेगळ्या वाद-प्रतिवादांनी गजबजलेले असते तो समाज जिवंत असतो, त्याची सांस्कृतिक पातळी उन्नत असते. केवळ मृत साहित्यिकांचे किंवा समीक्षकांचे थंडगार पुतळे उभारून चौकांना वा गल्ल्यांना त्यांची नावे देऊन, त्याद्वारेही अस्मिताबाजीचे राजकारण करून साहित्याबद्दलच्या आस्थेचा (एकदाच आणि जणू काही अंतिम) पुरावा देता येत नाही. पुतळे उभे करून कर्तव्य निभावल्याचे कृतक सार्थक मानणे, त्या व्यक्तींच्या कामगिरीचा पुनर्विचार, पुनर्मूल्यांकन करण्यापेक्षा, त्याला उजाळा देण्यापेक्षा केव्हाही कमी कष्टप्रद असते. वस्तुतः आर्थिक पाठबळ द्यायचे असेल, कलेविषयीचे प्रेम दाखवायचे असेल, तर अशा स्मारकांपेक्षा अधिक विधायक उपक्रमांना (उदा. चर्चासत्रे, अभिवाचने, ग्रंथालये इ.) प्रोत्साहन देणे इष्ट ठरेल.

आणखी एका कारणाने समीक्षक उपेक्षित राहतो, समाजामध्ये अगदी बेताच्या प्रतीच्या कलावतांना, साहित्यकारांनादेखील एक प्रकारचे वलय असते. प्रसिद्धीची मोहर त्यांच्या नवनिर्मितीवर उमटलेली असली तर (विशेषत: गेल्या दशकात माध्यमांचा सुळसुळाट झाल्याने) त्यांच्या प्रकट मुलाखती, त्यांच्याशी गप्पा, (हे मला कसे स्फुरले, सुचले अशातऱ्हेची आत्मकथने ) त्यांची थेट-भेट, सही-संदेशाने सजावट आणि चाहत्यांची स्तुतिसुमने यांनी लेखक निश्चितपणे सुखावतो. त्याची उमेद वाढते हा याचा अनुषंगिक का असेना; पण लाभ म्हणता येईल. उलट साहित्यकृतीतील गुण-दोष, बलस्थाने-शबलस्थाने, तिचे सामर्थ्य व तिच्या मर्यादा वस्तुनिष्ठपणे व काटेकोरपणे दाखवणारा समीक्षक जेवढा दक्ष व व्यासंगी तेवढा तो अप्रिय ठरण्याची शक्यता अधिक, कारण मग तो जे शब्दांकित करेल ते आकलन सुलभ असेलच अशी हमी देता येत नाही.

खरे तर याआधी म्हटल्याप्रमाणे, वाचकालाच नव्हे तर लेखकालाही समीक्षक चांगल्या अर्थाने साहाय्य करू शकतो. त्याच्या लेखनातील उणिवा, घटना-प्रसंगांची असंभवनीयता, कच्चे दुवे व कमकुवतपणा प्रकाशनपूर्व काळात लेखकाने जाणून घेतला, तर काहीवेळा मूळ साहित्यकृतीचे सौंदर्य वृद्धिंगत होऊ शकते. तिला वेगळे परिमाण लाभू शकते. समीक्षकाच्या दृष्टीनेही लेखकाचा पिंडधर्म, त्याचा संवेदनास्वभाव समजावून घेता आला, तर त्याच्या लेखनाच्या स्वरूपाची चिकित्सा त्याला सहृदयतेने व साक्षेपाने करता येते; परंतु आपल्याकडे हे नाते हेवे-दावेयुक्त आहे. परस्परांविषयीच्या आदराचा अभाव असल्याने उभयपक्षी 'कोण समजतो स्वतःला' असा आक्रमक पवित्रा घेतलेला दिसतो. आता तर समीक्षकांमध्येही पारंपरिक पद्धतीने समीक्षा लिहिणारे (म्हणजे स्थूलमानाने कोणताही विशिष्ट विचारव्यूह केंद्रस्थानी न ठेवता लेखन करणारे) व आधुनिक समीक्षापद्धती अनुसरणारे असेही दोन वेगळे (विरोधी?) गट निर्माण झाले आहेत. उदा. नागनाथ कोत्तापल्ले, त्र्यं. वि. सरदेशमुख, रा. ग. जाधव, सुधीर रसाळ, विलास खोले हे पहिल्या गटातील समीक्षक होत, तर गंगाधर पाटील, म. सु. पाटील, हरिश्चंद्र थोरात व मिलिंद मालशे इ. अभ्यासक दुसऱ्या गटात मोडतात. वस्तुत: पहिल्या प्रकारातील समीक्षा पूर्णतः टाकाऊ व उथळ ठरेल असे नाही. कदाचित समीक्षकाच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा प्रत्यय तिच्यातून येऊ शकेल आणि केवळ कोणत्यातरी नव्या सिद्धान्ताचे उपयोजन केले म्हणजे ती समीक्षा आपोआप मौलिक ठरेल, असे नाही. त्यामधून इप्सित साध्य होते का, रसिकता, अभिरुची संस्कारित व डोळस होते का, वाचकाच्या ज्ञानात्मकच नव्हे तर भावनात्मक जाणिवा प्रगल्भ होतात का हे पाहायला हवे. म्हणून समीक्षा पद्धतींमध्ये तरतमभाव करता कामा नये. प्रत्येक पद्धती आपल्याला नवी दृष्टी देते.

काही वेळा वर्णनात्मक आणि मूल्यमापनात्मक विशेषणे व विधाने यात गल्लत झाल्याने 'अमुक एक कादंबरी अस्तित्ववादी किंवा स्त्रीवादी आहे म्हणजे ती सौंदर्यपूर्ण आहे, असा अर्थ लावला जातो. स्त्रीवादी कार्यकर्ते-अभ्यासक कदाचित असे म्हणतीलही! कारण त्या विशिष्ट विचारप्रणालीचा स्वीकार ही त्यांची 'भूमिका' असते. त्या भूमिकेतून आपला अभिप्राय प्रकट करतानासुद्धा 'काही साहित्यकृतींचा अभ्यास प्रस्तुत ठरतो', असे आपल्याला म्हणावयाचे आहे का, नेमकी कोणती 'कोटी', कोणते 'विशेषण' योजले, तर ते योग्य व काटेकोर ठरेल, याकडे

समीक्षकाने जाणीवपूर्वक लक्ष दिले पाहिजे.

काही वेळा कलावंतांच्या ठायी सर्जनशीलता आणि चिकित्सकता या दोन्ही क्षमता एकत्र नांदत असतात. उदा. पाश्चिमात्यांकडील टी. एस. एलियट, अल्बेर काम्यू, ज्याँ पॉल सात्र, व्हर्जिनिया वूल्फ यांची नावे याठिकाणी सहज आठवतात. आपल्याकडे ना. सी. फडके, वि. स. खांडेकरांपासून बा. सी. मर्ढेकर, गंगाधर गाडगीळ, कुसुमावती देशपांडे यांच्यापर्यंत आणि १९७० नंतरच्या काळात दिलीप चित्रे, विलास सारंग, भालचंद्र नेमाडे, वसंत आबाजी डहाके यांच्यापासून जयंत पवार, राजीव नाईक यांच्यापर्यंत मोजके; परंतु महत्त्वाचे नामनिर्देश येथे करता येतील. स्वानुभवाला वैचारिकतेची जोड देणारे हे लेखन वाचकाला निश्चितपणे मर्मदृष्टी देणारे आहे.

या ठिकाणी विपुल प्रमाणात होत असलेल्या परिणामनिष्ठ, प्रतिक्रियात्मक, कलानुभवात हरवून-हरखून जाऊन, तत्परतेने भरभरून दाद देणाऱ्या आणि वृत्तपत्रांतून नित्यनेमाने प्रसिद्ध होणाऱ्या आस्वादक समीक्षेचे ऋणही मान्य करणे आवश्यक आहे. बऱ्याचदा ती जुजबी अभिप्रायात्मक व भावनिक असते हे आक्षेप मान्य करूनही तिची उपयुक्तता ध्यानात घ्यावी लागते. या ठिकाणी माधव मनोहर (साप्ताहिक 'सोबत'), माधव वझे ('साप्ताहिक सकाळ'), कमलाकर नाडकर्णी व जयंत पवार ('महाराष्ट्र टाइम्स') यांच्या नाट्यसमीक्षेचा यासंदर्भात निर्देश करता येईल. वृत्तपत्रामध्ये स्थल-काल मर्यादा असते. ती सांभाळून आणि विशिष्ट व्यक्तींना वा संस्थांना झोडपणे वा उचलून धरणे टाळून त्यांनी केलेली निःपक्षपाती परीक्षणे म्हणून लक्षणीय ठरली. सर्वात महत्त्वाचे म्हणजे यामुळे वाचकाचे लक्ष त्या विशिष्ट साहित्यकृतीकडे वेधले जाते. त्यातून (कदाचित) तो ती वाचण्यास प्रवृत्त होतो. त्यावर निदान आपापसात बरी-वाईट चर्चा करतो.

आणखी एका कारणाने या पद्धतीच्या समीक्षेची दखल घेणे आवश्यक ठरते. उदा. 'आस्वादक' या विशेषणाने संबोधल्या जाणाऱ्या समीक्षेमध्येही काहीवेळा मर्मदृष्टी देणाऱ्या संकल्पना प्रभावीपणे अवतरलेल्या दिसतात. द.ग.गोडसे यांच्या लेखनात, भूमिनिष्ठ शक्ती-गती, पोत, शक्त-भार, नियमित-अनियमित वाक्-वळणे, आविष्कारांचे अंगभूत चलन इ. शब्दप्रयोगांना ('पोत', 'शक्तिसौष्ठव' इ.) संकल्पनांचेच रूप प्राप्त होते. अथवा वाचकांशी सलगी करणाऱ्या शैलीतून, काळ आणि अवकाश या दोन घटकांचा नाटकांच्या संदर्भात शोध घेणाऱ्या 'खेळ नाटकाचा' या राजीव नाईक लिखित ग्रंथाचाही उल्लेख येथे करता येईल. त्यामुळे पूर्णतः तात्त्विक स्वरूपाची समीक्षा म्हणजे चिरकालीन मूल्य असलेली आणि निव्वळ उपयोजित समीक्षा म्हणजे तात्कालिक मूल्य असलेली, असे मानण्याचे अजिबात कारण नाही. त्यामुळे मूलतः कोणतीही समीक्षा पद्धत चांगली किंवा वाईट, उपयोगी किंवा निरुपयोगी किंवा श्रेष्ठ अथवा कनिष्ठ असत नाही हे आवर्जून सांगायला हवे.

कोणतीही समीक्षा पद्धत अनुसरली तरी समीक्षक व्युत्पन्नमती असायला हवा. त्यासाठी अगदी किमान पातळीवर का होईना; पण मानव्य-विद्यां (उदा. तत्त्वज्ञान, मानसशास्त्र व समाजशास्त्र) मधील महत्त्वाचे सिद्धांत इंग्रजी ग्रंथातून वाचून त्याने ते समजावून घ्यायला हवेत. आवश्यक असेल तेथे आधार घेऊन आपला अभ्यास व कलाकृती संबंधीचे अर्थनिर्णयन परिपूर्ण कसे होईल हे त्याने बघायला हवे. त्याआधी तपशीलवार नोंदी करणे, टिपणे काढणे, त्यावर चिंतन करून आपल्याला काही नवीन सुचते आहे का, याचा विचार करणे, जे स्फुरले आहे ते तार्किकतेच्या कसोटीवर कसे उतरते हे पाहणे आणि मुख्य म्हणजे भारतीय परिप्रेक्ष्यातून त्याची मांडणी कशी करता येईल हा सारा विचार करून कागदाला लेखणी लावली पाहिजे. (उदा. स्त्रीवादाचे भारतीय परिप्रेक्ष्यातून आकलन अद्यापही पुरेसे स्पष्ट झालेले नाही. भारतीय समाज अठरा पगड जाती-धर्मांच्या, वर्ण-वर्गांच्या स्त्री-पुरुषांमध्ये विभागलेला असल्याने ते आणखी कठीण आहे. तूर्तास तर 'मध्यमवर्ग' ही संकल्पनासुद्धा एकरेषीय राहिलेली नाही.) परंतु नाव, प्रतिष्ठा कमावलेल्या भल्याभल्या समीक्षकांनासुद्धा संक्षिप्त टिपणे, स्फुट लेख एकत्रित करून (प्रकाशकांच्या आग्रहास्तव!) त्यांचे संग्रह प्रसिद्ध करावेसे वाटतात तेव्हा त्यातून फारसे काही निष्पन्न होत नाही. उदा. 'कादंबरीः स्वरूप आणि समीक्षा' (लेखक द. भि. कुलकर्णी). वस्तुतः कोणत्याही कलावंताच्या

**यातून एक मध्यममार्ग काढणे इष्ट ठरते. तो म्हणजे पर्यायी शब्द जर बोजड होत असतील, तर विशिष्ट संकल्पनांचा अर्थ दोन किंवा तीन स्पष्टीकरणात्मक वाक्यांत सांगणे. त्याहून महत्त्वाचे म्हणजे एखाद्या समीक्षापद्धतीचा प्रथम परिचय करून देऊन तिचे उपयोजन करून दाखविणे.**



अनुक्रमणिका

दिनचर्येमध्ये जसा रियाज अपरिहार्य असतो तसा तो समीक्षकाच्या दैनंदिन आयुष्यातही असायला हवा. या दृष्टीने 'समीक्षेचा रियाज' हे नीलिमा गुंडी यांनी लिहिलेल्या ग्रंथाचे शीर्षक अर्थपूर्ण आहे.

साहित्यकृतींमध्ये कितीतरी संदर्भ जागोजागी येत असतात. त्यांची अर्थपूर्णता जाणवण्यासाठी व कळण्यासाठी मानव्य-विद्याच नव्हे, तर पूर्वकालीन व समकालीन सामाजिक-राजकीय चळवळी, स्थित्यंतरे, अन्य कलांच्या क्षेत्रात घडणाऱ्या घटना घडामोडी याकडे डोळे व कान उघडे ठेवून समीक्षकाने पाहायला हवे. भाऊ पाध्ये यांच्या कादंबऱ्यातून साकार होणाऱ्या विश्वात प्रवेश करायचा असेल, तर तत्कालीन हिंदी चित्रपटातील नट-नट्या, संगीत व त्यांची अर्थपूर्णता समीक्षकाला माहीत हवी. विश्वास पाटील लिखित 'झाडाझडती'मधील घटना-प्रसंगांची अन्वर्थकता समजण्यासाठी वाचकाला 'नर्मदा बचाव' आंदोलन, विस्थापितांच्या समस्या व शासनाची धोरणे - त्यातील हितसंबंधांचे राजकारण ज्ञात हवे, तर समीक्षक त्या त्या संदर्भांचे स्पष्टीकरण व्यवस्थितपणे करू शकेल.

'सुनीत' किंवा 'हायकू' या काव्यप्रकारांची लक्षणे माहीत नसतील, तर त्यांच्या वाच्यार्थापलीकडे समीक्षकाची धाव कशी जाणार? 'महानिर्वाण'मधील 'कीर्तना'ची, 'बेगम बर्वे' मधील नाट्यसंगीताची, सतीश आळेकरांनी केलेली वैशिष्ट्यपूर्ण योजना उमगण्यासाठी त्यांची परंपरा समीक्षकाला ज्ञात हवी. एरवी त्यातून काय साधते हे वाचकाला कसे सांगणार? म्हणून समीक्षेसाठी भरभक्कम बौद्धिक पूर्वतयारी लागते. केवळ संवेदनशीलता पुरेशी नसते. जबाबदारीने करण्याची ती कृती आहे. वाचकाला चार घटका रिझवणे, त्याची करमणूक करणे हे ललित साहित्याचे प्रयोजन असू शकते, समीक्षेचे नव्हे.

तूर्तास एखादे नवे पुस्तक बाजारात अवतरण्याचा अवकाश की फेसबुक, ब्लॉग व ट्विटर इ. आविष्कार माध्यमातून त्यावर तत्परतेने उलटसुलट, चटपटीत व चुरचुरीत अभिप्रायांचा गजबजाट सुरू होतो. अशा प्राथमिक व संपादनाचा साधा हातही न फिरलेल्या अर्ध्याकच्च्या स्वरूपाचे लेखन, शेरेबाजी पुस्तक परीक्षण म्हणून देखील समाधानकारक ठरत नाही. काही क्षण त्यावर उडतउडत, येता-जाता बोलता येते, कधीकधी अंगठा अथवा अश्रू चिन्हातून दाखवूनही काम भागते. (ही चिन्हमीमांसा किती सोयीस्कर आणि सोपी आहे.)

असे असले तरी (व्यावसायिक गरजेचा रेटा नसूनही) महेंद्र भवरे, पुष्पलता राजापुरे तापस, भारती निरगुडकर, रणधीर शिंदे, नीतिन रिंढे, गजानन अपिने, निखिलेश चित्रे, गणेश विसपुते, ज्ञानदा देशपांडे, रुपाली शिंदे, प्रवीण बांदेकर, उदय रोटे, मेघना भुस्कुटे इ.अभ्यासक समीक्षेच्या संदर्भात निश्चितपणे आश्वासक आहेत. मुख्य म्हणजे उत्स्फूर्तता आणि उपपत्ती यांचा मेळ घालता आला, तर समीक्षा वाचनीय होते. तशी ती असली, तर शालेय अभ्यासक्रमात, पाठ्यपुस्तकातदेखील तिचा अंतर्भाव करता येईल, करायला हवा. आतापर्यंत तो कधीही केला गेला नाही. याकडेही आपले लक्ष वेधणे जरुरीचे आहे. इतकी अनास्था असल्यामुळे 'समीक्षा' हा साधा शब्दसुद्धा बहुसंख्य माणसांना अनाकलनीय वाटतो. किमान 'आस्वादक समीक्षे'चे उत्तम नमुने निवडून जरी पाठ्यपुस्तकात त्यांपैकी एखादा नमुना समाविष्ट केला, तर विद्यार्थीदशेपासून रसिकता, रसग्रहणक्षमता विकसित होऊ शकेल, आणि तर्क चालवण्यातील गंमतीचाही प्रत्यय त्यांना येईल; पण विनासायास हे घडणे शक्य नाही.

म्हणून तर सॅम्युएल बेकेट सारख्या ख्यातनाम नाटककाराच्या 'वेटिंग फॉर गोदो' या गाजलेल्या नाटकात ब्लादिमिर आणि एस्त्रागों एकमेकांना शिव्यांची लाखोली वाहताना 'गोरॉन', 'व्हेरमिन', 'क्यूरेट', 'अबॉर्शन' इ. हीनार्थवाचक शब्दासोबत अखेरची कडक शिवी म्हणून 'क्रिटिक' असे तिरस्काराने संबोधतात. हे सारे जमेस धरूनही वाटते की, झपाट्याने रंगरूप पालटणाऱ्या, अतर्क्य आणि अविश्वसनीय वाटणाऱ्या कल्पितापेक्षा कितीतरी पटीने वास्तवच अधिक अद्‌भुत असलेल्या या जगात आपल्या अंतर्यामीचा ऐवज, लाखमोलाचे द्रव्य, जिवापाड जपून त्याला कलानुभवात संक्रमित करणे, हे मोठे आव्हान आहे आणि ते पेलणाऱ्या लेखकांच्या निर्मितीचे रहस्य भेदणे, हे त्याहून कठीण काम आहे.

बंद दरवाजापलीकडील ही रहस्यमयता, त्यातील रम्यता अथवा भीषणता, आनंदमयता अथवा शोकात्मता समजून घ्यायची असेल, तर तो बंद दरवाजा उघडण्यासाठी गाठीला चाव्यांचा जुडगा हवा. आपल्या हाती तो लागावा, ही सदिच्छा या प्रसंगी व्यक्त करते आणि संपवते.

'साहित्यसमीक्षे'सारख्या सहजसाध्य नसलेल्या विषयावर एवढा वेळ आपण माझे भाषण शांत चित्ताने ऐकलेत, याबद्दल मी मनापासून सर्वांची ऋणी आहे. धन्यवाद.

---

रेखा इनामदार-साने । चलभाष: ९८६०२०५४३६
स्नेह क्लासिक्स, ७/१ एरंडवने, जोशी पथ २, पुणे-४११००४



अनुक्रमणिका



भाषण

# मराठी साहित्याची समृद्धता, बोली आणि विविधतेच्या परंपरांमुळे

पाचोरा येथे झालेल्या राज्यस्तरीय मराठी बोली साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. किसन पाटील यांच्या अध्यक्षीय भाषणाचा संपादित अंश.

डॉ. किसन पाटील

**भाषा आणि बोली संबंध**

प्रादेशिक (स्थानिक), राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय अशा बहुविध स्तरांवर बहुभाषिकत्वाचे महत्त्व आधुनिक विज्ञान तंत्रज्ञानाच्या युगात अनन्यसाधारण असते. मुळात संपूर्ण जगाचा विचार करता हजारो भाषिक समाज (समूह) आपला लोकसांस्कृतिक वारसा आपापल्या बोलीतून जतन करीत असतात. म्हणूनच एक प्रकारची भाषिक संस्कृती आपल्या समाजात रुजवण्यासाठी बोलीभाषा अनेक दृष्टीने उपयुक्त ठरते. म्हणून भाषा ही सतत चालणारी निरंतर प्रक्रिया असते. समाजाच्या जीवनव्यवहाराची आंतरिक जडणघडण करताना समाजभाषा वैज्ञानिकदृष्ट्या जशी स्थिर असते तशीच ती सातत्याने बदलणारी प्रक्रिया असते. सर्वसाधारण काळासोबत भाषा ही नवनवी रूपे धारण करीत, जुन्यात जुने आणि नव्यात नवे, विचार सूत्रे जतन करण्याचे माध्यम असते. समाज आणि भाषा याचा हा अनुबंध एकत्वासह विविधतेचा संमिश्र आविष्कार ठरतो. यामुळे अति सूक्ष्मतेसह बोलीभाषा ह्या समूह संघटनाचे महत्त्वपूर्ण कार्य करतात. निसर्ग, मानवी समाज, परिसर अभ्यास आणि पर्यावरणासह जीवन व्यवहाराची जडणघडण यातून बोलीभाषेचे स्वतंत्र अस्तित्व समाज घडवून त्याला पिढ्यान्‌पिढ्या टिकवून ठेवतो.

लोकसंस्कृतीच्या परिघात अशा जाती-जमाती लोकसमूहाच्या बोलीभाषेचा परिप्रेक्ष्य प्रदेशासह टिकून राहतो. नव्या युगात, नव्या प्रसारमाध्यमांसह जे बदल घडून येतात त्यामुळे मात्र भाषिक प्रश्न उपस्थित होत असतात. जागतिकीकरणामुळे भाषेच्या संवादात अनाहूतपणे काही इतर भाषांचे शब्दही बोलीत रूढ होऊ लागतात. असे असले तरी बोलीचा संबंध मातीशी असतो. मातीची एक संस्कृती असते. लोकांच्या पिढ्यान्‌पिढ्याची लोकसंस्कृती ही बोलीमुळं जिवंत राहते. बोलीची नाळ ही थेट जन्मापासून मातेशी, म्हणजेच मातृ-संस्कृतीच्या सर्जनशील निर्मितीक्षम निसर्गदत्त भावभावनांशी जोडलेली असते.

**भाषिक अनास्था: समज -गैरसमज**

भाषेचे अभ्यासक, संशोधक आणि सामाजिक - सांस्कृतिक क्षेत्रातील कार्यकर्ते इत्यादींच्या मनात भाषांच्या संदर्भातील काही निरीक्षणे नोंदवली जातात. भाषा लुप्त होतील काय? मौखिक परंपरेतील भाषिक संवाद कमी होत आहेत काय? जनजाती, आदिवासी इत्यादी बोलींचे संरक्षण कसे करता येईल? भाषिक उपक्रमांचे आणि समाजबोलीचे दस्तऐवज कसे जतन करायचे? अशा काही प्रश्नांमुळे सध्या भाषा अभ्यासकांमध्ये अस्वस्थता निर्माण झाली आहे. या प्रश्नांच्या मुळात काही अनुभवनिष्ठ आणि वास्तवपूर्ण मुद्दे लक्षात येऊ शकतात. त्यातून न्यूनगंड, परिस्थितीशरणता आणि राज्यभाषा, ज्ञानभाषा, जागतिकभाषा यांच्या प्रभावात आपली भाषा कमी पडते की काय अशी भीती निर्माण होऊ लागली आहे. याबाबत काही मुद्दे दृष्टिपथात येतात.

आपल्या बोलीत बोललो, तर इतर समाजात, शहरी-विद्यापीठात वातावरणात आपण अनाडी, गावंढळ, मागास, जंगलातले, झाडपी, संस्कृतीहीन, खेडूत, गावठी इत्यादी मानले जातो. म्हणून प्रमाण भाषेत बोलण्याचा प्रयत्न करताना



अनुक्रमणिका



उच्चार दोषांमुळे आपल्यात न्यूनगंड येतो. आपल्या मूळ भाषेपासून आपण तुटत जातो. प्रस्थापित होण्याचा प्रयत्न करतो. भाषेच्या संदर्भातील आपल्या बोलीचं लेबल टाकून देऊन स्वबोलीपासून दूर जाण्याचा प्रयत्न करतो.

आपली मूळ मातृसंस्कृती आणि बोली यांच्या संस्कारापासून नवी सामाजिक व भाषिक जाणीव निर्माण होऊन आपल्या मनात एक द्वंद्व सुरू होते.

नव्या युगात, जागतिकीकरणाच्या चक्रात आमचे आमच्या भाषिक संस्कृतीचे नियंत्रण कमी होऊन प्रवाहाबरोबर वाहताना भाषा बोलीपासून तुटत जाणे.

आदिवासी, भटक्या जाती जमातीची मुले आपल्या भाषेऐवजी मराठी भाषेतून शिकताना माध्यमिक, उच्च माध्यमिकपर्यंत भीतीत राहतात. नंतर अत्यल्प मुले उच्च शिक्षणासाठी जातात. त्यांना इंग्रजीत शिक्षण मिळते. त्यामुळे आणखी नव्या भाषेची भीती वाटते. मुळापासून तुटत जाऊन नव्या समाज संस्कृतीत स्थिर होताना अनेक संकटे वाटतात. आज भारतीय भाषांमधील जे भाषिक प्रश्न आहेत ते केवळ एक समाज जाती-जमातीचे नसून ते सर्व भारतीय समाजात निर्माण झालेले आहे. या संक्रमणात भीती-संशय आणि अस्वस्थता यामुळे भारतीय भाषिक समाजाची विविधता आणि भाषेची विश्वासार्हता धोक्यात आहे काय?

अनेक भाषा शिकणे, आपली भाषा इतरांना शिकवणे, आपल्या भाषेला नामशेष होऊ न देता तिचे दस्तऐवजीकरण करून तिच्या अस्तित्वाला टिकवणे, भाषा जगवण्यासाठी सामाजिक भाषिक चळवळी चालवणे असे उपक्रम करण्याने फायदा होऊ शकेल काय?

बोलीभाषेतून साहित्य निर्मिती करावी, वृत्तपत्रे चालवावी, बोलीभाषा, साहित्यभाषा करून तिला प्रस्थापित करावी. जेणेकरून त्या दस्तऐवजामुळे तरी आपली भाषा टिकवता येईल काय?

बोलीभाषांची प्रकाशन व्यवस्था, वाचनालये आणि शिक्षणासाठी शाळा इत्यादींसाठी शासनाने आणि समाजाने सामुदायिक प्रयत्न केल्याने भाषा टिकवता येतील काय?

सरकारी शैक्षणिक धोरणे, सर्व शिक्षा अभियान, भाषा संवर्धन धोरणे, पाठ्यपुस्तके, ज्ञानात्मक संपादने आणि सिनेमा, प्रसार माध्यमातून बोलीभाषांचे अस्तित्वाला टिकवण्यासाठी प्रयत्न केले, तर बोलीभाषा टिकतील काय?

या काही मुद्यांचा विचार करता भाषा धोरण, भाषा संवर्धन, भाषिक जनगणना, भाषिक सांस्कृतिक विविधता, बोलीभाषांची माहिती संकलित करणे, लोकभाषा-लोकसाहित्यातील विविध घटकांचे संकलन करणे या संदर्भात जागृती करता येऊ शकेल. भाषिक पुनरुत्थान आणि भाषिक धोरणांचा विचार करून भाषाविषयक आस्था व त्याबाबतची निदाने करणे शक्य आहे, असे वाटते. भाषा जगते म्हणजेच एक संपूर्ण आगळीवेगळी लोकसंस्कृती जिवंत राहते, आणि भाषा मरते म्हणजे ती संपूर्ण लोकसंस्कृती नष्ट होते. म्हणजे एकाचवेळी 'वंश (मानव) संहार' घडतो आणि 'शब्द संहार' ही घडतो. असे हे भाषा लुप्त होण्याचे दुधारी शस्त्र मानववंशावर चालते.

भाषांच्या संदर्भात अमेरिकेत डॅनियल अब्राम यांनी केलेल्या संशोधनानुसार भाषांचे भविष्य काय असेल? कोणत्या भाषा जिवंत राहतील व नाश होतील? ज्या भाषा समाजास व्यवसाय देऊ शकत नाहीत त्यांचे भवितव्य काय? अशा भाषा बोलणारे भाषिक समाज आपली भाषा सोडून देतात काय? अशा प्रश्नांची सर्वेक्षणात्मक माहिती घेऊन त्यांनी असे म्हटले आहे की, २१व्या शतकाच्या शेवटपर्यंत जगात सुमारे तीनशे भाषाच अस्तित्व टिकवून ठेवू शकतील. असे असले तरी हा एक विचार आहे. तो सकारात्मक-नकारात्मक पातळीवर वेगळी चर्चा करण्यास उपयुक्त ठरतो.

भारतात २००१ च्या जनगणनेनुसार भाषांचे अस्तित्व दाखवणारा मुद्दा डॉ. श्री. गणेश देवी आणि श्री. अरुण जाखडे यांच्या 'लोकसर्वेक्षण महाराष्ट्र' या ग्रंथात सविस्तर-सप्रमाण मांडलेला आहे. एक महत्त्वाचे अभ्यासपूर्ण भाषा सर्वेक्षणाचे महान कार्य त्यामुळे घडले आहे. मराठी भाषेच्या बाबतीत महाराष्ट्रातील स्थितीचा अभ्यास खूप बोलका ठरतो. महाराष्ट्रात ७२ टक्के लोक मराठी भाषिक आहेत, तर उरलेले सिंधी, तमीळ, तेलगु, उर्दू, गुजराती, हिंदी, कन्नड आणि कोंकणी बोलणारे भाषिक समूह आहेत, असे प्रतिपादन केले आहे. यामध्ये सर्व जनजाती, भटके-आदिवासी यांचाही समावेश महाराष्ट्रातील म्हणून मराठीच्या उपबोली म्हणून गृहीत धरला असावा. प्रमाण मराठी आणि तिच्या बोली याबाबत अधिक सखोल सर्वेक्षण होण्याची आवश्यकता आहे. १८७१ मध्ये झालेली जनगणना नंतर १९३१ पर्यंत झालेली जनगणना यामुळे बरेच प्रमाणात माहिती उपलब्ध होत असली तरी ती अपूर्णच ठरते, १९३१ नंतर जाती आणि भाषा इत्यादींची सखोल जनगणना शास्त्रीय पद्धतीने झाली नाही. स्वातंत्र्योत्तर काळातही त्याचा अभाव असावा, ही बाब खूप चिंतनीय ठरते. बोली भाषांचा पहिला सर्व्हे जॉर्ज अब्राहम ग्रिअर्सन यांनी केला. सुमारे २० ते २५ वर्षे हे कार्य त्यांनी केले. तोच काय एक आधार भारतीय भाषांबाबत

मध्यवर्ती मानला जातो. अलीकडे मा. गणेश देवी यांनी भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण हाती घेऊन त्याचे सुमारे पन्नास ग्रंथ संपादित करण्याचे कार्य आरंभिले. ही अद्वितीय बाब म्हणावी लागेल. श्री. अरुण जाखडे आणि सहकारी मंडळीने 'महाराष्ट्र' खंड संपादित करून मराठी आणि तिच्या बोलीबाबत केलेले कार्य एक महत्त्वपूर्ण दस्तऐवज ठरतो. त्यामध्ये मराठी आणि तिची विविध रूपे (बोली) या स्वरूपात सुमारे ६० बोलीभाषांचा परिचय, उपयोजित मूल्ये, भाषिक जडण-घडण, शब्द-अर्थासह उपयोजन, बोलींची स्वरूप वैशिष्ट्ये आणि इतर घटकांचे संकलन केले आहे. त्यामध्ये प्रामुख्याने मराठी, अहिराणी, आगरी, कोहळी, खानदेशी लेवा, चंदगडी, झाडी, तावडी, पोवारी, मालवणी, वऱ्हाडी, वाडवळी, सामवेदी, संगमेश्वरी तसेच आदिवासी, भटक्या विमुक्त अशा विविध साठ बोलींचा परिचय आढळतो. या संपादकीयात मा. अरुण जाखडे म्हणतात, 'महाराष्ट्राची भाषिक संस्कृती बहुआयामी आणि बहुविध आहे, ती दुर्मिळ होत आहे आणि तिच्या भविष्याविषयी अनेकांना चिंता आहे. त्यांना वाटणाऱ्या कुतुहलाचे हे खरे कारण आहे. भविष्यात काय होणार हे सांगणे कठीण आहे; परंतु यानिमित्ताने ह्या प्राचीन भाषिक संस्कृतीचे, तिच्या परंपरेचे स्मरण झाले, नोंद करता आली.'

**साहित्य आणि बोलींची परंपरा : विविधतेतील एकता**

खानदेशातील बोलीबाबत श्री. सुधीर रा. देवरे यांनी, 'अहिराणी ही एक विशिष्ट जाती-जमातीची बोलीभाषा नसून खानदेशात वास्तव्य करणाऱ्या सर्वसामान्य लोकांची (सर्व जाती-जमातींची) लोकभाषा आहे.' हे विधान केले आहे. ते सर्व-समावेशक आणि वस्तुनिष्ठ असेच आहे. बोली ही प्रादेशिक लोकसंस्कृतीचे माध्यम असते म्हणून तिचा उल्लेख जाती-जमातीपेक्षा स्थान-प्रदेश असाच महत्त्वाचा ठरतो. अर्थात अपवादात्मक लहान लोक समूह आणि त्यांची गुप्तभाषा याला मर्यादा ठरते. भटक्या जमाती, व्यवसाय करणारे अत्यल्प लोक अशा सांकेतिक स्वबोलींची निर्मिती करून तिचा समूहांतर्गत वापर करू शकतात.

'बोली' या शब्दातच 'बोलणे' म्हणजे 'मौखिक संवाद' असा अर्थ प्रकट होतो. लोकसंस्कृतीची जी मौखिक शब्द-शरीर सांस्कृतिक रूपे आहेत त्यामध्ये 'बोली' (भाषा) हा घटक खूप महत्त्वाचा ठरतो. पशू-पक्षी, प्राणी आणि निसर्गातील ध्वनी, स्वर, नाद यांचा प्रभाव होऊन मानवाने आपल्या भावना, विचार, कल्पना, अनुभव व्यक्त करण्यासाठी शारीरकृती, देहबोली, करपल्लवी सोबतच स्वरइंद्रियांचा वापर करून ध्वनिरूपांतून बोलण्याची कला अवगत केली. ही त्याची बोलीभाषेची निर्मिती, हा एक व्यावहारिक; परंतु सर्जनशील प्रयोग पुढे बोलीच्या, ध्वनी, स्वर, नाद आणि शब्द-अर्थासह प्रचलित झाला. त्या प्रयोगाला समूहाची मान्यता आणि स्वीकार मिळाला. अनेक समूहाचे अंतर्गत व्यवहार आणि विचार यांच्या आदान प्रदानातून बोलीचे क्षेत्र आणि उपयोजन वाढत गेले. शेती-कृषी कर्म, जीवन-व्यवहारातील सण, उत्सव, विधी आणि लोकपरंपरांच्या संदर्भात मौखिक शब्दरूपे निर्मितीचे कार्य क्रमशः घडत गेले. बोली लोकसंवाद, लोकव्यवहार आणि लोकज्ञानासह लोकसंस्कृतीची वाहक (माध्यम) बनली. प्रगत होत असलेल्या लोकसमूहाच्या शारीर आणि शब्द अशा सर्वच परंपरांसह लोककलांच्या निर्मिती-सर्जना व्यवहारांचे प्रकटीकरण बोलीतून होऊ लागले. बोली जशी लोकसाहित्य, लोकगीत-वाङ्मयाचे मौखिक माध्यम होती तशी ती आधुनिक काळात, लिखित परंपरेत ज्ञान आणि साहित्य निर्मितीची भाषा होऊन, देवनागरी लिपीत ध्वनी उच्चारांसह वास्तवपूर्ण प्रकट झाली. त्यामुळे अभिजात मराठीत जसे साहित्य लेखन होऊ शकले. तसेच पुढच्या काळात लोकपरंपरेतून शिक्षण घेऊन पुढे आलेल्या पिढीत बोलीभाषेतून वाङ्मय निर्मिती घडत गेली. महदंबेचे धवळे, चक्रधरांचे लीळा चरित्र, संतकाव्यातील रचना आणि तंत (शाहिरी) काव्यातील साहित्य रचना निर्मितीला, 'बोली' चे माध्यम खूप जवळचे वाटू लागले. शासनकर्त्यांची राज्यकारभार आणि व्यवहाराची भाषा ही मूळ बोलीचे उपयोजित प्रशासकीय रूप आहे. प्रशासनाचा पत्र व्यवहार आणि कारभाराचे माध्यमात त्या त्या काळातील सत्ताकारणाचा प्रभाव असतो. त्यांचे स्वरूप शिलालेख, भूर्जपत्र खलिते, दानपत्रे, राज्यव्यवहारकोश आणि बखरी, चरित्रे इत्यादी लेखनातून जाणवते. महानुभाव वाङ्मय, शाहिरी वाङ्मय आणि संतवाङ्मयातून जीवनाविषयीच्या तत्त्वज्ञानासह लोक व्यवहारांचे संदर्भ आणि अध्यात्म जाणिवा इत्यादींचा प्रभाव आढळतो. अडाणी-अज्ञानी लोकमाणसाला प्रबोधन करून त्यांना वळण लावायचे, तर त्यांच्या बोलीतून हा ज्ञानमार्ग जाऊ शकतो. याचे यथार्थ भान या अभिजनेतर वाङ्मयात सुस्पष्ट दिसून येते. शिवशाहीनंतर आलेल्या पेशवाईमुळे संस्कृतप्रचूरता आणि अभिजनवादी संस्कृतीचा प्रभाव भाषिक-वाङ्मयीन संस्कृतीवर पडलेला अनुभवता येतो. म्हणून बोलीतील शब्द-ध्वनी-उच्चार म्हणजे गावंढळ, अडाणी, संस्कृतीहीन, मागासलेले असा

गैरसमज मुद्दाम पसरवण्यात आला. राजकीय सत्तेप्रमाणेच भाषिक सत्ता आपल्या हाती राहावी, असा कुटील विचार भाषा संवर्धनाला मारक ठरतो.

भाषिक, वाङ्‌मयीन आणि सास्कृतिक क्षेत्रात उच्चवर्ग आणि महानगरी संस्था तसेच पदाधिकारी यांचे वर्चस्व सर्वत्र उमटलेले आढळते. वास्तविक विचार करता बोलींच्या व्यापक क्षेत्रात जे लहान समूह साहित्य-संस्कृतीचे संवर्धन करतात, त्यांचे कार्यप्रसार माध्यमे आणि विविध चळवळींत अपरिचित राहते. त्यांना ही मोठी व्यासपीठे वापरण्याची संधी मिळत नाही. अशा वेळी प्रादेशिक आणि बोली भाषांची साहित्य संमेलने उपयुक्त ठरतात. अ. भा. साहित्य संमेलनापेक्षा अधिक संख्येने भरणारी ही संमेलने आणि त्यातील गुणवत्ता लक्षात घेता खूप महत्त्वपूर्ण कार्य करीत असतात. तालुका, जिल्हा आणि विभागीय स्तरांवरील ही संमेलने बोलीभाषा- साहित्य आणि संस्कृती संवर्धनासाठी कटिबद्ध असतात. सर्वसमावेशक आणि सर्वांना सोबत घेऊन जाण्याची त्यांची बोली भाषेची परंपरा महत्त्वाची ठरते. ग्रामीण, दलित, बोली, आदिवासी, स्त्रीवादी, जनसाहित्य, कामगार आणि गुराखी इत्यादी संमेलनांतून नवनव्या सर्जनकारांच्या प्रतिभेचा परिचय होऊन साहित्य-संस्कृतीचे दालन समृद्धच होत असते. त्यासाठी अभिजात आणि बोली किंवा प्रमाण आणि बोली हा वाद अप्रस्तुत वाटतो. गुरुदेव रविंद्रनाथ टागोरांच्या 'गीतांजली' चे मूल स्वरूप बंगाली (बोली) भाषेचे होते. त्याचे अन्य भाषांत अनुवाद झाले. इंग्रजी अनुवादामुळे त्याला जागतिक साहित्यात स्थान मिळाले. नोबेल पुरस्काराने गौरव होऊ शकला. मातीची ओढ, तिच्या सर्जनशीलतेच्या वेणा आणि निसर्गदत्त शाश्वत जीवनमूल्यांची मानवता यामुळे 'बोली'चे वास्तव्य हेच विश्वाचे आर्त होऊन वैश्विकतेला गवसणी घालू शकते. म्हणून मराठी साहित्याला बोलींची आणि विविधतेची परंपरा लाभल्यामुळे त्याचे दालन अधिक समृद्ध आणि सशक्तपणे उभे राहू शकले. त्याचा परिचय भारतीय भाषांच्या सर्वच साहित्य परंपरेतून दिसून येतो.

साने गुरुजींनी त्यासाठीच 'आंतरभारती' हा भाषा-भगिनींच्या सांस्कृतिक एकात्मतेचा प्रयोग सांगितला होता श्री. गणेश देवी यांनी या प्रयोगाच्या विस्तारातूनच 'भारतीय भाषा सर्वेक्षणाचे' शिवधनुष्य समर्थपणे उचलले आहे. जगाच्या भाषिक इतिहासात भारतीय भाषांचे विविध पैलू आणि शाश्वत एकात्मभाव यांचा सुंदर समन्वय घडवता येऊ शकतो, याचे ते आदर्श उदाहरण ठरते.

---

डॉ. किसन पाटील
चलभाष : ९८९०६१२२२८



समीक्षा

# मराठी कादंबरीचे बदलते स्वरूप : एक अवलोकन (१९७५-२०००)

मराठी कादंबरीच्या बदलत्या स्वरूपाचा समीक्षक डॉ. अरुण कोळेकर यांनी घेतलेला विचक्षण वेध.

प्रा. डॉ. अरुण कोळेकर

**प्रास्ताविक :**

साहित्याच्या कथा, कविता, नाटक इ. वाङ्मय प्रकारांप्रमाणेच कादंबरी हा एक वाङ्मय प्रकार आहे. कादंबरी हा निवेदनप्रधान साहित्यप्रकार असल्याने त्यात सांगण्यासारखा मजकूर भरपूर असतो. कादंबरी हा जीवनव्यवहाराबरोबर प्रवास करणारा प्रवाही असा साहित्य प्रकार आहे. जीवनव्यवहाराच्या केंद्रस्थानी मनुष्य असतो. कादंबरी हा जीवनप्रवाहाशी समांतर चालणारा वाङ्मयप्रकार असल्यामुळे स्वाभाविकच त्याचा आवाका मोठा आहे. परिणामतः समाज, त्यातील व्यक्ती, त्यांचे जीवन या साऱ्यांचे संबंधासह जगणे कादंबरीत येते. कादंबरीकार हा सर्व आवाका लक्षात घेऊन त्याच्या परीने जीवनदर्शन घडविण्याचा प्रयत्न करीत असतो.

मराठी कादंबरीने आजवर अनेक वाटा आणि वळणे अनुभवली आहेत. तिने मानवी जीवनाला आणि जगण्याच्या सगळ्या शक्यतांना स्पर्श केला. त्याचे प्रत्यंतर आजवरच्या मराठी कादंबरी लेखनात येते. प्रस्तुतच्या लेखात मराठीतील १९७५ नंतरची महानगरीय कादंबरी, ग्रामीण कादंबरी, दलित कादंबरी, राजकीय कादंबरी व स्त्रियांचे कादंबरी लेखन यांचा थोडक्यात परामर्श घेण्याचा प्रयत्न केला आहे.

**महानगरीय मराठी कादंबरी :**

महानगरीय कादंबरीने मराठी कादंबरीचे क्षेत्र विस्तार पावले आहे. अशा कादंबरी लेखनाने आपले एक स्वतंत्र अस्तित्व निर्माण केले आहे. ज्या कादंबऱ्यांतून महानगरीय जीवनाचे दर्शन घडते, असे आपण मानतो त्यातील बहुसंख्य कादंबऱ्या 'मुंबई' सारख्या महानगरीचेच जीवनवास्तव शब्दांकित करताना दिसतात. मराठी कादंबरीत महानगराचे जीवनदर्शन घडविणाऱ्या कादंबरीकारांमध्ये श्री. ना. पेंडसे (हत्या, आकांत, ऑक्टोपस), जयवंत दळवी (चक्र, कहाणी, आल्बम), भाऊ पाध्ये (डोंबाऱ्याचा खेळ, करंटा, वैतागवाडी, बॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर, राडा, अग्रेसर, वॉर्ड नं.७, सर्जिकल, वणवा, होमसिक ब्रिगेड, जेल बर्ड्स), मधु मंगेश कर्णिक (माहिमची खाडी, वारूळ), सुभाष भेंडे (आदेशी, अंधारवाटा), ह.मो.मराठे (सॉफ्टवेअर, मार्केट, इतिवृत्त, कलियुग), रघु दंडवते (वसेचिना), अनंत कदम (किडे, दिवसाच्या अंधारात), अरुण साधू (मुंबई दिनांक, सिंहासन, झिपऱ्या, तडजोड), मधु साबणे (घरदार), वसंत आबाजी डहाके (अधोलोक), संजीव खांडेकर (अशांत पर्व), अरविंद रे (सात पावलं उलटी) संजय जोशी (नचिकेताचे उपाख्यान) या आणि यांसारख्या काही लेखकांच्या कादंबऱ्यांचा निर्देश करता येईल.

महानगरीय कादंबऱ्यांच्या प्रांतात ठळकपणे लक्षात राहणारे नाव म्हणजे भाऊ पाध्ये. महानगरीय जाणिवा अधोरेखित करणारे ते एक महत्त्वाचे कादंबरीकार आहेत. त्यांच्या दहा कादंबऱ्या मुंबई या महानगराचे अतिव्यामिश्र, गुंतागुंतीचे व नानाविध जगण्याचे दर्शन घडवितात. 'होमसिक ब्रिगेड' ही त्यांची कादंबरी दिल्लीसारख्या महानगरीचे चित्रण करते. भाऊ पाध्ये यांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन सर्वस्वी वेगळा, नवा असल्याकारणाने



अनुक्रमणिका



महानगरीय जीवनवास्तवाला ते थेटपणे भिडतात, सामोरे जातात. त्यांचे कादंबरीविश्व सर्व स्तरांतील, वर्गातील माणसांना कवेत घेते. महानगरामधील उच्चवर्गीय जगण्याचे तपशीलवार चित्रण 'वणवा', 'राडा', 'अग्रेसर' यांसारख्या कादंबऱ्यांमधून रेखाटले आहे. भाऊ पाध्ये सारखे कादंबरीकार महानगरातील उच्चवर्गीय पोटसंस्कृतीचे जे अंतःस्तर उलगडून दाखवितात, त्यामधून जी समग्रता मांडतात ती इतर महानगरीय कादंबरीकारांना जमेल, असे नाही. त्यांच्या 'वैतागवाडी', 'बॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर', 'वॉर्ड नं.७' व 'सर्जिकल' सारख्या कादंबऱ्या महानगरातील मध्यमवर्गीयांचे जीवनचित्रण करतात, तर 'करंटा', 'जेल बर्ड्स' 'अग्रेसर' या कादंबऱ्यांमधून महानगरामधील सामान्य माणसाचे जगणे मांडले आहे. या सर्वच घटकांतून आविष्कृत होणारी त्यांची जीवनविषयक दृष्टी आणि व्यापक असा सहानुभव या गुणवैशिष्ट्यांनी त्यांची कादंबरी वेगळी ठरते.

महानगरामधील बकाल, कंगाल वस्त्यांचे जे जीवनचित्रण मराठी कादंबरीत अधिक प्रमाणात आले आहे. त्यामध्ये 'चक्र', 'वासुनाका', 'माहिमची खाडी', 'धुमसणारे शहर', 'झिपऱ्या', 'दिवसाच्या अंधारात', 'तो आणि त्यांचा मुलगा' यांसारख्या कादंबऱ्यांचा निर्देश करता येईल; पण येथेही भाऊ पाध्ये यांची 'वासुनाका' वेगळी ठरते. याचे कारण या बकालपणाचा वास्तव वेध घेण्याच्या पाठीमागे कादंबरीकाराची व्यापक सहानुभूती व मानवतावादी दृष्टिकोन दृग्गोचर होताना दिसतो. त्याला ते अधिक न्याय व जिवंतपणा मिळवून देतात.

मराठी कादंबरीच्या क्षेत्रात अलीकडच्या काळातील बहुराष्ट्रीय कंपन्यांचे झालेले आगमन आणि त्याच्या परिणामातून वाढलेली महानगरातील कारखानदारी, त्यातील उलथापालथी याचे नवे जग चित्रित होताना दिसते. त्यामध्ये ह. मो. मराठे यांची 'सॉफ्टवेअर मार्केट', संजीव खांडेकर यांची 'प्रशांतपर्व' आणि संजय जोशी यांच्या 'नचिकेताचे उपाख्यान' कादंबऱ्यांचा निर्देश करता येईल.

थोडक्यात १९७५ नंतर मराठीतील महानगरीय कादंबऱ्यांमधून वेगवेगळ्या उपसंस्कृतींचे चित्रण झाले आहे; परंतु महानगराला समग्रतेने कवेत घेणारा भाऊ पाध्ये यांच्यासारखा कादंबरीकार सोडला, तर इतर कादंबरीकारांना ते पेलता आलेले नाही. त्यांची 'होमसिक ब्रिगेड' सारखी महानगरीय कलाकृती तर बेगडी जगण्याचा छेद घेत अस्सल जगण्याच्या आकांक्षेचा तळ गाठते. त्यामध्ये भाऊ पाध्ये यांच्या महानगरीय जीवनचित्रणाच्या शक्तीचे श्रेष्ठपण आपल्या नजरेत भरते. याठिकाणी भाऊ पाध्ये यांच्या संदर्भात दिलीप चित्रे यांनी जे म्हटले आहे, ते नोंदविण्यासारखे आहे. ते लिहितात, 'आणखी तीन-चार हजार वर्षांनी मुंबईचे कोणतेही अवशेष न सापडता फक्त भाऊंची पुस्तके मिळाली, तर हे शहर आता आहे तसं डोळ्यांसमोर आणता येईल.' (दिलीप चित्रे, 'समकालीन आणि बाकीचे सगळे', उगवाई, वर्ष-११, अंक-२, १९९८, पृ.२०) तर राजन गवस यांनी भाऊ पाध्ये यांच्या महानगरीय कादंबऱ्यांचे यश कशात दडले आहे? याचा शोध घेतला असता त्यांना जे जाणवले त्याविषयी ते म्हणतात, 'भाऊ पाध्ये यांच्या यशाचे कारण त्यांची लेखक म्हणून असणारी संवेदनशीलता ठरावीक एका वर्गाशी, उपसंस्कृतीशी निगडित राहत नाही. सर्वच उपसंस्कृतींचे, वर्गांचे, व्यवसायांचे चित्रण ते व्यापक सहानुभावातून व मानवतावादी भूमिकेतून करतात.'' (विलास खोले (संपादक), गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी, लोकवाङ्मय गृह, २००२, पृ. १८९.) ही दोन्हीही मते स्वीकारशील, अचूक निरीक्षण असणारी आहेत.

**स्त्रियांचे कादंबरी लेखनः**

१९७५ हे वर्ष महिलांच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असे ठरले आहे. आंतरराष्ट्रीय महिला वर्षानंतर महाराष्ट्रात स्त्रीवाद, स्त्रीमुक्तीसारख्या संकल्पना मूळ धरू लागल्या. त्याची चर्चा-चिकित्सा होऊ लागली. महिलाविषयक जनजागृती, तिच्या प्रश्नांविषयी एक व्यापक चर्चा अनेकविध माध्यमांतून होऊ लागली. याचा अनुकूल फायदा होऊन स्त्रियांनी उत्साहाने कादंबरी लेखन करण्यास सुरुवात केली.

या कालखंडात मराठीमध्ये स्त्री कादंबरीकार म्हणून गौरी देशपांडे, अंबिका सरकार, आशा बगे, शांता गोखले, सानिया यांचा उल्लेख करता येईल. या लेखिकांनी कादंबरी लेखन करून वाचकांचे लक्ष आपल्या लेखनाकडे वळविले. गौरी देशपांडे यांनी 'एकेक पान गळावया' (१९८०), 'काही दूरपर्यंत' (१९८०), 'तेरुओ' (१९८२), 'निरगाठी' (१९८४), 'थांग' (१९८६), 'चंद्रिके गं, सारिके गं' (१९८७), 'दुस्तर हा घाट' (१९८८), 'मुक्काम' (१९९२), 'गोफ' (१९९९), 'उत्खनन' (२००१) या सर्व लघुकादंबऱ्यांमधून स्वतंत्र घाटाच्या शक्यता अजमावून पाहिल्या. उच्च मध्यमवर्गीय आणि विदेशी वातावरण, त्यात वावरणारी पात्रे आणि जीवनाविषयीचा स्वतंत्र आणि आधुनिक दृष्टिकोन यांमुळे त्यांच्या कादंबऱ्या वेगळ्या ठरल्या. स्त्री-पुरुषांच्या व इतरही नात्यातल्या 'प्रेमा' च्या

सूक्ष्म छटा त्यांनी उत्कटपणे दाखविल्या. जीवनाच्या सर्व अंगांचे, त्यातील मोह आणि वेदना यांचे भान असणारी लेखिका म्हणून ह्या महत्त्वाच्या ठरतात.

आशा बगे यांची १९७५ नंतरच्या पिढीतील महत्त्वाच्या लेखिकांमध्ये गणना होते. त्यांनी 'मनस्विनी' (१९७८), 'झुंबर' (१९८४), 'त्रिदल' (१९९४) आणि 'सेतू' (२०००) या कादंबऱ्यांतून स्त्री-पुरुष नात्यांचा, त्यांच्या मनोविश्वातील आंदोलनाचा आणि उलथापालथीचा वेध घेतला आहे. सानिया यांच्या 'स्थलांतर' (१९९४), 'आवर्तन' (१९९७) या कादंबऱ्यांमधून स्त्रीपात्रे केंद्रस्थानी येतात. जीवनातल्या घुसमटून टाकणाऱ्या स्थितीतून ही पात्रे जातात; परंतु निराश न होता पुन्हा उभारी घेण्याचा प्रयत्न करतात. काळानुसार बदललेल्या जीवनप्रणाली किंवा विचारानुसार ती पात्रे जगताना दिसतात. अंबिका सरकार यांची 'एका श्वासाचे अंतर'(१९९०), शांता गोखले यांची 'रीटा वेलिणकर' (१९९०), ज्योत्स्ना देवधर यांची 'पडझड' या कादंबऱ्यांचाही निर्देश करता येईल.

या कालखंडात वरील कादंबऱ्यांमधील अनुभवविश्व कुटुंब, त्यामध्ये असणाऱ्या माणसांचे नातेसंबंध आणि पुरुषांशी असलेल्या जवळिकीतून किंवा दूरत्वातून निर्माण होणारे ताण-तणाव यापुरते मर्यादित राहते. त्यामधून समकालीन आधुनिक जीवनशैलीचे चांगले-वाईट पैलू प्रकाशात येतात. यामधून एकत्र कुटुंब पद्धतीचा लोप, नोकरी-अर्थार्जनाने वाढलेला आत्मविश्वास आणि स्वतंत्रपणे स्वतःचे निर्णय घेऊन जगण्याची आकांक्षा चित्रित झाली आहे. कधी ती सामाजिक परिस्थितीच्या रेट्याने उत्पन्न होते व वाढीला लागते. प्रखर आत्मभान जाग्या झालेल्या अनेक स्त्रिया यांच्या कादंबरीविश्वात आपणाला भेटतात, त्या ठेचकाळतात, धास्तावतात, कुढतात. हव्या- नको असलेल्या पुरुषांचे स्वामित्व, वर्चस्व त्या नाकारताना दिसतात. केवळ लौकिक बाबतीतच नव्हे तर भावनिक दृष्ट्यादेखील त्या स्वयंपूर्ण होण्यासाठी स्वतःच्या मनाशी संघर्ष करतात, झगडतात यांच्या कादंबऱ्यातील पात्रे आपल्या आयुष्यात मैत्री, मैत्रभाव हे सर्वोच्च असे मूल्य मानतात. या नात्याची कितीतरी प्रौढ, परिपक्व रूपे गौरी देशपांडे यांच्या कादंबरीत दिसतात. रक्ताची नाती असतात. स्त्रिया विवाहित असतात; पण तरीही त्यांच्या आयुष्यात स्वाभाविकपणे मित्र येतात.

या लेखिकांनी आपल्या कादंबरी लेखनातून लग्न, कुटुंबसंस्थेला पर्याय शोधण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. विवाहाने नेमके काय साधते? या प्रश्नाचा शोध प्रत्येकजण घेत आहे. त्यांच्या मनात लग्नासंबंधी संभ्रम असला तरी मातृत्वाची मात्र ओढ असते. या स्त्रियांच्या कादंबऱ्यांचे सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे प्रचलित समाजव्यवस्था



अनुक्रमणिका

बदलली की, आपले प्रश्न सुटतील असा भरवसा नसतो. काही प्रश्न व्यवस्थेमुळे निर्माण होतात, हे जरी खरे असले तरी काही प्रश्न माणसांच्या विशिष्ट स्वभावामुळे, त्यांच्या परस्पराशी बसलेल्या निरगाठीमुळे बिकट होतात. याचे भान या सर्व लेखिकांना आहे.

या कादंबऱ्यांमधील कथनरीतींचे वैविध्यही लक्षात घेण्यासारखे आहे. गौरी देशपांडे यांच्या 'गोफ' (१९९९) व सानियांच्या 'स्थलांतर' (१९९४) मध्ये पात्रमुखी कथनपद्धतीचा अवलंब केला असल्यामुळे एकाच घटनेकडे वेगवेगळ्या दृष्टिकोनातून पाहणे शक्य होते. यामधून मध्यमवर्गीय, उच्चमध्यमवर्गीय शहरी स्त्रीच्या भावविश्वातील गुंतागुंत चित्रित झाली आहे. प्रतिमा इंगोले यांच्या 'बुढाई' (१९९९) या कादंबरीमध्ये मात्र तळागाळातील, कष्टकरी समाजाच्या 'गोकर्णा' सारख्या स्त्रीच्या जीवन संघर्षाची व तिच्या वाट्याला आलेल्या भोगाची करुण कहाणी मांडली आहे. एवढा एक अपवाद सोडला, तर या कालखंडात ग्रामीण, दलित जीवनाचे चित्रण करणारी स्त्री कादंबरीकार आढळत नाही.

स्त्रियांच्या कादंबरी लेखनातील अर्धशतकाकडे पाहताना, रेखा इनामदार-साने यांनी नोंदविलेले मत उल्लेखनीय आहे. त्या लिहितात, 'आधुनिक जीवनपद्धतीने निर्माण झालेले पेच या लेखिका मांडण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या जगाचा आवाका/परिघ फार विस्तारलेला नाही; परंतु त्यांच्या लेखनाला ज्या मर्यादा पडतात, त्या आपल्या सामाजिक परिस्थितीचाच परिपाक आहेत.' विलास खोले (संपादक), 'गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी', लोकवाङ्मय गृह, २००२, पृ. १४०) त्यांचे हे निरीक्षण योग्य आहे असे म्हणता येईल.

**ग्रामीण कादंबरी :**

१९६० नंतर ग्रामीण कादंबरीचा प्रवाह सशक्त होत गेलेला दिसतो. साधारणतः १९६० नंतरच्या काळात एकूण भारतीय जीवनात अनेकविध स्वरूपाचे बदल झालेले दिसतात. महानगराचा अतिशय वेगाने विकास होऊ लागला. त्याचवेळी ग्रामीण भागात मात्र पडझड सुरू झाली. जुनी ग्रामव्यवस्था खिळखिळी होऊन अनेकविध प्रकारचे ताण-तणाव जन्माला येऊ लागले. नव्या यंत्रयुगाने खेड्या-पाड्यांत प्रवेश केला. अनेकविध नव्या सुधारणाही ग्रामीण भागात येऊन पोहचल्या आणि या सगळ्यांमुळे ग्रामीण भाग ढवळून निघाला. ग्रामीण भागात निर्माण झालेल्या या अनेकविध प्रश्नांमुळे ग्रामीण भागातून स्थलांतरालाही प्रारंभ झाला.

वास्तवाभिमुखता हे अलीकडच्या काळातील ग्रामीण कादंबरीचे वेगळेपण चटकन लक्षात येते. आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही अंगांनी मराठी कादंबरीमध्ये आमूलाग्र बदल नव्याने प्रकट व्हावयाला लागले. चित्रणक्षेत्राचा पट अधिकच विस्तृत झाला आणि त्यातून ग्रामीण जीवनाची समग्रता प्रकट होण्याची शक्यता निर्माण झाली. या कालखंडातील कादंबरीतून नवे नवे चित्रणविषय आले. त्या निमित्ताने वास्तव प्रकटनाची व्याप्ती वाढली. लेखक वास्तवाचे नुसते चित्रण करीत नाही, तर त्याच्या जडण-घडणी मागील कारणाचा, जीवनवास्तवाचा शोध घेऊ लागले. धर्म, परंपरा, राजकारण, ग्राम आणि शहरे यांचा सबंध आणि यांसारखे अनुभवविषय या कालखंडात महत्त्वाचे ठरले. ग्रामीण जीवनाचे चित्रण करू लागले.

राजन गवस यांच्या 'चौंडक' (१९८५), 'भंडारभोग' (१९८८) आणि उत्तम बंडु तुपे यांच्या 'झुलवा' (१९८६) या कादंबऱ्यांमधून धर्म आणि धर्मसंस्था यांच्या अनुषंगाने मानवी जीवनाचे-विशेषतः ग्रामीण जीवनाचे कसे शोषण होते याचे चित्रण येताना दिसते. धर्माच्या नावाने विशेषतः स्त्रियांचे ते ही खालच्या स्तरातील स्त्रियांचे शोषण यातून प्रकट झाले आहे. वास्तवाबरोबरच या स्त्रियांच्या दुःखाच्या मुळाशी काय आहे याचा मोठ्या निर्भीडपणे शोध घेतला आहे. अशोक व्हटकर यांची 'बगाड' (१९८४) ही कादंबरी यादृष्टीने लक्षणीय आहे. नामदेव कांबळे यांची 'राघववेळ', राजन गवस यांची 'तणकट', नामदेव ढसाळ यांची 'हाडकी हाडवळा' (१९८१), विजय शिरसाट यांच्या 'कुस्ती' आणि 'काळगर्भ' या कादंबऱ्या ग्रामीण भागातील दलित-सवर्ण संघर्ष, दलितांतर्गत संघर्ष, दलितांचे शोषण यांचे प्रत्ययकारी चित्रण करतात.

स्वातंत्र्योत्तर काळात विकास आणि नियोजन यांच्या नावाखाली विकास कोणाचा आणि कोणाच्या जीवावर याचा शोध या कालखंडातील कादंबरीकार घेताना दिसतात. साखर कारखानदारीसारख्या उद्योगाकडे, औद्योगिकीकरणाकडे त्यांनी शोधक दृष्टीने पाहिले आहे. या संदर्भात त्र्यंबक असरडोहकर यांची 'काळी आई' (१९८०), विश्वास पाटील यांची 'झाडाझडती' (१९९१), मोहन पाटील यांची 'बस्तान' (१९९७), सदानंद देशमुख यांची 'तहान' (१९९८), बा. ग. केसकर यांची 'कुणाच्या खांद्यावर', सरदार जाधव यांची 'कोयता', पुरुषोत्तम बोरकर यांची 'मेड इन इंडिया' (१९८७), रंगनाथ पठारे यांची 'रथ' (१९८४),

राजन गवस यांची 'कळप', बाबाराव मुसळे याची 'हाल्या हाल्या दुदु दे' (१९८५), रवींद्र शोभणे यांची 'कोंडी'(१९९२), महादेव मोरे यांची 'झोंबड' (१९९०) या ग्रामीण कादंबऱ्या लक्षवेधक ठरल्या आहेत.

१९७५ नंतरची मराठी कादंबरी अधिकाधिक वास्तवाभिमुख होत आहे. त्यातून ग्रामीण कादंबरीही लक्षणीय झाली आहे. उद्याची ग्रामीण कादंबरी अधिक अर्थवत्ता धारण करणारी असेल, अशी आशा करता येईल.

**दलित कादंबरी :**

मराठी साहित्यात दलित साहित्याचा एक जोमदार प्रवाह १९६० नंतर निर्माण झाला. या प्रवाहाने मराठी साहित्यात अनेक नव्या गोष्टींची भर घातली हे आज सर्वमान्य झाले आहे. आशय आणि अभिव्यक्तीच्या संदर्भातील दलित कादंबरीचे वेगळेपण चटकन नजरेत भरणारे आहे.

अनेक दलित लेखकांनी दलित जीवनचित्रण केले असले तरी त्यांपैकी अलीकडच्या लेखकांमध्ये भीमसेन देठे, नामदेव ढसाळ, नामदेव कांबळे, ना. म. शिंदे यांसारख्या लेखकांनी दलितांच्या जीवनाचे अस्सल वास्तवपूर्ण आणि विविधांगानी चित्रण केल्याचे दिसून येते.

दलितेतरांच्या कादंबरीमध्ये महार, मांग, चांभार, देवदासी, आदिवासी, पारधी, तमासगीर आदी झोपडपट्टीय जीवन जगणाऱ्या दलितांचे जीवनचित्रण आलेले आहे; परंतु दलितांमधील इतर उपेक्षित समाजस्तरांचे चित्रण त्यांच्या कादंबरीमध्ये वरील सर्वांच्या चित्रणाबरोबरच ढोर, वेश्या, मुरळी, मसणजोगी, अनाथ इ विविध स्तरांतील दलितांच्या जीवनाचे दर्शन घडते. दलितेतर लेखकांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांतून दलित जीवनाच्या काही मोजक्याच अंगांवर प्रकाश पडतो. दलित जीवन सर्वांगाने न्याहाळून दलितांच्या समग्र पैलूंवर दलितेतर लेखकांनी प्रकाश टाकला, असे जाणवत नाही. दलित लेखकांना दलित जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळे दलित कादंबरीत दलितांच्या विविधांगी जीवनाचा वेध घेतलेला दिसून येतो.

नामदेव व्हटकरांनी ढोरांच्या वस्तीचे केलेले चित्रण वास्तव आणि प्रत्ययकारी उतरले आहे. प्रत्यक्ष त्या जीवनाचा अनुभव लेखकाला असल्यामुळे हे चित्रण प्रभावी झालेले पहायला मिळते. 'जातीला जात वैरी' या कादंबरीत ढोर-चांभार यांच्यातील उच्च-नीचता ना.म. शिंदे यांनी अधोरेखित केली आहे. राजन गवस 'तणकट' (१९९८) यांनी दलित जीवनाचे चित्रण करण्याचा हेतू ठेवूनच लेखन केल्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांतून दलितांच्या वास्तव

**१९७५ नंतर मराठीतील महानगरीय कादंबऱ्यांमधून वेगवेगळ्या उपसंस्कृतींचे चित्रण झाले आहे; परंतु महानगराला समग्रतेने कवेत घेणारा भाऊ पाध्ये यांच्यासारखा कादंबरीकार सोडला, तर इतर कादंबरीकारांना ते पेलता आलेले नाही. त्यांची 'होमसिक ब्रिगेड' सारखी महानगरीय कलाकृती तर वेगडी जगण्याचा छेद घेत अस्सल जगण्याच्या आकांक्षेचा तळ गाठते. त्यामध्ये भाऊ पाध्ये यांच्या महानगरीय जीवनचित्रणाच्या शक्तीचे श्रेष्ठपण आपल्या नजरेत भरते. या ठिकाणी भाऊ पाध्ये यांच्या संदर्भात दिलीप चित्रे यांनी जे म्हटले आहे, ते नोंदविण्यासारखे आहे. ते लिहितात, 'आणखी तीन-चार हजार वर्षांनी मुंबईचे कोणतेही अवशेष न सापडता फक्त भाऊंची पुस्तके मिळाली, तर हे शहर आता आहे तसं डोळ्यांसमोर आणता येईल.'**

जगण्याचे चित्रण पाहायला मिळते. अशोक व्हटकर यांच्या 'मेलेलं पाणी', नामदेव ढसाळ यांच्या 'हाडकी हाडवळा', भीमसेन देठे यांच्या 'इस्कोट', नामदेव कांबळे यांच्या 'राघववेळ', कादंबऱ्यांतून दलितांच्या कौटुंबिक जीवनाचे चित्रण येते. मुरलीधर जाधव यांच्या 'कार्यकर्ता' या कादंबरीत एका दलित स्त्रीचे विद्रोही चित्रण येते. प्रचलित समाज व्यवस्थेविरुद्ध, जातीयतेविरुद्ध, स्वतःवर होणाऱ्या अन्याय- अत्याचाराविरुद्ध विद्रोहाची भावना भीमसेन देठे यांच्या 'इस्कोट' मध्ये प्रकट होते. दलित कादंबरीतील नायक आंबेडकरी विचारांचे प्रतिनिधित्व करताना दलित कादंबरीत चित्रित झालेले आहेत. 'कार्यकर्ता' मधील सदा, 'राघववेळ' मधील रघू, 'राधा' मधील मुक्ती या कादंबऱ्यांमधील पात्रांच्या संदर्भात असे म्हणता येईल.

दलित कादंबरीने रूढ संकेतांना (भाषेच्या वापरातील) नाकारलेलं दिसते. बोलीभाषेचा ते समर्थपणे वापर करतात. रूढ संकेतांना धक्के दिलेले आहेत. मराठी कादंबरीच्या भाषेत अनेक नव्या म्हणी आणि अपरिचित शब्दांची भर पडून



अनुक्रमणिका

ती श्रीमंत झालेली आहे.

**राजकीय कादंबरी :**

१९७५ नंतर मराठी कादंबरीविश्वात राजकीय कादंबरीचे स्थान महत्त्वपूर्ण असे राहिले आहे. राजकारण, त्यातील वृत्ती-प्रवृत्ती, राजकारणांमुळे समाजजीवनाचे बदलते स्वरूप हा या कादंबऱ्यांचा विषय झाला आहे. या दृष्टीने वसंत वरखेडकर यांची 'प्रतिनिधी', ग. प्र. प्रधान यांची 'साता उत्तराची कहाणी', रंगनाथ पठारे यांची 'ताम्रपट', अनिल थत्ते यांची 'डोंगर म्हातारा झाला,' एकनाथ साळवे यांची 'इनकाऊन्टर', विश्वास पाटील यांची 'झाडाझडती', दीनानाथ मनोहर यांची 'आंदोलन', अरुण साधू यांची 'सिंहासन' यांसारख्या कादंबऱ्यांचा आवर्जून उल्लेख करता येईल.

'प्रतिनिधी' सारख्या कादंबरीतून वसंत वरखेडकर यांनी स्वातंत्र्यपूर्व काळातील चळवळींचे आदर्श, स्वतंत्र भारताचे स्वप्न व स्वातंत्र्योत्तर काळातील वास्तव यामधे पडलेले अंतर यांचे चित्रण केलेले आहे. आधुनिक काळातील सामाजिक जीवनात निर्माण झालेली उपभोगप्रधान वृत्ती, भ्रष्टाचारी प्रवृत्ती, व्यक्तींची कर्तव्यविन्मुखता व हक्काविषयीची जाणीव इ. विषयीची प्रतिक्रिया 'प्रतिनिधी' मध्ये व्यक्त झाली आहे.

'साता उत्तराची कहाणी' ही ग. प्र. प्रधान यांची; राजकीय परिस्थितीच्या बदलांचे, त्यामागील वैचारिक आंदोलनाचे चित्रण करणारी; कादंबरी आहे. पत्ररूपाने सिद्ध होणाऱ्या कादंबरीतून राजकीय घटनांमागील विविध भूमिका, त्यामधील ताणतणाव, त्यामुळे सामान्य कार्यकर्त्यांच्या मनात निर्माण होणारी आंदोलने व्यक्त होतात. ही कादंबरी वेगवेगळ्या विचारसरणींचे संदर्भ जागे करणारी असली तरी ती पुरेशी भेदक होत नाही; परंतु राजकीय घटनांकडे वेगवेगळ्या विचारसरणीच्या दृष्टिकोनातून पाहण्याचा मराठी कादंबरीच्या क्षेत्रातील हा एक वेगळा प्रयत्न आहे.

स्वातंत्र्योत्तर काळातील राजकीय बदलाबरोबर बदलत जाणाऱ्या राजकीय परिस्थितीचा व्यापक पट वाचकासमोर उभा करणारी रंगनाथ पठारे यांची 'ताम्रपट' या संदर्भात वैशिष्ट्यपूर्ण आहे. १९४२-१९७९ या कालखंडात सत्तेच्या कल्पनेत क्रमाक्रमाने होत गेलेले परिवर्तन व त्यामधून निर्माण होणारी सत्तास्पर्धा, त्याबरोबरच विविध विचारसरणीच्या तात्त्विक भूमिकांमधील बदल/तत्त्व आणि व्यवहार यात होणारी फारकत, सहकारी चळवळ शिक्षण संस्थांमधील राजकारण, दलितांचे प्रश्न, समाजाच्या सर्व स्तरांत होणारी जागृती व त्यामधून निर्माण होणारे पेच, मतासाठी लढविल्या जाणाऱ्या क्लृप्त्या या सर्व घटकांचा संदर्भ घेऊन सामाजिक वास्तवाचे जे चित्र या कादंबरीत उभे केले जाते, ते राजकीय व्यवस्थेच्या परिणामांचे म्हणजे राजकीय परिस्थितीचे चित्रण आहे. राजकीयपेक्षा नैतिक आशय प्रकट करण्याकडे या कादंबरीचा कल असला तरी सामाजिक, राजकीय वास्तवाची एवढी मोठी व्याप्ती यापूर्वीच्या मराठी कादंबरीत दिसत नाही. राजकीय परिस्थितीच्या चित्रणातील एक महत्त्वाचा टप्पा ठरणारी ही कादंबरी आहे.

अनिल थत्ते यांच्या 'डोंगर म्हातारा झाला' या कादंबरीत आदिवासी वस्ती असणाऱ्या मळकर्णीच्या डोंगराचे हिल स्टेशनमध्ये रूपांतर होत असताना घडणारा संघर्ष, हा या कादंबरीतील अनुभवविषय आहे. पिढ्यान्‌पिढ्या डोंगरावर राहणारी ठाकर जमात व त्यांच्या अज्ञानाचा, दुबळेपणाचा फायदा घेऊन त्यांची पिळवणूक करणारे रतूशेठ, मगनशेठ हे भांडवलदार यांच्यातील हा संघर्ष आहे. कादंबरीतील वर्गसंघर्ष हा राजकीय संघर्ष आहे.

'इनकाऊंटर' ही एकनाथ साळवे यांची कादबरी बिज्जू या माडिया आदिवासीची कुटुंब कहाणी आहे. या आदिवासी भागात नक्षलवाद्यांविरोधी आघाडी करणाऱ्या शासन

**या लेखिकांनी आपल्या कादंबरी लेखनातून लग्न, कुटुंबसंस्थेला पर्याय शोधण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. विवाहाने नेमके काय साधते? या प्रश्नाचा शोध प्रत्येकजण घेत आहे. त्यांच्या मनात लग्नासंबंधी संभ्रम असला तरी मातृत्वाची मात्र ओढ असते. या स्त्रियांच्या कादंबऱ्यांचे सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे प्रचलित समाजव्यवस्था बदलली की, आपले प्रश्न सुटतील असा भरवसा नसतो. काही प्रश्न व्यवस्थेमुळे निर्माण होतात, हे जरी खरे असले तरी काही प्रश्न माणसांच्या विशिष्ट स्वभावामुळे, त्यांच्या परस्पराशी बसलेल्या निरगाठीमुळे विकट होतात. याचे भान या सर्व लेखिकांना आहे.**



अनुक्रमणिका

यंत्रणेची दमनशक्ती किती प्रभावी असते आणि अन्याय्य अशी समाजव्यवस्था दमनशक्तीच्या बळावर टिकविण्याच्या प्रयत्नात नक्षलवाद कसा आश्वासक वाटू लागतो याचे चित्रण येते.

मराठीतील नव्या पिढीचे मातब्बर कादंबरीकार म्हणून विश्वास पाटलांना ओळखले जाते. झपाट्याने बदलत गेलेल्या खेड्यांची प्रातिनिधिक कहाणी 'पांगिरा' त त्यांनी सांगितली. 'झाडाझडती' तून एक भयानक वास्तव समोर आलं. 'महानायक' लिहून चरित्रात्मक कादंबरीचं दालन समृद्ध केलं. 'झाडाझडती' मराठी वास्तववादी कादंबऱ्यांच्या परंपरेत श्रेष्ठ आहे. कष्टकऱ्यांबद्दल व त्यांच्या कामाबद्दल तपशिलाने येणारी माहिती सामाजिक मानसिकतेचे आणि जीवनातल्या विभिन्न रूपांचे दर्शन घडविते. यात सात गावांतील विस्थापितांची करुण व भीषण कहाणी आहे. एकाच वेळी ही कहाणी मनुष्य स्वभावासंबंधीचे अनेक प्रश्न समोर मांडते अन् आतल्या आत खोलवर वाचकाला बेचैन करून टाकते. धरणामुळं मनुष्यजीवनाच्या होणाऱ्या सर्वनाशाची आणि वाताहतीचीही कथा आहे. हा विनाश फक्त जैविक दृष्टीनेच नव्हे, तर नैतिक, सांस्कृतिक व सर्वस्तरीय आहे. लेखकाने याचे विराट रूप मोठ्या ताकदीने चित्रित केले आहे. या कादंबरीची परिणामकारकता लेखकाला ग्रामीण जीवनाविषयी व लोकांविषयी वाटणाऱ्या प्रामाणिक व सच्च्या सहानुभूतीमुळे अतिशय प्रभावी झाली आहे.

स्वातंत्र्योत्तर काळातील समाजचित्र अनेक आयामांसह प्रभावीपणे चित्रित झाले आहे. राजकारणाचा हिंसक, सत्तांध, गुंडगिरीने आकंठ व्यापलेला चेहरा भारताच्या भवितव्याबद्दल यातनामय चिंता उत्पन्न करतो. या कादंबरीतील जो संघर्ष आहे तो शोषक व शोषित यांमधील आहे. 'झाडाझडती' फक्त धरणग्रस्त समाजाची व्यथा-कथा नाही. या संपूर्ण देशात जे सांस्कृतिक परिवर्तन होत आहे आणि त्याचा मूळ चेहरा व वरचे रूप वेगवेगळे आहे, त्याच्या आतल्या भयानक चेहऱ्याचे वास्तव चित्रण 'झाडाझडती' करते. ग्रामीण जीवनाची ही शोकपूर्ण महागाथा सशक्त मानवी संबंधांमुळे, स्थळकाळाची सीमा पार करून वैश्विकतेला स्पर्श करते. अरुण साधू यांच्या 'सिंहासन' या कादंबरीचे आशयसूत्र राजकीय सत्ता-स्पर्धा हेच आहे. राजकीय व्यक्तींच्या खाजगी जीवनाबरोबरच सत्ता संघर्षातील त्यांच्या डावपेचांची तपशीलवार वर्णने यात येतात. समकालीन राजकारण हेच आशयसूत्र घेऊन राजकीय परिस्थितीचे असे चित्रण करण्याची ही पद्धती मराठी कादंबरीच्या क्षेत्रात वैशिष्ट्यपूर्ण ठरते.

१९५०-२००० या अर्धशतकातील राजकीय परिस्थितीचे मराठी कादंबरीतील चित्रण याविषयीचे निरीक्षण नोंदविताना दिगंबर पाध्ये लिहितात, 'राजकारण हे जीवनव्यवहाराचे एक स्वतंत्र, स्वायत्त क्षेत्र म्हणून जीवनाकडे पाहण्याचा तो एक दृष्टिकोन आहे, हे भान मराठी लेखकांना येत असल्याच्या खुणा या कालखंडात दिसतात. त्या जर लक्षात घेतल्या, तर हे चित्र आशादायक आहे. परिस्थितीमुळे हे भान जसजसे व्यापक होत जाईल, तसतसे आपल्या राजकीय परिस्थितीचे मराठी कादंबरीतील चित्रण प्रभावी होत जाईल, यात शंका नाही.' हे पाध्ये यांचे मत आश्वासक व आशादायी अशा स्वरूपाचे आहे.

थोडक्यात मराठी कादंबरीचे (१९७५-२०००) बदलते स्वरूप वरील विवेचनावरून आपल्या ध्यानात येईल.

---


**या लेखासाठी वापरलेले संदर्भ ग्रंथ**

१. प्रा. रा. ग. जाधव (मुख्य संपादक), 'मराठी वाङ्मयाचा इतिहास', महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, मे २००९
२. अनिरुद्ध अनंत कुलकर्णी (संपादन), 'स्वातंत्र्योत्तर मराठी साहित्याचा मागोवा', प्रदक्षिणा (खंड दुसरा), कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००८.
३. विलास खोले (संपादक), 'गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी', लोकवाङ्मय गृह, २००२.
४. चंद्रकांत बांदिवडेकर, 'देशी वाण', अक्षर प्रकाशन मुंबई, २००२.
५. डॉ. द. भि. कुलकर्णी, 'कादंबरी : स्वरूप व समीक्षा', पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००३.
५. गो. मा. पवार, म.द. हातकणंगलेकर (संपादक), निवडक मराठी समीक्षा, साहित्य अकादमी, २००२
७. डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर, 'मराठी कादंबरीः चिंतन आणि समीक्षा', मेहता प्रकाशन हाऊस, पुणे, १९९६.
८. भालचंद्र नेमाडे, 'टीकास्वयंवर', साकेत प्रकाशन, औरंगाबाद, २००१.
९. डॉ. रवींद्र ठाकूर, 'मराठी ग्रामीण कादंबरी', स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १९९३.
१०. भालचंद्र फडके, 'मराठी लेखिकाः चिंता आणि चिंतन', श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८०.


---


**प्रा. डॉ. अरुण कोळेकर**
चलभाष . ९४२०७२५५०१
प्रमुख, मराठी विभाग, शरदचंद्रजी पवार महाविद्यालय, जेजुरी, ता. पुरंदर, जि. पुणे.

समीक्षा

# ज्ञानदेव व 'ज्ञानेश्वरी' विषयक अभ्यासाची परंपरा

ज्ञानदेव व ज्ञानदेवी विषयक अभ्यास- परंपरेची डॉ. शिरीष लांडगे यांनी केलेली समीक्षा.

डॉ. शिरीष लांडगे

ज्ञानदेव व ज्ञानेश्वरीविषयक अभ्यासाचा ऐतिहासिक कालानुक्रमं स्पष्ट करणारे दोन महत्त्वाचे ग्रंथ आहेत. पैकी पहिला 'श्री ज्ञानदेव वाग्यज्ञ दर्शन'[१] हा डॉ. मधुसूदन परशुराम पेठे यांचा ग्रंथ, यामध्ये ज्ञानदेव, ज्ञानेश्वरीविषयक अभ्यासाचे ऐतिहासिक समालोचन येते, तर दुसरा ग्रंथ 'संत साहित्य : संदर्भ कोश - खंड पहिला'[२] हा मु. श्री. कानडे यांचा ग्रंथ, यामध्ये मध्ययुगीन संतविषयक लेखनाचे संदर्भ येतात.

ज्ञानेश्वरीच्या निर्मितीनंतर ज्ञानेश्वरीविषयक अभ्यासाला प्रारंभ झाला. या अभ्यासाचे सन १८१८ पूर्वी आणि नंतर असे दोन मुख्य भाग आहेत. सन १८१८ मध्ये ब्रिटीश सत्तेचा अंमल सुरू होऊन आधुनिक कालखंडाला आरंभ झाला. ही आधुनिकता अनेकप्रकारे दृश्यरूपात दिसत होती. त्यांपैकी ग्रंथव्यवहाराच्या रूपाने ती प्रथम मुद्रणातून स्पष्टपणे दिसू लागली.

मुद्रित स्वरूपाच्या ग्रंथांची मराठीतून सहजतेने निर्मिती झाली नाही. त्यामागे अनेक वर्षांचे प्रयत्न होते. देशी भाषेत मुद्रित स्वरूपाचा पहिला ग्रंथ पोर्तुगीजांनी दिला. त्यांनी भारतातील पहिला मुद्रित ग्रंथ 'दौत्रीन क्रिस्ता' हा सन १५५७ मध्ये गोव्यामध्ये प्रसिद्ध केला. त्यानंतर 'क्रीस्त पुराण' हे पुस्तक छापले. मात्र त्यानंतर पोर्तुगीजांनी १६८४ मध्ये देशी भाषेत पुस्तके छापण्यास मनाई केली. १६७४-७५ मध्ये मुंबईतील भिमजी पारेख यांनी इंग्लंडमधून छापखाना आणला; पण देशी टाइप तयार करणारा नसल्याने मुद्रण झाले नाही. त्यानंतर १८९० च्या मुंबई गॅझेटिअरमध्ये मुंबईमध्ये छापखाना असल्याची नोंद आहे.

यानंतरचा दुसरा प्रयत्न मिशनऱ्यांनी केला.[३] विल्यम कॅरे यांनी देवनागरी टाईप तयार करून सन १८०५ मध्ये त्यांनी 'अ ग्रामर ऑफ द महरट्ट लँग्वेज' (मराठी भाषेचे व्याकरण), 'मात्थीचे शुभवर्तमान' अशी दोन पुस्तके कलकत्याजवळील सेरामपूर येथे मुद्रित केली.

देशी भाषेतील मुद्रित ग्रंथाचा इतिहास सांगतो की, ग्रंथ निर्मितीचा पहिला प्रयत्न पोर्तुगीजांनी, तर दुसरा प्रयत्न मिशनऱ्यानी केला. [४]विशेष म्हणजे हे प्रयत्न महाराष्ट्राबाहेर झाले. त्यानंतर तिसरा प्रयत्न हा ब्रिटीश शासकांच्या पातळीवर झाला. पहिले दोन्ही प्रयत्न हे ख्रिस्ती धर्मप्रसारासाठी, तर तिसरा प्रयत्न हा शैक्षणिक कामासाठी झाला. या तिन्हीतील प्रारंभीची पुस्तके ही रोमन, मोडी लिपीमध्ये मुद्रित झाली. या मुद्रित ग्रंथांच्या आगमनाने मराठीमध्ये आधुनिक युग सुरू झाले.

आधुनिक पद्धतीच्या ग्रंथनिर्मितीमुळे मराठी ग्रंथांचे वाचक वाढले. प्रारंभीच्या काळात मिशनऱ्यांनी ख्रिस्ती धर्मप्रसार करणारी पुस्तके छापली. यातील काही ग्रंथांतून संतांवर टीका केली. उदाहरणार्थ, 'आळंदीची यात्रा'[५] हे मीचेल मरे यांचे पुस्तक ज्ञानदेवादी संतांपेक्षा ख्रिश्चन धर्म कसा चांगला आहे, हे सांगते. याविरुद्धची प्रतिक्रिया गणपत कृष्णाजी यांनी नोंदविली. त्यांनी हा प्रचार पाहून १८३१ मध्ये स्वतःचा छापखाना उभारला.[६] त्यासाठी गणपत कृष्णाजी यांनी मोठे कष्ट घेतले. त्यांनी मराठी टाईप तयार करून स्वतःच्या मालकीचा छापखाना काढला. त्यांनी सर्वप्रथम

मराठीतून पंचांग मुद्रित केले. त्यांचा हा छापखाना शिळा छापखाना होता. त्यानंतर १८४३ मध्ये त्याचे रूपांतर खिळा छापखान्यात झाले. त्यांनी सरकारी व खासगी प्रकाशनांच्या बरोबरच 'महाभारत', 'भागवत', 'शिवलीलामृत' सारख्या हिंदू धर्मग्रंथांचे मोठ्या प्रमाणात प्रकाशन केले.

सन १८४५ मध्ये ज्ञानेश्वरीला पहिला मुद्रण संस्कार लाभला. ' बाळशास्त्री गंगाधरशास्त्री जांभेकर यानी मुद्रित स्वरूपातील ज्ञानेश्वरी प्रथम वाचकांच्या हाती दिली. ही 'ज्ञानेश्वरी' प्रभाकर प्रेसमध्ये छापलेली शिळाछाप पोथी होती. हे 'ज्ञानेश्वरीचे' पहिले आधुनिक दृश्यरूप होते. 'ज्ञानेश्वरी' विषयक अभ्यासातील ही एक महत्त्वाची घटना होय.

सन १८५४ मध्ये परशुरामतात्या गोडबोले यांच्या नवनीतामधून 'ज्ञानेश्वरी'चे काही वेचे प्रसिद्ध झाले. त्यानंतर त्याच्या पाच – सहा आवृत्त्या निघाल्या. त्यामध्ये मजकुराचा अधिक उणेपणा होता. कालांतराने विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक आदी सुशिक्षितांचे लक्ष 'ज्ञानेश्वरी'कडे वळाले. त्याविषयी न.र.फाटक म्हणतात, 'विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी निबंध मालेच्या ५१ व्या अंकात (म्हणजे इ.स.१८७७-७८) ज्ञानेश्वरी परिभाषा नामक पुस्तकावर अभिप्राय देताना आपल्या ज्ञानेश्वरी विषयक ज्ञानाबद्दल लिहिले आहे; आम्हास पूर्वी नवनीताच्या पहिल्या व दुसऱ्या भागावरूनच काय ती प्रस्तुत कवीची माहिती होती; पण सदरील 'परिभाषे'च्या परीक्षार्थ मूळ ग्रंथाची कोठे कोठे जी आम्ही उगीच चाचणी पाहिली तिजवरूनही त्याच्या वाणीच्या लावण्याच्या छटा आमच्या डोळ्यात भरल्या व समग्र ग्रंथाच्या वाचनाविषयी उत्कट इच्छा उद्‌भवली.' ' त्याकाळात आधुनिक सुशिक्षित हे 'ज्ञानेश्वरी'कडे कसे पाहायचे, याचे हे प्रातिनिधिक उदाहरण म्हणावे लागेल. नंतरच्या काळात अनेक प्रकारच्या 'ज्ञानेश्वरी'च्या आवृत्त्या छापल्या गेल्या. १८६४ मध्ये ग. बा. शास्त्री यांनी संपादित केलेली 'ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध झाली. १८७४ मध्ये गणपत कृष्णाजी यांनी देवस्थळी यांच्या शब्दकोशासह 'ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध केली. त्यानंतर १८७७ मध्ये रा. श्री. गोंधळेकर यांनी परिभाषेसह 'ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध केली. त्यावर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी 'निर्भीड' आणि 'गुणग्राही' टीका केली. ' याचवर्षी रा.गो.भांडारकर यांनी 'ज्ञानेश्वरी भाषेचा अनुषंगिक विचार' मांडला. १८७९ मध्ये निरंजन माधव यांनी लिहिलेल्या 'ज्ञानेश्वरविजय'चे प्रकाशन झाले. १८८१ मध्ये वि. वि. राजवाडे यांनी 'हरिपाठाचे अभंग' प्रसिद्ध केले. १९८३ मध्ये बा. म. हंस यांचा 'श्री ज्ञानदेव : ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानासंबंधी, नीतीसंबंधी व ग्रंथासंबंधी विषयवार निबंध' प्रकाशित झाला. १८८४ मध्ये 'ज्ञानदेव चरित्र' (पुण्यवैभव प्रेस) आणि अ. म. कुंटे यांची 'अमृतानुभव व त्यावरील नित्यानंदैक्यदीपिका टीका' प्रकाशित झाली. १८८६ मध्ये श्री. र. भिंगारकर यांचे 'महासाधु ज्ञानदेव चरित्र' प्रसिद्ध झाले. या ग्रंथाला दक्षिणाप्राईज कमिटीचे तीनशे रुपयांचे पहिले बक्षीस मिळाले. याचवर्षी मां. वि. रानडे यांची परिभाषायुक्त 'ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध झाली. १८९० मध्ये ना. रा. सोहनीकृत संपादित 'ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध झाली. १८९४ मध्ये अ. म. कुंटे याची 'सटीप ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध झाली. १८९५ मध्ये वि. स. भावे यांनी 'ज्ञानेश्वरी अर्थचंद्रिका' प्रसिद्ध केली. हा सार्थ ज्ञानेश्वरीचा पहिला प्रयत्न होता, तर रा. रा. पाटील यांनी 'ज्ञानलीलाकृत अथवा आळंदी माहात्म्य' हे ज्ञानदेव चरित्र लिहिले. १८९५ मध्ये 'सटीक अमृतानुभव', हंसराजस्वामीकृत 'समओवी' प्रसिद्ध झाले. १८९७ मध्ये आ. मो. कुंटे यांनी संपादित केलेली; तसेच तुकारामतात्या यांनी संपादित केलेली 'ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध झाली. १८९८ मध्ये बाळशास्त्री अण्णाबुवा हुपरीकर यांची 'अनुभवामृत तात्पर्यबोधनी टीके'सह प्रसिद्ध झाली.

यानंतर ज्ञानदेवविषयक अभ्यासात महत्त्वाची घटना घडली. ५ डिसेंबर १८९८ पासून १८९९ पर्यंत शिवराम एकनाथ भारदे यांनी भारद्वाज या नाममुद्रेने सुधारक या वर्तमानपत्रात ज्ञानदेवविषयक लेखमाला लिहिली.'' ही लेखमाला ज्ञानदेवविषयक अभ्यासात क्रांतिकारक ठरली. ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानदेव आणि अभंगकर्ता ज्ञानेश्वर संत हे भिन्न होते, असा या लेखमालेचा उद्देश होता. भारदे यांच्या मताचा प्रतिवाद अनेकांनी केला. पैकी श्री. र. भिंगारकर यांनी केसरीतून, तर केरळकोकीळातून कृष्णा ना. आठल्ये यांनी प्रतिवाद केला. भिंगारकरांच्या बाजूने लोकमान्य टिळक पुढे आले. भारदे यांनी उपस्थित केलेल्या मुद्द्यांचा प्रतिवाद ल. रा. पांगारकर, कृ. व्यं. गजेंद्रगडकर, रा. द. रानडे, ज. रा. आजगावकर, कृ. ना. आठल्ये, श. दा. पेंडसे, श्री. म. माटे, शं. गो. तुळपुळे, श्री. मा. कुलकर्णी आणि भिंगारकर बुवा यांनी केला, तर ह. ना. आपटे, गो. का. चांदोरकर, वि. स. वाकासकर, त्र्यं. ग. धनेश्वर, न. चिं. केळकर, वा. ब. पटवर्धन, ज. रा. करंदीकर, श्री. ना. बनहट्टी, अ. ना. देशपांडे, रा. श्री. जोग यांनी समर्थन केले.'' न्या. रानडे यांनी भारदे आणि भिंगारकर या दोघांचे प्रतिवाद ऐकले. पुढे भारदे यांच्या मृत्यूनंतर त्यांचे शिष्य गंगाधर गणेश दाभोळकर यांनी



अनुक्रमणिका

सन १८००-१८७४ या ज्ञानदेवविषयक अभ्यासाच्या अव्वल इंग्रजी काळाला म. प. पेठे हे 'संक्रमण युग' संबोधतात. या संक्रमण काळातील मराठी ग्रंथव्यवहाराचे स्वरूप एका उदाहरणातून स्पष्ट होते. तत्कालीन गव्हर्नर सर अलेक्झांडर ग्रँट यांच्या हुकमानुसार मुंबई इलाख्यात १८६४ पर्यंत प्रसिद्ध झालेल्या मराठी मुद्रित पुस्तकांचे न्या. रानडे यांनी समालोचन केले.



हे सर्व लेख एकत्र करून 'ज्ञानदेव व ज्ञानेश्वर' या नावाने १९३१ मध्ये ग्रंथ प्रकाशित केला. त्या वेळी दाभोळकर खंत व्यक्त करताना म्हणतात, 'भारदे यांची मते उपेक्षित राहिली. राजवाडे, भावे, प्रो. पटवर्धन यांनी आपल्या विवेचनात भारदे यांचा उल्लेखही केला नाही.' तसेच सुधारक पत्राचे संपादक वि. रा. जोशी, चिं. वि. जोशी, दि. ज. दाभोळकर आणि दादासाहेब धनेश्वर यांच्याविषयी कृतज्ञता व्यक्त करतात.[१३] त्यामधील धनेश्वर हे 'श्रीज्ञानेश्वरदर्शन'ची निर्मिती करणाऱ्या ज्ञानेश्वर मंडळाचे अध्यक्ष होते. भारदे यांची केलेली उपेक्षा काहीप्रमाणात का होईना धनेश्वर यांनी दूर केली. त्यांनी 'श्रीज्ञानेश्वरदर्शन'मध्ये ज्ञानदेव व ज्ञानेश्वर असा लेख लिहून 'श्रीज्ञानेश्वरदर्शना'चे दर्शन उणे राहू नये, याची काळजी घेतली. हा विषय वाचकांपुढे आणला. इतकेच नव्हे तर धनेश्वर म्हणतात, 'ज्ञानेश्वरांचा अभ्यास करून त्यांच्या जिज्ञासू बुद्धीला आणि विवेचकपणाला जे दिसून आले ते अनुकूल व प्रतिकूल टीकेची फिकीर न बाळगता प्राजळपणे व मुद्देसूद रीतीने साधार सिद्ध करण्याचा भारद्यांनी प्रयत्न केला.' त्यांचे सिद्धांत डॉ.भांडारकर व प्रो.भागवत यांना मान्य झाले. न्या.रानड्यांनी लेख लिहिण्यास व व्यासंग चालू ठेवण्यास प्रोत्साहन दिले. केसरीकार लो. टिळकांना विषयविवेचनपद्धती मान्य झाली; पण लेखांतील सिद्धांत ग्राह्य झाले नाहीत. ही लेखमाला केसरीत प्रसिद्ध झाली असती, तर कदाचित गाडे उलटले असते![१४] असे या वादामागील संदर्भ स्पष्ट करतात. त्यामुळे सन १८७४ ते १९४७ या कालखंडाला पेठे ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचे चिकित्सक युग म्हणतात. त्याचा प्रारंभ चिपळूणकरांच्या गुणग्राही टीकेमुळे झाला, तर चिकित्सेला भारदे यांच्यामुळे प्रारंभ झाला. या अर्थाने ज्ञानदेवांच्या अभ्यासातील आधुनिक युगाला प्रारंभ झाला.

१८९९ मध्ये अण्णाबुवा हुपरीकर यांचे 'चांगदेवपासष्टीदर्पण', तसेच केरळकोकिळाकार कृष्णा ना. आठल्ये यांची 'सार्थ ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध झाली. १९०२ मध्ये 'विद्यारण्य व ज्ञानेश्वर यांच्या वेदातावरील मतांचे तात्पर्य' हा बाळशास्त्री हुपरीकर यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. याचवर्षी बाळशास्त्री हुपरीकर यांचे 'शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर' प्रसिद्ध झाले. १९०४ मध्ये मार्गप्रदीप ल. रा. पांगारकर यांचा संत साहित्यातील वेचक उतारे हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. १९०५ मध्ये वि. ना. साखरे यांची 'सार्थ ज्ञानेश्वरी' ही नाना महाराज साखरे यांनी सांगितलेली व कृ. पा. भिडे यांनी उतरून घेतलेली प्रसिद्ध झाली. याच वर्षी वि.ना. साठे यांचे 'सार्थ अमृतानुभव व सार्थ पासष्टी' हे ग्रंथ प्रसिद्ध झाले. त्याचवर्षी विष्णुबुवा जोग यांचे 'अमृतानुभव टीका व शब्दकोश', तसेच ज्ञानेश्वरी व्याकरणविषयक चर्चा करणारे त्रि.वि. वैद्य यांचे निबंध व भाषणे प्रसिद्ध झाले. १९०६ मध्ये ब.खं.पारख यांच्या 'ज्ञानेश्वर महाराजांचे चरित्रा'ची तिसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली. हे अनेक जुन्या बखरींच्या आधारे लिहिलेले चरित्र आहे. १९०७ मध्ये रा. वि. माडगावकर यांची 'ज्ञानेश्वरी'च्या बारा प्रतींतील पाठभेद व विस्तृत कोशासह 'ज्ञानदेवी' प्रकाशित झाली. १९०९ मध्ये वि. का. राजवाडे यांचे 'ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण' प्रसिद्ध झाले. वि. का. राजवाडे यांनी बीड पाटण येथील प्राचीनतम पाठ म्हणून विद्वत्मान्य झालेल्या 'ज्ञानेश्वरी'च्या मुकुंदराज प्रतीचे प्रकाशन केले. १९१२ मध्ये मायानंद चैतन्य यांच्या 'अमृतानुभवा'चा हिंदी



अनुक्रमणिका

अनुवाद प्रकाशित झाला. याचवर्षी रत्नसिंह दीपसिंह परमार आणि गोवर्धन कहानदास अमीन यांनी 'ज्ञानेश्वरी भगवत गीते'चा गुजराती अनुवाद प्रसिद्ध केला. तसेच ल.रा.पांगारकर यांच्या 'श्री ज्ञानेश्वर महाराज चरित्र' ग्रंथाचे प्रकाशन झाले. या चरित्राची चिकित्सा १९१४ च्या 'विविध ज्ञान विस्तार'मधून शिवराम एकनाथ भारदे यांनी करताना पुन्हा एकदा ज्ञानदेव व ज्ञानेश्वरविषयक आपली भूमिका जोरदारपणे मांडली १९ फेब्रुवारी १९१४ मध्ये कृ. के. उर्फ कृष्णाजी जोशी यांनी जर्मनीतील वुर्झबर्ग (Wurzburg) येथील ज्युलियस मॅक्सिमिलियन विद्यापीठाला (JMU) 'Declension of nouns in Marathi as seen in Dnyaneshwar's Works' या विषयावर पीएच. डी.साठी प्रबंध सादर केला. ज्ञानदेवविषयक अभ्यासातील हा पहिला प्रबंध होय. याचवर्षी वा.भा. जोशी यांचे 'अमृतानुभव'चे मूळ ओव्यांचे साकीबद्ध रूपांतर आणि गद्य भाषांतर प्रसिद्ध झाले. तसेच ज. रा. आजगावकर यांचे 'महाराष्ट्र कवी चरित्र भाग ४' प्रसिद्ध झाले. १९१५ मध्ये गो.का. चांदोरकर यांचे 'संतकविकाव्यसूची' प्रसिद्ध झाले. १९१६ मध्ये गो.रा. मोघे यांची 'ज्ञानेश्वरी समओवी' प्रसिद्ध झाली. १९१७ मध्ये वा. ब. पटवर्धन यांचे 'Wilson philological lectures', राजारामबुवा ब्रह्मचारी याचा 'अमृतानुभव' प्रसिद्ध झाला. १९२० मध्ये मायानंद चैतन्य यांचा साखरे प्रतीचा अनुवाद 'ज्ञानेश्वरी हिंदी भाषा टीका' या नावाने, तर आजगावकरांचे 'महाराष्ट्र कवी चरित्र भाग पाचवा' प्रसिद्ध झाले. १९२२ ते जून २३ या काळात चित्रमय जगत या मासिकात पांडुरंग शर्मा उर्फ पांडुरंग ज्ञानेश्वर कुलकर्णी यांनी ज्ञानदेव तत्त्वज्ञानविषयक प्रदीर्घ अशी लेखमाला लिहून 'ज्ञानेश्वरी'तील तत्त्वज्ञानविषयक अनेक समजुतींना धक्के दिले. पुढे त्यांनी उपस्थित केलेल्या मुद्द्यांचा प्रतिवाद पेंडसे यानी केला. १९२४ मध्ये ग. कृ. आगाशे यांनी 'ज्ञानेश्वरी' सहा भागांत प्रसिद्ध केली. याचवर्षी वा.मा.जोशी यांचा सार्थ व साकीबद्ध 'अमृतानुभव' प्रसिद्ध झाला १९२५ मध्ये य. र. आगाशे यांचा 'ज्ञानेश्वरीचे काव्यांग' हा ग्रंथ प्रकाशित झाला. १९२७ मध्ये बंकट स्वामी यांनी चार गुरुबंधूंच्या सहकार्याने 'सार्थ ज्ञानेश्वरी', रामचंद्र शंकर टाकी यांनी 'श्री ज्ञानेश्वर महाराज अथवा सद्भक्तिविजय' या ग्रंथातून ज्ञानेश्वर यांचे चरित्र आणि कार्य, वाङ्मय याचे विश्लेषण, तसेच शं. वा. दांडेकर यांचा 'वारकरी पंथाचा इतिहास' प्रसिद्ध झाले. १९२८ मध्ये वा. गो. आपटे यांचे 'ज्ञानदीप अथवा सुबोध गतिरूप ज्ञानेश्वरी' सार, बा. अ. भिडे यांनी 'सार्थ ज्ञानेश्वरी' ही मुक्तेश्वरी समओवी, वामनी समश्लोक व मोरोपंती समआर्यासह प्रसिद्ध झाली. तसेच आत्माराम कृष्ण केणे उर्फ ज्ञानेश्वरीबुवा श्रीगोंदेकर यांचा 'अमृतानुभव' अमृतवाहिनी टीकेसह प्रसिद्ध झाला. १९२९ मध्ये मा. पा. ओक यांनी 'ज्ञानेश्वरी'तील एक ते सहा अध्यायांचे संस्कृत रूपांतर केले. याचवर्षी आणखी एक ग्रंथ प्रकाशित झाला. डॉ. निकोल मेकॅनिकल यांना पुण्यनगरीचे मुनी, असे संबोधले जायचे. त्यांनी 'Psalms of Marathi Santa',१९२९ या ग्रंथाला लिहिलेल्या उपोद्घातात ज्ञानदेव व इतर संतांच्या चरित्राचा आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाचा ऊहापोह केला आहे. याच काळातील जस्टिन ॲबट या ख्रिस्ती मिशनऱ्याचे संत वाङ्मयाचे अभ्यासक म्हणून नाव घेतले जाते. रेव्हरंड डी. एफ. एडवर्डस यांनीही ज्ञानदेवांचे चरित्र लिहिले आहे. त्यामध्ये जस्टिन ॲबट यांचा विशेषत्वाने उल्लेख करावा लागतो. १९२९ मध्ये खं. कृ. ऊर्फ बाबा गर्दे यांची 'अमृतानुभव' समआर्या टीका व बडवेकृत संस्कृत समश्लोकी प्रसिद्ध झाली. तसेच श्री दासगणू महाराजांचे 'अमृतानुभव',भावार्थ मंजिरी ही टीका आणि शब्दकोश प्रसिद्ध झाला. १९३० मध्ये प्र. सी. सुबंध यांचा 'अनुभवामृत दीपिका भाग एक' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. १९३१ मध्ये अ.वि.खासनीस यांची 'गीर्वाण ज्ञानेश्वरी' प्रसिद्ध झाली. तसेच शिवराम एकनाथ भारदे यांनी सुधारक या वर्तमानपत्रातून भारद्वाज या नावाने लिहिलेली लेखमाला 'ज्ञानदेव व ज्ञानेश्वर' या नावाने पुस्तकरूपाने प्रकाशित झाली. त्याचबरोबर श्री दासगणू महाराजांचे 'श्रीपासष्टीभावदिपीका' ही चांगदेवपासष्टीवरील टीका प्रसिद्ध झाली. १९३२ मध्ये शं. वा. दांडेकर यांचे 'श्री ज्ञानदेवः चरित्र ग्रंथ, तत्त्वज्ञान', मनु सुभेदार यांचे 'गीता एक्सप्लेन बाय ज्ञानेश्वर महाराज' हा इंग्लिशमधील अनुवाद प्रसिद्ध झाला. १९३३ मध्ये जस्टिन बट व गोडबोल्यांचे 'The poet saints of Maharashtra Vol.1' हे महिपतीकृत भक्तिविजयचे भाषांतर, ल. रा. पांगारकर यांचा 'मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड पहिला' (ज्ञानेश्वर नामदेव काळ) आणि रा.द.रानडे यांचा 'Mysticism in Maharashtra' (मराठी संतांच्या काव्याच्या साक्षात्काराच्या अंगाने परामर्श) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. १९३४ मध्ये विनायक महाराज साखरे यांची 'श्री ज्ञानेश्वर महाराजांची सार्थ गाथा', वि. का. राजवाडे यांचे 'ज्ञानेश्वरी'च्या नवव्या अध्यायाचे संस्कृत प्रतिशब्दः भाषांतर, ल. रा. पांगारकर यांच्या 'मराठी वाङ्मयाचा

इतिहासाचा खंड दुसरा' आणि 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' हा दोन खंडातील ग्रंथ प्रकाशित झाला.

'श्रीज्ञानेश्वरदर्शन' हा ग्रंथ १ एप्रिल १९३४ मध्ये प्रकाशित झाला. त्यामध्ये तब्बल ९२ लेख आहेत. ज्ञानदेव आणि 'ज्ञानेश्वरी'विषयक अभ्यासामध्ये विषयांची विविधता आणि विपुलता एकाच ग्रंथामध्ये प्रथमच पाहावयाला मिळाली. यातील लेखांनी ज्ञानदेवविषयक अभ्यासामध्ये नवी भर घातली. ही भर संख्यात्मक आणि गुणात्मक अशा दोन्ही अर्थाची आहे. मर्यादित साधनांच्या या पार्श्वभूमीवर ही भर अधिक वैशिष्ट्यपूर्ण वाटते. पाश्चात्यांच्या आगमनानंतर ज्ञानदेव व 'ज्ञानेश्वरी'विषयक अभ्यासाला या ग्रंथामुळे नवी दृष्टी मिळाली म्हणून प्रस्तुतचा आढावा या ग्रंथापर्यंत घेतला.

या धावत्या आढाव्यातून ज्ञानदेवविषयक अभ्यासाचा मुद्रणापासून ते 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' या ग्रंथापर्यंतचा ऐतिहासिक कालक्रम समजतो. या काळात ज्ञानदेवांच्या 'ज्ञानेश्वरी', 'अमृतानुभव', 'चांगदेवपासष्टी', 'हरिपाठ'यांची मुद्रणे झाली. या ग्रंथांची संपादित, सार्थ, विवरणात्मक, पाठशुद्ध, संशोधित, भाषांतरीत अशा अनेक प्रकारची मुद्रणे; तसेच ज्ञानदेवांची चरित्रे लिहिली गेली. जर्मनीच्या विद्यापीठात पीएच.डी. झाली. असा हा सर्व अभ्यास वेचे, टीका, संपादन, निबंध, लेख, प्रबंध, सूची, इतिहास अशा प्रकारांतून काव्य, भाषा, वेदांत, व्याकरण, साक्षात्कारवाद या विषयांच्या अनुरोधाने चिकित्सा आणि अभ्यास अशा स्वरूपामध्ये झाला. या सर्व अभ्यासाचे भाविक, आस्वादक आणि चिकित्सक, असे तीन प्रकार दिसतात.

सन १८००-१८७४ या ज्ञानदेवविषयक अभ्यासाच्या अव्वल इंग्रजी काळाला म. प. पेठे हे 'संक्रमण युग' संबोधतात. या संक्रमण काळातील मराठी ग्रंथव्यवहाराचे स्वरूप एका उदाहरणातून स्पष्ट होते. तत्कालीन गव्हर्नर सर अलेक्झांडर ग्रँट यांच्या हुकमानुसार मुंबई इलाख्यात १८६४ पर्यंत प्रसिद्ध झालेल्या मराठी मुद्रित पुस्तकांचे न्या. रानडे यांनी समालोचन केले. हे समालोचन 'रिमार्क्स ऑन द मराठी पोर्शन ऑफ द कॅटलॉग ऑफ नेटिव्ह पब्लिकेशन्स इन द बॉम्बे प्रेसिडेन्सी अप टू ३१ डिसेंबर १८६४', या नावाने इंग्लिशमध्ये आहे. त्यामध्ये रानडे म्हणतात, 'या काळात मराठीमध्ये ६६१ पुस्तके प्रसिद्ध झाली. त्यांपैकी ४३१ गद्यात्मक व २३० पद्यात्मक होती... चाळीस वर्षांपूर्वी या भाषेत एकही छापील पुस्तक नव्हते. कोणाचे वाङ्मय त्रयस्थाच्या दृष्टिकोनातून पाहिल्यास धर्मभोळेपणा व बालिशपणा अशाच स्वरूपाचे आढळेल. मला आशा आहे की, थोडक्याच काळात आपली ही मराठी भाषा भारतातील पुरोगामी भाषांच्या पंक्तीत मानाचे स्थान मिळवील. त्यासाठी प्रयत्नांची मात्र पराकाष्ठा झाली पाहिजे.'' हे मत स्पष्ट करते की, १८६४ पर्यंत मराठी साहित्य हे धर्मभोळे व बालिश होते.

त्यानंतर म्हणजे १८७४ पासून म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निबंधमालेनंतरच्या आधुनिक काळाला म. प. पेठे हे 'ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचे चिकित्सक युग' मानतात. या काळामध्ये 'ज्ञानेश्वरी'विषयक अभ्यासामध्ये दोन परस्परविरुद्ध दृष्टिकोन पाहावयाला मिळतात. ह्या भक्तिपंथाची स्थापना महाराष्ट्रात तेराव्या शतकात झाली. संताळ्यांची ही स्थापना झाल्यावर काही काळाने देवगिरी येथील मराठ्यांचे राज्य नष्ट झाले व यवनांची सत्ता महाराष्ट्रात तीनशे वर्षे म्हणजे शके १२४०त देवगिरी घेतल्यापासून शके १५४० अहमदनगरची मनसबदारी शहाजीला मिळेपर्यंत बहुतेक अव्याहत चालली. या तीन शतकात संताळ्यांचे प्राबल्य महाराष्ट्रात फार होते. संत म्हटला म्हणजे अत्यंत पंगुपणाचा केवळ मूर्तिमंत पुतळाच होय. संताला खाणे नको, पिणे नको, वस्त्र नको. एक विठोबा मिळाला म्हणजे सर्व काही मिळाले. ऐहिक सुखदुःखे, ऐहिक सुखोपभोग, ऐहिक व्यवहार यात मन घालणे संतांचे काम नव्हे... ह्या संत मंडळाच्या हाती विचाराच्या दिशा जाऊन महाराष्ट्र पंगू बनत राहिला,असे इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी म्हटले आहे... न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनी हिंदू प्रोटेस्टंटिझमवर व्याख्यान दिले. 'राईज ऑफ मराठा पॉवर' या ग्रंथात म्हटले आहे की, संतांनी मराठी भाषेचे अभिवृद्धी करणारे सौंदर्यपूर्ण साहित्य निर्माण केले. आपल्या चारित्र्याने, शिकवणीने व साहित्याने संतांनी - जाती संघटनेची कर्मठ दृढता शीतल केली. शूद्रांना जवळजवळ ब्राह्मणांच्या बरोबरीने आध्यात्मिक अधिकार आणि सामाजिक महत्त्व दिले. स्त्रीची पदवी वाढवून कौटुंबिक परस्परसंबंधांना पावित्र्य दिले. सामाजिक परस्परसबंधात सहिष्णुता आणली. हिंदू-मुस्लीम संबंधात जवळीक निर्माण केली. कर्मकांड, उत्सव, यात्रा, उपास, ज्ञान यांचे महत्त्व तुलनेने कमी करून प्रेम आणि श्रद्धा हा ईश्वरोपासनेचा उत्कृष्ट मार्ग असल्याचे सांगितले. बहुदेवतावाद नियंत्रित केला. समाजाला एकात्म केले. विचार व कृती या दोन्ही दृष्टींनी राष्ट्राचे सामर्थ्य वाढवले. परकीय सत्तेच्या जागी स्वदेशी सत्तेची पुनर्स्थापना करण्यासाठी भारतातील कोणत्याही प्रांतापेक्षा, महाराष्ट्राला अधिक बळ पुरवले. अशाप्रकारे न्यायमूर्ती रानडे यांनी आपले सांस्कृतिक संचित म्हणून सतांचे जीवन, साहित्य



अनुक्रमणिका

विचार व कार्य यांकडे पाहिले... संत कार्याचे मूल्यमापन हे न्यायमूर्ती म. गो. रानडे आणि इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांच्या परस्परविरोधी विचारप्रणालीचे खंडनमंडन, असे झाले आहे. रानडे- राजवाडे यांच्या विचारांच्या तळटीपा असेच या संतसाहित्य समीक्षेचे स्वरूप आहे. [१४] 'ज्ञानेश्वरी' विषयक अभ्यासामध्ये असे दोन परस्परविरुद्ध दृष्टिकोन दिसतात. तसेच या काळात हा अभ्यास ऐतिहासिक आणि सामाजिक, सौंदर्य अशा दोन दृष्टिकोनांतून झालेला दिसतो.

या अभ्यासाची आणखी एकप्रकारे मांडणी केलेली दिसते. ती म्हणजे एकोणिसावे, विसावे अशा अर्थाने सदानंद मोरे हे विचार करतात. ते एकोणिसाव्या शतकातील ज्ञानेश्वरीविषयक अभ्यासाचे विश्लेषण करताना म्हणतात, 'वारकरी संप्रदाय हा बहुजनांचा संप्रदाय असल्याने, ज्यांच्यामुळे मक्तेदारी संभवते, अशा ज्ञान व कर्म या दोन्ही गोष्टींना त्यात गौणत्व आहे. ब्राह्मण्यावर आधारित असलेल्या इतर कोणत्याही पंथात या दोनपैकी एखाद्या गोष्टीला प्राधान्य दिलेले आढळते... भक्तीचे तत्त्वज्ञान हे कोणत्याही प्रकारच्या वेदांताला ओलांडून पुढे गेलेले आहे. दुर्दैवाने त्याच्या आणि त्याच्या वादात बिचाऱ्या ज्ञानेश्वर माउलींची विनाकारण ओढाताण झाली आहे. तशीच ती गेल्या शतकात (एकोणिसाव्या) राष्ट्रवाद्यांच्या आणि सुधारणावाद्यांच्या वादातही झाली होती.' ज्ञानेश्वरी आणि ज्ञानेश्वर यांचे विसाव्या शतकातील चर्चेची व अभ्यासाची पार्श्वभूमी ही अशी आहे. [१६]

या विवेचनाच्या आधारे मोरे हे ज्ञानदेव, तुकाराम आदी अभ्यासकांच्या परंपरा मांडतात. त्यातील एक परंपरा ही लोकहितवादी, महात्मा फुले, न्यायमूर्ती रानडे, राजारामशास्त्री भागवत अशी उदारमतवादी परंपरा; तर दुसरी विष्णुशास्त्री चिपळूणकर, परशुरामपंत तात्या गोडबोले, लोकमान्य टिळक, नाना महाराज साखरे, वि.का. राजवाडे, विष्णुबुवा जोग अशी पारंपरिक परंपरा स्पष्ट करतात. त्यांच्या या भूमिकेचा अधिक विस्तार 'तुकारामदर्शन'मध्ये वाचावयास मिळतो.

सारांश, हा सर्व ऐतिहासिक आढावा स्पष्ट करतो की, देशी ग्रंथांवर मुद्रण संस्कार होणे, हा विज्ञानाचा आविष्कार होता. प्रारंभी शिळाछाप मुद्रणे झाली. त्यानंतर खिळाछाप मुद्रणे झाली. या स्थित्यंतरातून प्रथम 'ज्ञानेश्वरी'ची पोथी छापली, नंतर ग्रंथ छापले. त्यामुळे 'ज्ञानेश्वरी'विषयक ग्रंथांना दृश्यरूपात आधुनिकता आली. हस्तलिखित पोथ्या मागे पडून मुद्रित पोथ्या आल्या. प्रथम 'ज्ञानेश्वरी', तिला जोडून शब्दकोश, त्यानंतर परिभाषाकोश अशा क्रमाने 'ज्ञानेश्वरी' छापली जाऊ लागली. पोथी ऐवजी ग्रंथ, पूर्वीच्या ग्रंथापेक्षा अधिक माहिती, अर्थाचे स्पष्टीकरण अशा गरजेतून 'ज्ञानेश्वरी'चे नवनवीन आविष्कार होत गेले. ग्रंथनिर्मिती आणि प्रसारामध्ये आमूलाग्र बदल झाले. संतविषयक साहित्याच्या प्रचार, प्रसाराला एक नवीन आयाम मिळाला. या सर्व ऐतिहासिक क्रमामध्ये मिशनऱ्यांचे साहित्य, त्यातील संत साहित्यावरील टीका, स्थानिक मंडळींचे मुद्रण, 'ज्ञानेश्वरी'चे मुद्रण, 'ज्ञानेश्वरी'च्या नव्या आवृत्त्या, ज्ञानदेवांची चरित्रे, भारदे यांची चिकित्सा, वादविवाद, नव्या पद्धतीने आणि दृष्टीने अभ्यास अशी ज्ञानदेव व 'ज्ञानेश्वरी' विषयक अभ्यासाची एक ऐतिहासिक परंपरा दिसते.

---


संदर्भ :

१. पेंठे म. प., श्रीज्ञानदेव वाङ्मय दर्शन, श्री ज्ञानेश्वर विद्यापीठ, १९७३.
२. कानडे मु.श्री., संत साहित्य : संदर्भ कोश - खंड पहिला, स्नेहवर्धन प्रकाशन, द्वि.आ. २००९.
३. गावस्कर सुरेंद्र, दुसऱ्या आवृत्तीचे प्रास्ताविक, मराठी दोलामुद्रीते, (संपा. मोरजे गंगाधर) गोमंतक मराठी अकादमी, गोवा, ति.आ. १९९५, पृ. २९.
४. तत्रैव, पृ. ३०. ५. उनि, पेंठे, पृ. ५९.
६. उनि, गावस्कर, पृ. ३५. ७. उनि, पेंठे, पृ. ६०.
८. फाटक न.र., प्रस्तावना, श्रीज्ञानेश्वर वाङ्मय आणि कार्य, नरहर रघुनाथ, मौज प्रकाशन, मुंबई १९५२. पृ. ९.
९. उनि, पेंठे, पृ. ७३.
१०. तत्रैव, पृ. ७३.
११. मंचरकर र.बा., श्री ज्ञानेश्वरी : अध्याय १, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पुनर्मुद्रण २००५, पृ. ३-४.
१२. दाभोळकर गंगाधर गणेश, ज्ञानदेव व ज्ञानेश्वर, शिवराम एकनाथ भारदे उर्फ भारद्वाज, सुगावा प्रकाशन, पुणे ३०, समर्पण, पृ. ४.
१३. धनेश्वर त्र्यं.ग., ज्ञानदेव व ज्ञानेश्वर, श्रीज्ञानेश्वर दर्शन.
१४. दडकर जया आणि इतर, संक्षिप्त मराठी वाङ्मय १९२० पर्यंतचा कालखंड, संपादन जी. आर. भटकळ फाउंडेशन, मुंबई ९८, पृ. ५०७-५०८.
१५. मंचरकर र. बा., मराठी संत साहित्याची प्रस्तुतता, भारतीय संत साहित्य आणि आधुनिकता, विशेषांक आमची श्री वाणी, जू- स. २००६ आणि ऑ. २००६ जा. २००७, का. स. वाणी आणि मराठी प्रगत अध्ययन संस्था १९, पृ.८ ते १०.
१६. मोरे सदानंद, विसाव्या शतकाची पार्श्वभूमी, ज्ञानेश्वरी व विसावे शतक, संपा. तावरे स्नेहल, पृ. २९.


---


डॉ. शिरीष लांडगे । चलभाष : ९४०४९८०३२४
१११२४, कौसल्या, सुभाष कॉलनी, वॉर्ड नं-६, श्रीरामपूर, जि. अहमदनगर-४१३७०९





अनुक्रमणिका

समीक्षा

# समाजपरिवर्तनातील संतांचे योगदान

महाराष्ट्रीय समाजाच्या जडण-घडणीत आणि समाज परिवर्तनातील संतांच्या योगदानाचा डॉ. सुधाकर शेलार यांनी घेतलेला आढावा.

डॉ. सुधाकर शेलार

स्वसंरक्षण आणि स्वसंवर्धन या गरजांपोटी माणसाने समाज घडवला हे सर्वज्ञात असे घटित आहे. या घटिताने मग कालौघात अनेक बाबींची निर्मिती केली आहे. भाषा, अनेक सामाजिक संस्था (राज्य, अर्थ, कुटुंब इ.), देवधर्म, वेगवेगळ्या रूढी-प्रथा-परंपरा, समजुती, ज्ञान-विज्ञान, उदरनिर्वाहासाठीच्या क्रिया-प्रक्रिया, मनोरंजनासाठीच्या विविध कला इ. इ. या सगळ्या निर्मितीच्या संघातातून स्थलकालविशिष्ट अशी जगण्याची रीत अस्तित्वात येत गेली, तिलाच 'संस्कृती' असे संबोधले गेले. ह्या संस्कृतीची वाटचाल मौखिक परंपरेने एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे यदृच्छा होत राहिली. या वाटचालीत प्रकर्षाने काही बदल झाले तेव्हा तेव्हा युगधर्म पालटला, असे म्हणत माणसाने या बदलांना वेगवेगळ्या नावाने अधोरेखित करून ठेवले आहे.

अश्मयुग, लोहयुग, ताम्रयुग अशी युगांची विभागणी किंवा कालगणनेनुसार केली गेलेली प्राचीन, मध्ययुगीन, आधुनिक ही विभागणी समाज जीवनातील टप्पे दर्शविणारीच आहे. ही परिवर्तने का व कशी होतात? मानवाच्या ज्ञान-विज्ञानाच्या कक्षा बदलल्या, की समाजजीवनात अशी परिवर्तने घडून येतात. ही परिवर्तने घडून येत असताना समाजजीवनात अनेक उलथापालथी होत असतात. आहे त्या व्यवस्थेचा लाभार्थी वर्ग परिवर्तनाला विरोध करत असतो; तर बदलांमुळे लाभाची शक्यता ज्याच्या आवाक्यात येऊ पाहते, असा वर्ग परिवर्तनाचे समर्थन करत असतो. जेव्हा विरोधी वर्गापेक्षा समर्थनीय वर्ग बहुसंख्य ठरतो; तेव्हा समाजात नैसर्गिक न्यायतत्त्वाला अनुषंगून परिवर्तन घडून येते. मात्र परिवर्तनाची ही वाटचाल आमूलाग्र नसते. समाजजीवनाच्या काही भागात हे परिवर्तन वेगाने होते; तर काही भागात अतिशय मंदगतीने होत असते. समाजजीवनाचे काही भाग वा काही अंगे तर अजिबातच बदलायला तयार नसतात. समाजजीवनाच्या भौतिक अंगांबाबत हे बदल समाज लगेच स्वीकारतो कारण भौतिक सुख ही दृश्य रूपात प्रत्ययाला येणारी बाब असते व ती स्वीकारणे इंद्रियांना तात्काळ सुखवणारे असते. भौतिक संस्कृतीच्या व्यतिरिक्त असणाऱ्या देव-धर्म, अध्यात्म, नीती आदी बाबतीत मात्र समाज बदलायला तयार नसतो. नवीन ज्ञान-विज्ञानाच्या आधारे त्याला रूढी-परंपरातील फोलपणा, त्यांच्यातील तर्कहीनता लक्षात आलेली असते, तरीही मानसिकतेवरील वर्षानुवर्षांचा पगडा त्याला दूर करता येत नाही. 'कळतंय पण वळत नाही' अशी काहीशी ही अवस्था असते, असे म्हणता येईल. आज आपण या टप्प्यावर येऊन पोहोचलेलो आहोत.

समाजाच्या वाटचालीची प्रक्रिया ही अतिशय गुंतागुंतीची असते. आपल्या समाजात तर जातिव्यवस्थेमुळे ती अधिकच गुंतागुंतीची झाली आहे. कधीकाळी व्यवसायावरून जातींची निर्मिती झाली आणि कालौघात या जाती अधिकाधिक घट्ट होत गेल्या. पुढे तर चार वर्णांची निर्मिती होऊन श्रमविभागणीबरोबर ज्ञान-विज्ञानाचीही विभागणी झाली. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांची नियतकर्मे कोणकोणती होती व कोणती कर्मे कोणासाठी निषिद्ध होती हे सर्वज्ञात आहे. समाजातील ज्ञानाची सत्तासूत्रे हाती आल्यानंतर आपल्या मर्यादित ज्ञानाचा व अंगभूत चातुर्याचा वापर करत ब्राह्मणवर्गाने देव व सामान्य माणूस यांच्यातील मध्यस्थाची भूमिका स्वीकारत श्रमविरहित जगण्याचा मार्ग शोधला. हा मार्ग अबाधित राहावा म्हणून जाणीवपूर्वक समाजमन अज्ञानात राहील अशी व्यवस्था



अनुक्रमणिका

केली. त्यांना खऱ्या ज्ञानाचा बोध होऊ नये म्हणून कर्मकांडांमध्ये गुंतवून ठेवण्यासाठी अनेक पोथ्या-पुराणे रचली. यज्ञसंस्कृतीला जन्म दिला. अशा प्रकारे पुरोहितशाहीने सगळ्याच धर्मविधींचा ताबा घेतला.

या यज्ञसंस्कृतीनंतरचा दुसरा टप्पा आहे यातुसंस्कृतीचा. विश्वाच्या रचनेमागे असलेला देव प्रसन्न करून घेण्यासाठी यज्ञ करणारा माणूस, त्याच विश्वातल्या इतर अदृश्य अशा कल्पित अतिमानवी शक्तींना प्रसन्न करून घेण्यासाठी काही 'यातुविधी' करू लागला. इथेही पुन्हा 'भगता' च्या रूपाने मध्यस्थ आला; आणि जारण-मारणाच्या मंत्रा-तंत्रांनी पुन्हा एकदा बहुजन समाज नागवला गेला. यज्ञसंस्कृतीतील 'कर्मकांडे' आणि यातुसंस्कृतीतील 'विविध विधी' धर्माच्या नावाखाली बहुजन समाजाचे शोषण करत होते, अज्ञानापोटी आपले शोषण होत आहे हे कळण्यापलीकडे या समाजाची अवस्था जाऊन पोहोचली होती. मध्ययुगीन कालखंडात उच्चवर्णीय समाज ऐषोरामात जगत होता, तर शूद्रातिशूद्र दैन्यावस्थेला पोहोचले होते. त्यापूर्वीच्या अश्मयुगात, ताम्रयुगात इतकी टोकाची विषम व्यवस्था नव्हती. सगळी माणसे सारख्याच पातळीवर जगत होती. नंतर मात्र हळूहळू विषमतेची दरी वाढत गेली.

संतमंडळींनी समाजाची ही अवस्था पाहिल्यानंतर त्यांना ती खटकू लागली. बहुजनांमधून उपजलेली, विचारी आणि संवेदनशील असणारी ही माणसं बहुजनांच्या धार्मिक शोषणाविषयी विचार करू लागली. देवा-धर्माच्या अस्तित्वाचा नव्याने शोध घेऊ लागली. धर्मग्रंथांमध्ये जे सांगितलं आहे ते व पुरोहितशाही जे सांगते आहे ते, यात तफावत आहे हे या लोकांच्या लक्षात येऊ लागले. देवाची भक्ती करायची असेल, तर मध्यस्थाची गरज नाही, हे संतांचे प्रतिपादन म्हणजे खऱ्या अर्थाने समाजपरिवर्तनाचे पुढे पडलेले पाऊल होय.

यज्ञसंस्कृती आणि यातुसंस्कृती या दोन्ही संस्कृतीतील हीण वगळून एका नव्या संस्कृतीची पायाभरणी करण्याचा प्रयत्न संतांनी केला. या नव्या संस्कृतीचा पाया 'भक्ती' होता. 'भक्ती' हाच पाया का? मध्ययुगात संतांनी 'भक्ती' ला एवढं महत्त्व का दिलं? याचा विचार प्रामुख्यानं होणं गरजेचं आहे. वारकरी संप्रदायानं काशीयात्रेला पर्याय म्हणून 'पंढरीची वारी' सांगितली. अठरापगड ओट्यागोट्यांच्या देव-देवतांपेक्षा एकच एक 'विठ्ठल' उभा केला. या विठ्ठलाला फक्त नमस्कार करायचा आहे. त्याच्यापुढे जप-अनुष्ठानही करायचे नाही आणि त्याच्या नावाचा गंडादोराही बांधायचा नाहीये. अंतःकरण निर्मळ हवं मग गळ्यात तुळशीची माळ नसली तरी चालेल, असा साधा मार्ग संत सांगताहेत. सगळ्याच संतांनी भक्तिमाहात्म्य का सांगितलं असावं? याचा शोध घेता काही समाजशास्त्रीय आणि मानसशास्त्रीय सत्ये गवसायला लागतात.

समाजात भक्तिमय वातावरण राहिल्याने विकृत वर्तनांना आळा बसू शकतो, समाज एकसंध राहू शकतो, एकमेकांच्या सुखदुःखात सहभागी होऊ शकतो हे समाजशास्त्रीय वास्तव, तर परमेश्वर सतत स्मरणात ठेवल्याने मनामध्ये विकृत भावनेला जागाच उरणार नाही हे मानसशास्त्रीय वास्तव. याचा अर्थ निकोप सामाजिक जीवनाच्या साध्यासाठी 'भक्ती' ह्या साधनाचा आग्रह संतांनी धरलेला होता. संतांचा हा आग्रह निश्चितच परिवर्तनवादी होता. धर्माच्या आणि अध्यात्माच्या क्षेत्रातील हे परिवर्तन निश्चितच महत्त्वाचे होते. हे परिवर्तन फळाला आले असते, तर अन्य समाजांगांनाही त्याने आपल्यासोबत घेतले असते; पण असे होऊ शकले नाही. संतांचा हा भक्तियोग नंतरच्या प्रचारकांना-कीर्तनकारांना उमगलाच नाही. 'भक्ती हेच साध्य' या गृहितकामुळे इतर समाजांगांचा विचार मागे पडला. समाजविचाराची दिशा प्रवृत्तीवादाकडे वळता वळता निवृत्तीवादाकडे झुकली. इहवादी विचारांपेक्षा दैववादी विचार प्रवळ ठरला. खऱ्या धर्मतत्त्वांचा शोध घेऊ पाहणाऱ्या संतपरंपरेच्या पोटी पोथ्या-पुराणांतील गोष्टी बहुजनांच्या माथी मारणारी कीर्तनकारांची परंपरा उदयाला आली आणि महाराष्ट्र आहे तिथेच राहिला. सामाजिक बाबतीत आमची जी प्रगती व्हायला हवी होती ती झाली नाही. त्यामुळे संतांनी समाज परिवर्तनात योगदान दिले हे जरी खरे असले तरी ते कितपत फलदायी ठरले हा प्रश्न शिल्लक उरतोच उरतो.

याचा अर्थ संतांनी परिवर्तनाच्या प्रक्रियेला काहीच योगदान दिले नाही, असे मात्र होत नाही. धार्मिक निर्बंधांमध्ये शिथिलता आणली, भक्तीच्या प्रांगणापुरता का होईना; पण अठरापगड जातींना अभिव्यक्त होण्यासाठी आवाज दिला. कर्मकांडांना फाटा दिला. श्रद्धा आणि अंधश्रद्धा यातील फरक उघड केला; आणि ओट्यागोट्यांचे देव नाकारले. अस्पृश्यतेमागील व्यर्थता स्पष्ट केली. धार्मिक ढोंगांवर प्रहार केले. कर्तव्यपरायणता शिकवली, हे संतांचे योगदान मान्यच करावे लागेल. संतांनी महाराष्ट्र घडवण्याचा निश्चित प्रयत्न केला. महाराष्ट्र घडू शकला नाही, याचा दोष संतांचा किती आणि महाराष्ट्राचा किती याचा शोध घेता दोष महाराष्ट्राच्याच पदरी येईल, असे वाटते.

---

**डॉ. सुधाकर शेलार । चलभाषः ९८९०९१३२३६**
प्रमुख, मराठी संशोधन केंद्र, अहमदनगर
shelarsudhakar@yahoo.com

लेख

# साहित्यातील स्त्रीवाद

साहित्य आणि स्त्रीवाद यांमधील परस्पर संबंधांवर भाष्य करणारा आणि साहित्यातून स्त्रीवादी चळवळींच्या होणाऱ्या दर्शनाविषयी डॉ. तुकाराम रोंगटे यांचा लेख.

डॉ. तुकाराम रोंगटे

आपण स्त्रीवाद, स्त्रियांचे प्रश्न आणि त्यातून उदयास आलेल्या स्त्रीवादी चळवळींचा जेव्हा विचार करू लागतो, तेव्हा पाश्चात्त्य जगातील स्त्रियांनी केलेले बंड दिसू लागते. १९६० सालाच्या दरम्यान जगातील काही पुढारलेल्या देशांत 'स्त्री - प्रश्नांसंबंधी नवा विचार, सुरू झाला. त्याआधी म्हणजे १९४९ साली सीमाँ दी बूव्हा ह्या फ्रेंच विचारवंत स्त्रीने लिहिलेले 'The Second Sex' हे पुस्तक अनेकांच्या डोळ्यांत अंजन घालणारे आहे. पुढे जर्मेन ग्रिअर हिने 'The Female Eunuch' मायरस्टोनने 'The Dialectic of Sex' असे अत्यंत खळबळजनक ग्रंथ लिहिले. खऱ्या अर्थाने त्यांचे हे अत्यंत जहालवादी असे विचार होते. त्यांनी स्त्रिया व पुरुष यांच्यात मूलत: काही फरक असतात, हेच नाकारले. यांतील बूव्हाच्या परखड मांडणीने अख्ख्या पुरुषसत्ताक डोलाऱ्याला तडे गेले. स्त्रियांच्या प्रश्नांची आणि हक्कांची नेमकी जाणीव करून देण्याची मूलभूत गोष्ट बूव्हा यांनी आपल्या ग्रंथात अत्यंत अभ्यासपूर्ण मांडली. 'स्त्री म्हणजे नेमके काय?' ह्या प्रश्नाला हात घालताना बूव्हाने स्त्रीत्वाची व्याख्या तिच्या शारीरिक कार्याशी आणि सनातन स्त्रीत्वाशी जोडून करण्याचे नाकारले. तिने स्वत:च्या आयुष्याच्या निवडीतून तिच्या अन्वयार्थाचा शोध घेतला. कुटुंबसंस्था, विवाहसंस्था आणि मातृत्व नाकारून तिने एक अभ्यासक म्हणून जगायचे ठरविले. स्त्री ही पुरुषांप्रमाणेच स्वायत्त, स्वतंत्र निर्मितीक्षम माणूस आहे. यावर भर देताना तिने अस्तित्ववादी दृष्टिकोनातून पाहिले. पुरुषांच्या संदर्भात स्त्री 'द अदर' बनवली म्हणून तर पुरुष 'सर्जनशील माणूस' म्हणजे 'फर्स्टक्लास' वावरू लागला. साहजिकच स्त्रीच्या वाट्याला निष्क्रिय भूमिका आली; पण असे असले, तरी स्त्रियांना सर्जनशीलतेच्या वाटा मोकळ्या झाल्या पाहिजेत, असे बूव्हा परखडपणे मांडतातच. शिवाय स्त्रीचे शारीरिक वेगळेपण, गरोदरपणातील परावलंबन आणि घरकामातील काबाडकष्ट व सर्जनशीलतेचा पूर्ण अभाव या कारणांवर तिने भर दिला आहे.

स्त्रीवादाची व्याख्या करणे अत्यत क्लिष्ट असले, तरी स्त्रीवादाविषयी बोलणे म्हणजे फक्त स्त्रियांविषयी अथवा स्त्रियांच्या प्रश्नांविषयी बोलणे नाही, तर स्त्री आणि पुरुष दोघेही स्वत:च्या अनुभवांतून आणि आपल्या भोवतालच्या परिसराच्या अभ्यासातून न्याय्य जगाची कोणती कल्पना करतात, याचा शोध घेणे म्हणजे स्त्रीवादाच्या जवळ जाणे होय. स्वत:च्या वैयक्तिक दु:खाचा परीघ भोवतालच्या परिस्थितीशी जोडून घेत त्यातील सामान्य दुवे शोधणे; त्यातून स्त्री-पुरुष साहचर्यावर आधारित जीवनाची संकल्पना करता येते. त्याचे तत्त्वज्ञान उभे करण्याचा प्रयत्न म्हणजे स्त्रीवाद अशी व्याख्या 'स्त्रीवाद, साहित्य आणि समीक्षा' या ग्रंथाच्या लेखिका वंदना भागवत करतात.

स्त्रीवादाचा विचार करताना आपल्याला आदिम मातृसत्तेकडे दुर्लक्ष करणे अजिबात परवडणारे नाही. शेतीचा शोध स्त्रीने लावला, असे मानववंश शास्त्रज्ञांचे जे म्हणणे आहे, ते काही चूक नाही. मनुष्यप्राणी गुहेत राहत असतानाची गोष्ट आहे. एके दिवशी शिकारीसाठी तो गुहेतून

बाहेर पडला. बरोबर त्याच वेळेला इकडे गुहेत भुकेने बाळ टाहो फोडू लागले. म्हणून त्याची आई गुहेच्या बाहेर काही मिळतेय का बघायला आणि झाडावरचे वाळलेले फळ खाली पडायला एकच वेळ. ते फळ रप्पदिशी जमिनीवर पडले. त्यातील बिया इतस्तत: विखुरल्या. तिला मोठी गंमत वाटली. तिने त्या बिया उचलल्या आणि गुहेजवळच्या मातीत पुरल्या. पुढे पाऊस पडला, बियांचे झाड, मग फुले, फळे देणारी झाडे आली. पुढे तिने अनेक बियांचे प्रयोग केले. झाडाच्याच काडीने तिने जमीन उकरून मशागत करून गुहेच्या अवतीभोवती फळे देणारी झाडे लावली. त्यातून काकडी, दोडके, घोसाळे, टरबूज, कलिंगड, घेवडा, गाजर, तोंडळे, कारले, शेवगा अशा शेकडो भाज्यांची पैदास तिने केली आणि पुरुष शिकारीसाठी वणवण भटकत असताना स्त्रीने शेतीच्या जीवनाला स्थिरता दिली. तिने अनेक बीजांचे गुणधर्म ओळखून खाण्यायोग्य बीजांचे संगोपन केले, त्यातून आपल्याला शरीर साभाळता आले आणि स्त्रीला संस्कृतीची जोपासना करता आली; पण पुढे थोड्याच दिवसांत नांगराचा शोध आणि शिकारी पुरुषाने लबाडी करून शेतीचा शोध हायजॅक केला. तो शोध मीच लावला, अशी हाकाटी त्याने केली. हे कटू सत्य आपल्याला समजून घ्यावे लागेल. ह्या शेतीच्या संदर्भाच्या निमित्ताने मला दंडकारण्याची महान सम्राज्ञी शूर्पणखेची तीव्रतेने आठवण होते. ती यासाठी की, तारा वनारसे यांनी 'श्यामिनी' ही शूर्पणखेच्या कार्यावर प्रकाश टाकणारी कादंबरी लिहिली आहे. खरा स्त्रीवाद तर रामायणातल्या शूर्पणखेपासून सुरू होतो. वनारसे म्हणतात, ''रावणाच्या अंतर्गृहामध्ये दीर्घकाळ बंदिवासात राहूनही सीतेचे शील अकलंकित राहिले. असा निर्वाळा देऊन स्वत: वाल्मिकींनी रावणाचे स्त्री दाक्षिण्य म्हणजे खरे तर स्त्रीवाद मान्य केला आहे कारण ज्या दक्षिणेच्या सुसंस्कृत, संपन्न राज्याची श्यामिनी ही सम्राज्ञी आहे, ते राज्य अत्यंत विकसित, सांस्कृतिक आचारांनी आणि व्यवहारांनी डौलदार उभे आहे. त्याचे कारण मातृसत्ताक प्रभाव संस्कृती होय, म्हणजे आईचा, माईचा कारभार, फक्त राजकारणच नव्हे. ज्या वेळी राम-लक्ष्मण दंडकारण्याची परवानगी न घेता घुसखोरी करतात हे दंडकारण्याच्या सभ्यतेला मान्य नाही. त्या वेळी अत्यंत बुद्धिमान आणि राजकारणी डावपेचात तरबेज असणाऱ्या शूर्पणखेला आपल्या राज्यावर शत्रूने आक्रमण केले आहे, हे समजले नसेल काय? कारण विकसित, प्रगल्भ संस्कृतीतील राजकारणही विकसित आणि सावध असते. असे असताना ही शूर्पणखा अल्लडपणे रामाच्या प्रेमात पडेल आणि त्या अनिवार प्रेमातून सीतेचा मत्सर करेल, हे अगदीच सामान्य लैंगिक स्पष्टीकरण आहे. इतक्या तकलादू स्पष्टीकरणावर एवढी प्रचंड सांस्कृतिक स्थित्यंतरे तोलता येणार नाहीत.

सीता आणि शूर्पणखेच्या पारंपरिक इतिहास लेखनाच्या धारणांशी भिडणाऱ्या प्रतिमा तारा वनारसे अत्यंत खुबीने बनवतात. त्यातून मुख्य प्रवाही राजकारणाला वैधता मिळेल काय? म्हणजे स्त्रिया उत्कट, भावप्रधान अविचारी आणि मत्सरी असतात. म्हणून असे इतिहास घडतात; असे म्हणणाऱ्यांना यातून पुष्टी मिळण्याचा दाट संभव आहे.

शूर्पणखेचे नाव चंद्रमुखी असताना शूर्पणखा कसे पडले, तर ती अत्यंत गुणसंपन्न आणि रूपवान म्हणजे स्वरूपवान म्हणजेच शूर्पणखा होती. तसेच ती मातृसत्तेला अंगिकारणारी शेतीतज्ज्ञ होती. ती दंडकारण्यातील सर्व स्त्री-पुरुषांना एकत्र करून शेती विकसन करण्याच्या तंत्रज्ञानाचे प्रशिक्षण घ्यायची. खळ्यातील उंच जागेवर उभे राहून धान्य उफणताना धान्याचे सूप आपल्या टोकदार नखांवर उडवून नाचवायची. त्या वेळी ती अधिकच रूपवान दिसायची.

सुरुवातीचा मानवी इतिहास हा मातृसत्ताक संस्कृतीचा इतिहास आहे. त्यातील क्षेत्रपाल स्त्रिया होत्या. गावाच्या वेशींचे रक्षण करणाऱ्या 'सात आसरा' ही संकल्पना मातृसत्ताक संस्कृतीची देणगी आहे. मातृसत्ताक जीवनपद्धतीत शेतीतून झालेल्या अतिरिक्त उत्पादनाचे समान वाटप करण्याचे काम स्त्रिया करीत, असे कॉ. शरद पाटील या तत्त्वज्ञांचे म्हणणे आहे.

मातृसत्ताक संस्कृती केवळ भारतातच नव्हे, तर जगात इतरही ठिकाणी अस्तित्वात असल्याचे कितीतरी पुरावे मिळतात. इतिहासामध्ये क्लिओपात्राचा इतिहास तपासला, तर तिथे भूमीशी आणि शेती-व्यापाराशी जोडलेली मातृसत्ता अस्तित्वात होती, हे सिद्ध होते. रोमन साम्राज्य विस्ताराने या सत्तांना उद्ध्वस्त करून बदनाम केले. इस्लामचा उदय होण्यापूर्वी मातृसत्ताक पद्धती होती, तीही इस्लामच्या उदयानंतर नष्ट झाली. येशूच्या जीवनात त्याची आई मदर मेरी आणि त्याची मैत्रीण मेरी मॅगडेला जी आधी वेश्या होती, त्या दोघी येशूबरोबर खुलेपणाने वावरल्या. येशूवर आलेल्या संकटाच्या काळात त्याचे पुरुष शिष्य भयापोटी पळून गेले. मात्र त्या दोघींनी येशूला शेवटपर्यंत साथ दिली. मात्र जेव्हा बायबलचे प्रमाणीकरण करण्यात आले, त्या वेळी स्त्रियांना वगळले गेले आणि पाप ही संकल्पना स्त्री - पुरुष नात्याच्या लैंगिक व्यवहाराशी जोडली गेली. स्त्री देह म्हणजे पापाची



अनुक्रमणिका

खाण अशा प्रतिमा, लैंगिकता जणू काही फक्त स्त्रियांकडूनच वापरली जाते असे समज, पुरुषांच्या हिंसेचं समर्थन करण्यासाठी बाईच्या शरीराला काचेचे भांडे म्हणण्यासारखी रूपके वापरणे, स्त्रीची लैंगिकता व्यवस्थेकडून नियंत्रित व्हावी यासाठी कायदे व त्यांची दहशत निर्माण करणे, असे सर्व मार्ग वापरले गेले.

आदिम मातृसत्ता प्रामुख्याने स्त्रियांनीच निर्माण केलेल्या कृषिसंस्कृतीतून निर्माण झाली असल्याने बी जमिनीत रुजते आणि त्यातून धान्य निर्माण होते, हे आदिम काळातील माणसाला जादुई वाटत असणार. त्यामुळे बी रुजणे म्हणजे सुपीकता माया 'Fertility Magic' आणि धान्य निर्माण होणे म्हणजे कृषि-माया 'Agricultural Magic' यांचा संबंध स्त्रीच्या प्रजनन क्षमतेशी जोडून आदिम काळात स्त्रीच्या हाती निर्मितीची आणि त्यातून येणाऱ्या वाटपाची जबाबदारी तिच्याकडे होती. भूमीतून धान्य काढल्यावर भूमीची सुपीकता परत एकदा मिळवायची झाली, तर नांगरणी व पेरणी करावी लागते. या अर्थाने भूमीच्या संभोगावर काही मर्यादा नाही. तिथे पित्याला महत्त्व नाही. म्हणजे अपत्याचा पिता माहिती नसणे यात वावगे काही नाही. शेतीचे उत्पादन पुरेसे येण्यासाठी त्या काळात उत्पादनाची, निर्मितीची देवता पूजणे व तिला प्रसन्न करण्यासाठी म्हणून काही तंत्र निर्माण करणे यातून विधी, नृत्य, प्रार्थना यांचा जन्म झाला असावा. याचा अर्थ स्त्रियांना शेती उत्पादन व्यवस्था म्हणजेच पर्यायाने शरीर सांभाळण्याचे अधिकार मातृसत्ताक जीवनपद्धतीत होते. स्त्री-पुरुष नात्याच्या रूपकात्मक सादरीकरणात अनेकदा पुरुष हा बीज देणारा आणि स्त्री ही ते बीज रुजवणारी अशी प्रतिमा येते. सीता ही भूमिकन्या अशाही अर्थाने बघता येते. ती शेतात सापडणे, नांगराचा फाळ सीतेला ठेवलेल्या पेटीला अडणे या सगळ्यांचा अर्थ पुरुष भुई नांगरणारा आणि बी पेरणारा क्षेत्रपाल, तर भूमी म्हणजे ते बीज उगवणारे क्षेत्र या परंपरेने आपल्याला देऊ केलेल्या संकल्पना आहेत. त्यातून मग 'बीज-क्षेत्र न्याय', 'भूमिपुत्र' अशा गोष्टी आल्या. पुढे पुरुषसत्ताक पद्धती आल्यानंतर या परंपरांचे विकृतीकरण झाले आणि मग गौतम ऋषींनी शाप देऊन अहल्येची शिळा करणे, अहल्या म्हणजे नांगर न चालवलेली अस्पर्श जमीन, रामाने सीतेचा त्याग करणे - सीता म्हणजे शेत. रेणुकेच्या मनात पतीखेरीज परपुरुषाचा विचार आल्यामुळे जमदग्नी ऋषींनी त्यांच्या पुत्राकरवी म्हणजे परशुरामाच्या हातून स्वतःच्या आईचा, रेणुकेचा शिरच्छेद करवणे, गंगेने तिच्या नवजात मुलांना नदीत सोडून देणे, कुंतीने कर्णाचा त्याग करणे, कुंतीचे मूळ नाव पृथा म्हणजे खडबडीत जमीन असणे अशा मिथक कथा निर्माण झाल्या.

● **आंतरराष्ट्रीय स्त्रीवाद :**

स्त्रीवादाचे राष्ट्राशी असणारे नाते व्हर्जिनिया वूल्फने अतिशय नेमकेपणाने मांडले होते. तिने स्त्रियांना सावधगिरीचा इशारा १९३८ मध्येच दिला होता. दुसऱ्या महायुद्धात सुशिक्षित पुरुषांच्या मुलींची भूमिका काय असायला हवी, हे 'Woman and Nationalism' या निबंधातून मांडताना ती म्हणते, 'In fact as a woman, I have no country. As a women I want no country. As a women my country is the whole world' वस्तुस्थिती सांगायची झाली, तर एक बाई म्हणून मला देश उपलब्ध नाही. एक बाई म्हणून मला देश नको आहे. एक बाई म्हणून सांगते की, संपूर्ण जगच माझा देश आहे. गोऱ्या साम्राज्यवादी राष्ट्रातील स्त्री म्हणून दुसऱ्या महायुद्धाच्या आधी तिने मांडलेले विचार महायुद्धोत्तर युरोपमध्ये किती अचूक ठरले, हे पाहण्यासारखे आहे.

स्त्रियांची विटंबना किती करावी? डेन्मार्कमध्ये अनेकदा बायकांचे डोके भादरताना नग्न केले जायचे आणि त्यांच्या स्तनांवर, नितंबांवर नाझी प्रतीके रंगवली जायची. त्यांची शरीरे सार्वजनिक मालमत्ता मानली गेली, पुरुषांची मालमत्ता. १९४५ मध्ये युद्ध काळात एका जर्मन अधिकाऱ्याबरोबर संबंध ठेवलेल्या आर्लेटी या फ्रेंच अभिनेत्रीने न्यायालयात स्वतःची बाजू मांडताना सांगितले होते, की माझे हृदय फ्रान्सच्या मालकीचे असेल; पण माझी योनी माझी आहे.

१९४५-४७ च्या फाळणीच्या काळात भारत, पाकिस्तान सीमा भागात घडलेले बलात्कार लक्षात घेतले आणि आज धर्माधर्मातील राष्ट्रवादाचे जगभरातील स्त्रियांना आलेले अनुभव, जातीय अत्याचार, धार्मिक दंगलीमधील स्त्रियांची विटंबना लक्षात घेतली, तर राष्ट्र नावाच्या संकल्पनेची सतत चिकित्सा करत राहावी लागेल, हे स्त्रीवाद सांगतो. कीथ लोव यांच्या पुस्तकाइतकेच उर्वशी बुटालियांचे 'The other side silence : Voices from the partition of India' हे पुस्तक महत्त्वाचे आहे. फाळणीच्या अनुभवांचे विदारक दर्शन यातून घडते. स्त्रीवादी चळवळीच्या एका टप्प्यावर गुलामीची पार्श्वभूमी असणाऱ्या अमेरिकन समाजाला सारा ग्रिमकेने १९३८ मध्येच स्पष्टपणे विचारले होते, की बायकांना निव्वळ सुंदर खेळणी किंवा सुखोपभोगाचे साधन म्हणून वापरणारे किंवा काळ्या गुलाम स्त्रियांना पाशवी लैंगिक छळ आणि हिंसेला बळी पाडणारे



अनुक्रमणिका

अमेरिकन पुरुष नीतिमान कसे असू शकतात? स्वत:च्या नवऱ्यांना गुलाम स्त्रियांवर वारंवार लैंगिक अत्याचार करताना आणि बेकायदेशीर लैंगिक संबंध ठेवताना या बायका बघतात, त्यांची ही वागणूक समाजमान्य करतात. अशा गोऱ्या बायका तरी असल्या समाजात नीतिमान कशा असू शकतात? म्हणजे गोऱ्या स्त्रिया जरी गोऱ्या पुरुषांकडून काळ्या स्त्रियापेक्षा वेगळ्या वागवल्या जात असल्या, तरी त्यांनी स्वत:ला नीट तपासलं, तर वैश्विक नैतिकतेच्या अंगाने त्याही पुरुषसत्ताकतेच्या बळीच आहेत, ही ग्रिमकेची दृष्टी कमालीची ताकदवान म्हणावी लागेल.

अमेरिकेत ओहायो इथे १८५१ मध्ये भरलेल्या स्त्री हक्क परिषदेत जेव्हा व्यासपीठावरील स्त्रियांच्या विरोधात काही पुरुषांनी आवाज उठवला, तेव्हा त्यांना थांबवत पूर्वाश्रमीची गुलाम असलेली साजर्नर ट्रूथ म्हणाली, 'तो तिथे बसलेला इसम म्हणतोय की, बायकांना साधे घोडागाडीत चढायला हात द्यावा लागतो, खड्ड्यावरून उडी मारायची, तर उचलून घ्यावे लागते. जिथे जातील, तिथे त्यांच्यासाठी उत्तम जागा ठेवाव्या लागतात, ट्रूथ ओरडली, म्हणाली, मला कधी कोणी हात दिला नाही; घोडागाडीत चढताना, ना कधी चिखलांनी भरलेले खड्डे ओलांडताना, मला कधीही उत्तम जागा मिळाली नाही. मग मी काय बाई नाही? माझ्याकडे बघ, बघ माझे हात! मी जमीन नांगरली आहे, पेरणी केली, धान्य गोळा करून कणग्यांत भरले आहे. या बाबतीत कोणताही पुरुष माझ्यापुढे जाऊ शकत नाही. एखादा पुरुष करेल तेवढी कामे मी करू शकते आणि मिळालेच, तर तो खाईल तेवढे अन्न मी खाऊ शकते. चाबकाचे फटकेही खाऊ शकते! मी तेरा मुले जन्माला घातली आहेत आणि बहुतेक सगळी गुलाम म्हणून विकली जातानाही बघितली आहेत, आणि आता मी बाई नाही?' अशा स्त्रीमुक्ती किंवा स्त्री हक्कांसाठीच्या लढ्यात कितीतरी पाश्चात्त्य स्त्रिया लिहिताना आणि प्रत्यक्ष काम करताना बघायला मिळतील.

- **भारतीय स्त्रीवाद :**

पाश्चात्त्य देशात स्त्रीवादाची मांडणी १७ व्या शतकाच्या अखेरीस सुरू झाली आणि आपल्याकडे ब्रिटिश भारतात आल्यानंतर म्हणजे १९ व्या शतकात ताराबाई शिंदे लिखित 'स्त्री पुरुष तुलना' या पुस्तिकेच्या संपादनात डॉ. विलास खोले लिहितात की, 'स्त्रीवाद हे आधुनिक अवकाशातील रचित आहे. लोकशाही जीवनपद्धती आणि स्वातंत्र्य, समता आणि भगिनीभाव यांचा उच्चार करणारी ही विचारधारा आज स्वत:चे तत्त्वज्ञान घडवण्याचा प्रयत्न करते आहे.' आजच्या टप्प्यावर ज्या व्यवस्थेला पुरुषसत्ताक व्यवस्था म्हटले, त्या पुरुषरचित व्यवस्थेत पुरुषाचीही कोंडी होते आहे, असे स्त्रीवाद म्हणतो आहे. त्यातून संपूर्ण जग हिंसाचाराच्या खाईत लोटले जात आहे व आपल्या जगाचा विनाश होण्याच्या मार्गावर आपण चाललो आहोत, याची जाणीव पुरुषाला व्हावी, असा आग्रह स्त्रीवाद धरतो आहे, ही आशादायी बाब म्हणावी लागेल.

मानवी संस्कृती, मानवी अनुभव, मनुष्य स्वभाव, दु:ख, आनंद आणि हजारो प्रश्नांना कवेत घेऊन वाटचाल करणारा कलाप्रकार म्हणजे साहित्य. हे आव्हान स्त्रीवाद आणि स्त्रीवादीसाहित्य कसे वेगळ्या पद्धतीने पेलते आणि सामाजिक परिवर्तनातून वेगळी जीवनदृष्टी आणि मूल्यभान कसे देऊ करते याची खरी समीक्षा होणे गरजेची वाटते. भारतातल्या स्त्रीवादाविषयी बोलत असताना ल. स. १८८२ साली ताराबाई शिंदे ह्यांनी लिहिलेल्या 'स्त्री-पुरुष तुलना' ह्या पुस्तिकेची आठवण झाली नाही तरच नवल! ताराबाईंना प्रत्यक्ष स्त्रीजीवनाचा अनुभव असल्याने स्त्रीदास्याचा प्रश्न त्यांनी नेमकेपणाने मांडला आहे. जहाल आणि सडेतोड शब्दांमध्ये सगळ्या पुरुषांना जाब विचारण्याची ताकद आहे. बायका अबला झाल्या यात नैसर्गिक असे काही नाही, तर हे पुरुषी वर्चस्वामुळे घडले आहे, हे ताराबाई स्पष्ट लिहितात.

'स्त्रिया केवळ गोठ्यातील म्हशीप्रमाणे मूर्ख, त्यांना ना लिहिणे जमेना, ना वाचणे म्हणून का ईश्वराने त्यांना काहीच बुद्धी दिली नसेल काय? तरी त्या अविचारी असूनही तुमच्यापेक्षा बऱ्या. तुम्ही शहाणे आहात खरे; पण इकडे कारागृहात जाऊन पाहावे, तो पाय ठेवण्यासदेखील जागा मिळत नाही, इतकी तिथे आपल्या देशबांधवांची दाटी असते. तिथे काय सर्व शहाणे, कोणी कोणाची बायको पळवून नेली, तर कोणी खोट्या नोटा केल्या, तर कोणी कोणाला विषप्रयोग केला, कोणी खून केले, ही अशी कृत्यं केल्यावरून सरकारने तुम्हाला मोठ्या आदराने या सुंदर बंदिशाळेसारख्या रंगमहालात जागा दिली; पण असे कोणते अविचार स्त्रियांच्या हातून घडतात बरे?' असा रोखठोक सवाल त्या पुरुषवर्गाला विचारतात.

'फुले यांच्या पुण्यातल्या शाळेत १४ वर्षांची मुक्ता साळवे दाखल होते आणि तेथील उच्चनीचता निरखून आपल्या मनाशी एक खूणगाठ बांधते. आपण जर सर्व एकाच देवाची लेकरं आहोत, तर मग हा भेदभाव कसा? म्हणून ती १८५५ सालातल्या भास्कर पांडुरंग हिवाळे यांच्या 'ज्ञानोदयाची पहिली शंभर वर्षे' या ग्रंथात आपला एक निबंध

लिहिते, 'वेद जर ब्राह्मणांसाठी आहेत, तर आम्हासाठी काही नाही. हे भगवान, तुजकडून आलेला कोणता धर्म तो आम्हास कळीव, म्हणजे आम्ही सर्व त्यांच्यासारख्या रीतीने अनुभव घेऊ; परंतु इतकेच नाही तर आम्हा गरीब मांग, म्हारास हाकून देऊन आपण मोठमोठ्या इमारती बांधून हे लोक बसले व त्या इमारतीच्या पायात आम्हास तेल, शेंदूर पुरण्याचा व आमचा निर्वंश करण्याचा क्रमच चालविला होता... एका 'शिवमण्याच्या बंदीपासून आम्हास किती दु:खे पडतात... आम्हास कोणी चाकरी ठेवीत नाही... ज्या वेळेस आमच्यातील स्त्रिया बाळंत होतात, त्या वेळेस त्यांच्या घरावर छप्परसुद्धा नसते. म्हणून हीव, पाऊस यांच्या उपद्रवामुळे बऱ्याचदा त्यांस बाळंतरोग झाला, तर औषधास व वैद्यास पैसा कोठून मिळणार? असा कोणता तुम्हामध्ये संभावित वैद्य होता की, त्याने लोकांस फुकट औषधे दिली?'

या निबंधातला एकेक शब्द वाचताना आपल्या लक्षात येईल की, खऱ्या स्त्री शिक्षणामुळे आपल्या समाजातल्या साचलेपणाला सुरुंग लावण्याच्या किती प्रचंड शक्यता निर्माण झाल्या होत्या. वरील निबंधात विचारले गेलेले प्रश्न वाचले की, आपल्या लक्षात येते की, स्त्री शिक्षणाची ठिणगी पडण्याची शक्यता फुले यांनी निर्माण केली होती. स्त्री प्रश्नाला वाचा फोडण्याचा एक मार्ग खुला झाला होता; पण स्वातंत्र्य लढ्यातून बाहेर पडलेल्या स्वतंत्र भारतात पुन्हा एकदा प्रस्थापित वर्गाची मक्तेदारी आली आणि स्त्री शिक्षण फक्त काही थरांत गेले. कष्टकरी, दलित, आदिवासी स्त्रियांना तर लाकूडफाटा, पाणी, मुलाबाळांची उस्तवार करताना उसंत नव्हती. ब्राह्मणी सुधारकांनी एरवी कितीही चुका केल्या असल्या, तरी एका उदारमतवादी दृष्टिकोनातून त्यांनी त्यांच्या बायकांना, मुलीबाळींना शिकवले. नर्स, शिक्षिका, प्राध्यापक, डॉक्टर यांसारख्या व्यवसायात आणले; पण बहुजन समाजातल्या स्त्रियांचे काय? जर ह्या शिकल्या, चिकित्सक विचार करू लागल्या, विवेकाने बोलू लागल्या, तर आपल्याला हवे ते 'पडदानशीन', 'संयत' असे त्यांचे रूप संपेल, अशी भीती तर पुरुष नेतृत्वाला वाटत नसेल ना? अशी सडेतोडपणे मुक्ता साळवे पुरुषांची कान उघडणी करतात.

पुरुषसत्ताक व्यवस्थेत बायकांच्या व्यक्त होण्यावरही मर्यादा आल्या कारण बायकांनी मर्यादाशील राहायचे, संस्कृतीरक्षण करायचे, तर त्यांची भाषाही मर्यादेत हवी, या अपेक्षेतून स्त्रियांच्या व्यक्त होण्यावर मर्यादा आल्या. त्या मर्यादा ओलांडणारी बाई ही सामाजिक अधिक्षेप करणारी आणि म्हणून शिक्षेस पात्र बाई, असे समजले जाऊ लागले. जोवर स्वतंत्रपणे विचार करून तो स्वत:च्या भाषेत स्त्री मांडत नाही, तोवर मूल्यांची निर्मिती होणे शक्य नाही, असे स्त्रीवाद्यांनी सांगितले. मग त्यातून काही मोजक्या स्त्रिया घराबाहेर पडल्या आणि जगाच्या अनुभवांनी समृद्ध होऊ लागल्या, तेव्हा त्यांची भाषा स्वत:चे सौष्ठव घेऊन आली. मराठी साहित्यातील स्त्रियांच्या लेखनाचा प्रवास बघितला, तर आपल्याला ताराबाई शिंदे, लक्ष्मीबाई टिळक, विभावरी शिरूरकर, कमल देसाई, गौरी देशपांडे, अंबिका सरकार, शांता गोखले, मेघना पेठे, प्रिया तेंडुलकर, कविता महाजन, प्रतिभा जोशी, सानिया, नीरजा, प्रज्ञा पवार, अनुराधा पाटील, शिल्पा कांबळे अर्थात ही यादी आता झपाट्याने वाढायला हवी. ह्या लेखिकांची भाषा अत्यंत स्पष्ट आणि टोकदार बनण्यामागची कारणेही शोधावी लागतील.

अलीकडे स्त्रीवादी विचारवंतांनी मुख्य प्रवाही इतिहास लेखनाविषयी अनेक प्रश्न उपस्थित केले. पारंपरिक इतिहासातून स्त्रियांना का वगळले गेले? स्त्रियांचे उल्लेख त्रोटकपणे का आले? जेव्हा पुरुष लढत होते, तेव्हा स्त्रिया काय करत होत्या? त्यांची दखल इतिहासात का घेतली गेली नाही? स्त्रिया मुलांना जन्म देतात, त्यांना घडवतात, संस्कृती जपतात, तिचे संवर्धन करतात, अन्ननिर्मिती करतात, शेतीतून उत्पादन करतात, असे असले, तरी ह्या गोष्टींना इतिहासात स्थान कसे नाही? अशा प्रश्नांची उत्तरे न दिसल्याने ज्योती लांजेवारांसारखी कवयित्री पुरुषसत्तेलाच हादरे देत लिहिते की, श्रीकृष्ण हा देव काही भक्तांच्या अडचणींसाठी धावून जाणारा आहे, तो आमच्यावर होणाऱ्या अन्यायाच्या वेळी का धावत नाही, म्हणून लांजेवार देवालाच कोंडीत पकडते.

'हे कृष्णा, तुझ्या राज्यात आया बहिणींवर अत्याचार व्हावेत आणि तू डोळे मिटावेत असे छान?

मग तुझ्या सुदर्शन चक्राचा किताब माघारी कर आता आमच्याही बांगड्यांना तलवारीची धार आली आहे.'

आज आमच्या मध्यमवर्गीय स्त्रियांना अनुभवांचे वेगळे विद्रोही विश्व उभे करणारे साहित्य सखीभावाचे, मानवतेचे मूल्य अधोरेखित करू पाहत आहे. त्यानिमित्ताने आवर्जून उल्लेख करावा वाटतो, तो वामनदादा कर्डकांसारख्या 'De-Gender' होऊ पाहणाऱ्या कार्यकर्त्याच्या एका गाण्याचे उदाहरण सांगता येईल. उच्चवर्णीय बाईकडे घोटभर पाण्यासाठी याचना करणारी दलित कष्टकरी बाई तिच्याशी सखी भावनेतून बोलताना म्हणते, 'घरी तान्हा फुटला पान्हा

स्तन तटाटले गळताना

**पुरुषसत्ताक व्यवस्थेत बायकांच्या व्यक्त होण्यावरही मर्यादा आल्या कारण बायकांनी मर्यादाशील राहायचे, संस्कृतीरक्षण करायचे, तर त्यांची भाषाही मर्यादेत हवी, या अपेक्षेतून स्त्रियांच्या व्यक्त होण्यावर मर्यादा आल्या. त्या मर्यादा ओलांडणारी बाई ही सामाजिक अधिक्षेप करणारी आणि म्हणून शिक्षेस पात्र बाई, असे समजले जाऊ लागले. जोवर स्वतंत्रपणे विचार करून तो स्वत:च्या भाषेत स्त्री मांडत नाही, तोवर मूल्यांची निर्मिती होणे शक्य नाही, असे स्त्रीवाद्यांनी सांगितले.**

भिजली गं माझी चोळी ।
या उन्हामध्ये जळताना
अगं बन माता बन आता तरी, मन माझं ताड गं
पाणी वाढ गं माय, पाणी वाढ गं'

स्त्रियांनी एकमेकींच्या प्रश्न आणि दु:खाविरुद्ध एकत्र येताना इतर वंचितही त्यांच्यासोबत चालावेत आणि स्त्री प्रश्न आणि दलित वंचितांचे जातिविषयक प्रश्नांचे मार्ग आणि शोधण्यासाठी सोबत जावे हे वामनदादा अत्यंत सूचकपणे शेवटच्या कडव्यात सांगतात.

'बांधून शिदोरी पाठी। पाण्याच्या घोटासाठी
दलितांचा वामनदादा। आला गं इहिरीकाठी
अगं दुरून आल्या मुशाफिराला ।
जल्दी धाड गं, पाणी वाढ गं माय, पाणी वाढ गं.'

म. फुल्यांनी शूद्रातिशूद्रांच्या लढ्याला, लिंगभेदभाव अंताला दिलेले महत्त्व, म. गांधींनी दलित उद्धारासोबत केलेले स्त्रीमुक्तीचे चिंतन आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी घटनेत स्त्री-पुरुषांना बहाल केलेले व्यक्तिस्वातंत्र्य या विचारांची सांगड घालणारा सखीभाव आणि मानववाद स्त्रीवादी लेखनाच्या केंद्रस्थानी असणे अनिवार्य आहे.

'आहे हे असे आहे' मध्ये गौरी देशपांडे लिहितात,

'सगळ्या बायकांनी मिळून एक कॉलनी करावी मोठी. तिथे प्रवेश फी सगळ्या पुरुषांना. सदरा धुवून हवा का? टाक पैसे, चपाती हवी ना? टाक पैसे, बाई हवी का शेजेला? टाक पैसे, मूल हवं ना, नाव चालवायला? टाक पैसे'

अशा जळजळीत वास्तवावर मार्मिक भाष्य केले आहे. नारी समता मंचानं काढलेल्या 'गाणी मैत्रिणींच्या' या पुस्तिकेतल्या 'तुम्ही खुशाल समदी न्हावा काय ते पत्रात लिव्हा' असे कळवायला सांगणारी बायको मोठे बंडच करते. त्याला बरोबर कचाट्यात सापडवून वदवून घेते की, 'कुण्या मेल्याने तुला कळविलं, मी ठुमकते रस्त्यावर पाणी आणायला जाऊ का नको काय ते पत्रात लिव्हा मीटिंगला जाते, मोर्चाला जाते, त्याविनं कसं जगणार? येतो मी बी साथ द्यायला, असं पत्रात लिव्हा.'

या गाण्यातून तिच्या नवऱ्याने तिच्या बाहेर जाण्याला, रस्त्यावर ठुमकते म्हणणे यातून तिची कोंडी आणि तिने स्वत: करून घेतलेली मुक्ती या दोन्हीही गोष्टी समोर येतात.

स्त्रीवादाचे समकालीन चर्चाविश्व अधोरेखित करताना प्रतिमा इंगोले, ताराबाईंच्या प्रकाशात ग्रामीण स्त्रिया या संदर्भात लिहितात की, मातृसंस्कृती टिकावी म्हणून पळसाची पाने पायाला बांधून यमीने बंड केले; पण तिची विकृत कहाणी आम्ही समाजात प्रसृत करून टाकली. काली, दुर्गा यांनी दुष्ट प्रवृत्तींविरुद्ध लढा दिला. आम्ही त्यांना देवी बनवून त्यांचे शौर्य, पराक्रम झाकोळून टाकला. लोकगीतांतील आणि लोककथांमधील स्त्री-बंडखोरांचे उद्रेक आम्ही पुसून टाकले. विदर्भातील पतीला कृषिकर्म करण्याची आज्ञा देणारी लोपामुंडा-लोपामुद्रा तर विस्मरणातच गेली आहे. रुक्मिणीच्या बंडखोरीला श्रीकृष्णाच्या देवत्वामुळे वेगळेच वलय प्राप्त झाले आहे. डॉ. इंगोले पुढे म्हणतात, 'माझ्या खेडोपाडी जाऊन केलेल्या लोकगीते संकलनात मला एक ओवी आढळली. गंमत म्हणजे पुरुषांनी केलेल्या संकलनात ती कुठेच नाही, तरीही झिरपून झिरपून आजही ती टिकून आहे.'

'पायटच्या पायरी दयनाचा येतो राग
उठ नवऱ्या, हात दुखले दळू लाग'

इथे नवऱ्याचा एकेरी उल्लेख आणि तेच ते कष्टाचे काम करण्याचा राग व्यक्त झालेला आहे. नवऱ्याला काम करू लाग असा आदेशही आहे. जो आजही स्त्रिया करू शकत नाहीत. मात्र एक गोष्ट त्यानिमित्ताने होण्याची गरज आहे. आपल्याकडे लग्नातील विषमता स्त्रियांनी मिटवायला हवी. ती अशी की, 'नवरदेव' हा एकटाच 'देव' कसा? नवरीदेवी का नाही? हा प्रश्न जोपर्यंत स्त्रिया भरमंडपात लग्न लागण्याच्या आधी विचारणार नाहीत. तोपर्यंत स्त्रीवादाला काही मर्यादा राहणारच.

आदिवासींच्या लिपीबद्ध साहित्याचा त्यात स्त्रीवादी साहित्याचा विचार सुरू झाला की, आदिवासी कवितेच्या

विस्तीर्ण दालनाने आपले लक्ष वेधून घेतलेच समजा. इतर कवयित्रींप्रमाणेच आदिवासी कवयित्री स्त्रियांचे लैंगिक शोषण, त्यांचे दु:ख, वेदना, संस्कृतीचा ऱ्हास, तिच्या श्रमाला दिलेला कमीपणा आपल्या कवितेतून मांडताना दिसते. धोरणी शासनाने जाणीवपूर्वक सर्व पर्यटनस्थळे आदिवासींच्या मालकीत काढल्याने हौसेगौसे पर्यटक आता जंगलात पार्ट्या करायला, मजा मारायला येऊ लागले आहेत. त्यांच्या वागण्या-खिदळण्याने आदिवासी कमालीचा त्रासिक बनला आहे. त्याचे स्वच्छंदी जगणेही आता त्याचे राहिले नाही. गरिबीने बेजार झालेल्या स्त्रीला जुनेराने आपली लज्जत झाकण्याचे भानही नसते. ती बिचारी तिच्या कामातच मग्न असते. बरोबर हीच संधी काही पर्यटक साधतात. ह्या गोष्टीचे भान असलेल्या कवयित्री कुसुम आलाम 'बेडिवंद' ह्या कवितेत आपल्या भगिनींना सावधानतेचा इशारा करतात...

'सखे लक्षात घे,

कदाचित झुडपाआडून एखादा कॅमेरा तुझ्या असीम सौंदर्याला 'वेडिबंद' तर करत नाही ना?

तुझ्या छातीवर नसलेला पदर... आणि दारिद्र्यापोटी उघड्या ठेवाव्या लागणाऱ्या मांड्या-पोटऱ्या त्यांच्या फोटोग्राफीला यश मिळवून देतील आणि...! आर्ट गॅलरीत फेरफटका मारणारे लाळघोटे जिभल्या चाटत निरखतील...

मात्र ह्या साऱ्यांचा निषेध करशील तरच..! तुझी नुमाईश थांबेल. नाहीतर प्रत्येक आंवटशौकीनाच्या दिवाणखाण्यात नग्न होऊन बसशील पोस्टर रूपात!आणि बघे म्हणतील...वा! क्या माल है! '

आदिवासींच्या संस्कृतीवर खुलेआम बोलले जाते. तिला 'फ्री सेक्स' म्हणूनही संबोधले जाते. खोट्या संस्कृतीचा बुरखा पांघरणाऱ्या आणि चार भिंतींच्या आत रोज झोंबाझोंबी करणाऱ्यांना कवयित्री सावधानतेचा इशारा देताना लिहिते...'मित्रा, ठणकावून सांग त्यांना जंगलात फिरलो आम्ही अर्धनग्न कॅमेऱ्यापुढे विवस्त्र झाल्याच नाहीत आमच्या मायबहिणी आणि कुंटणखानेही चालविले नाहीत. आम्हास पोट भरण्यासदेखील जंगलाचे कायदे आडवे आले. आमच्या मुक्त लैंगिकतेवर बोलाल, तर खबरदार! विवाहासाठी ब्लडग्रूप चेकिंगची वेळ आम्हावर अजून यायची आहे.'

अशा प्रकारच्या वास्तवाला आजही आदिवासी स्त्रीला सामोरे जावे लागत असून, हे कटू सत्य नाकारून आपल्याला अजिबात चालणार नाही. आज एकूणच सर्व स्तरांतील स्त्रियांच्या समान हक्कांची मागणी करणारा उदामतवादी स्त्रीवाद, स्त्रियांचे प्रश्न हे आर्थिक स्तराशी व आर्थिक स्वावलंबनाशी जोडले गेले आहेत, असे म्हणणारा मार्क्सवादी स्त्रीवाद, वर्णभेदविरोधी स्त्रीवाद, जाती अंतासाठी कार्यरत असणारा स्त्रीवाद, शाश्वत विकासासाठी निसर्गाचे संवर्धन करणाऱ्या नातेसंबंधाची मांडणी करणारा पर्यावरणीय स्त्रीवाद, अशा अनेक समस्यांसाठी स्त्रीवाद लढे उभारण्याचा प्रयत्न करत आहे. हे लढे पुरुष सत्तेने मानलेल्या मूल्यांविरोधी असले तरी पुरुषाविरुद्ध नाहीत हे लक्षात घ्यायला हवे, कारण स्त्रीवाद जेव्हा पुरुषसत्ताक व्यवस्थेच्या मूल्यांविषयी बोलत असतो, तेव्हा पुरुषांच्या स्थानांनाही त्या व्यवस्थेत काही इतिहास असतो जे स्त्रियांच्या आणि तसेच वंचितांच्या समस्यांना नाकारतात ते पुरुषसत्ताक व्यवस्थेचे प्रतिनिधित्व करतात, असे स्त्रीवाद समजतो. स्त्री प्रश्नाचा विचार करत असताना तो स्त्रियाच्या स्थानावरून केला जावा, असा आग्रह स्त्रीवाद धरतो कारण स्त्री-पुरुष नातेसंबधाच्या इतिहासाचा पाया तपासत असताना तो बहुसंख्य वेळा पुरुषानी पुरुषांच्या स्थानावरून, पुरुषांच्या कृतीविषयी व उद्दिष्टांविषयी लिहिलेला इतिहास आहे, असे स्त्रीवाद मानतो.

सध्या भारत आणि इतर काही राष्ट्रांमध्ये राजकीय आणि सामाजिक अभिसरणाची प्रक्रिया सुरू आहे. या अभिसरणाला राजकीय, धार्मिक, लैंगिक असे अनेक कंगोरे असतात. ह्यात स्त्रियांशी संबंधितही अनेक प्रश्न चर्चिले जातात. आजही एक प्रवाह स्त्रियांना वर्चस्ववादाची शिकार बनवू इच्छित आहे. स्त्रीवादी संकल्पनेची मोडतोड करून समाजापुढे मांडली जात आहे. त्यातून आपोआप प्रतिगाम्यांचा हेतू साध्य होत आहे. त्यासाठी अशा चर्चासत्रांच्या विचारमंचावरून स्त्रीवादी संकल्पना आणि तिचे स्वरूप स्पष्टपणे वाचकांपर्यंत, कार्यकर्त्यांपर्यंत आणि सामान्य नागरिकांपर्यंत पोहोचवणे आवश्यक आहे. आपण सांगितले पाहिजे की, स्त्रीवाद पुरुषांना दोष देत नाही, तर पुरुषसत्ताक व्यवस्थेला दोष देतो. पुरुषसत्ताकामुळे पुरुष हा स्त्रीपेक्षा श्रेष्ठ आहे, स्त्री ही खालच्या स्तरावर आहे, आणि स्त्री हे पुरुषाच्या भोगाचे स्थान आहे, अशी शिकवण पुरुषांच्या मनात बिंबवली जाते. स्त्रीवाद म्हणजे साहित्यातील सवतासुभा वा वेगळी चूल नव्हे; पण साहित्याच्या मुख्य प्रवाहात स्त्रियांच्या साहित्याकडे सतत दुर्लक्ष झाल्यामुळे स्त्रियांच्या साहित्यातील वैशिष्ट्ये अधोरेखित करणे, ही स्त्रीवादाची गरज आहे. त्यामुळे त्या साहित्याकडे काना डोळा न करता त्या प्रवाहाला चालना देऊन त्याकडे समतेच्या



अनुक्रमणिका

तत्त्वाने पाहणे गरजेचे आहे.

स्त्रीवाद हा आंदोलनातील वा लेखनातील काही स्त्रियांपुरता मर्यादित नाही. आणि केवळ 'स्त्रीवादी' या विशेषणापुरताही सीमित नाही. तळागाळातील स्त्रियांच्या स्तरापर्यंतचा त्याचा विस्तार आहे. स्त्रीवादाला अपेक्षित असलेला भगिनीभाव देश, काल, जाती, धर्म, वर्ग यांच्या पलीकडे निर्देश करतो. त्यामुळे स्त्रीवादाशी आपले काही देणेघेणे नाही, अशा आविर्भावात आपल्याला राहून चालणार नाही. मानवता ह्या तत्त्वाला आपण मानत असू, तर स्त्रीवादाला सुस्पष्टता आणि बळकटी येण्यासाठी आपणही ह्या चळवळीत योगदान देणे क्रमप्राप्त ठरते. आपल्याला एक महत्त्वाची बाब लक्षात घेतली पाहिजे, की स्त्रीवाद हा केवळ चर्चा आणि भाषणांमध्ये वरवरचा दिसता कामा नये. स्त्रीवादाला बळकटी देण्यासाठी आपल्या लेखण्या आणखी डोळस आणि बाणेदारपणे चालविण्याची गरज आहे, अशी खूणगाठ आपण आपल्या मनाशी बांधली आणि त्याचे आचरण केले, तर स्त्रीवादाच्या विचारांचा परिघ अधिकाधिक विस्तारेल, असे मला वाटते.


संदर्भ ग्रंथ :

१. कुलकर्णी गो. म. : आधुनिक मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी, मेहता पब्लिशिंग हाऊस: पुणे, १९९५, पृ. क्र. २२

२. खोले विलास (संपा ): स्त्रीपुरुष तुलना, प्रतिमा प्रकाशन: पुणे, १९९७

३. त्रिंबक रामचंद्र शंकर : एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना, १९६२

४. कर्वे स्वाती (संपा.) : स्त्रीविकासाच्या पाऊलखुणा, प्रतिमा प्रकाशन, पुणे, द्वि. आ. २००७पृ क्र. १३
भागवत वंदना : स्त्रीवाद, साहित्य आणि समीक्षा : डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २००८

६. काळ विद्या, गीताली वि. मं., भागवत वंदना : कथा गौरीची, मौज प्रकाशन, २००८

७. रेगे शर्मिला. स्त्रीवाद जागतिक आणि स्थानिक द्वैतापलीकडे, क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले स्त्री अभ्यास केंद्र, सा. फु. पुणे विद्यापीठ, २०१०

८. पवार उर्मिला, मून मीनाक्षी: आम्ही इतिहास घडविला. आंबेडकरी चळवळीत स्त्रियांचा सहभाग, सुगावा प्रकाशन, १९८९

९. सोनाळकर वंदना, रेगे शर्मिला : पितृसत्ता आणि स्त्रीमुक्ती, क्रांतिसिंह नाना पाटील अकादमी, १९९९

१०. पाटील शरद: अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र, सुगावा प्रकाशन, पुणे, १९८८



डॉ. तुकाराम रोंगटे । चलभाष : ९९२१२२८७२४
मराठी विभाग प्रमुख, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे०७.







अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

# नदीष्ट - ही तुमच्या-माझ्या 'पॉलिटिक्स'ची गोष्ट!

मनोज बोरगावकर यांच्या 'नदीष्ट' या कादंबरीबाबत रवि आमले यांनी केलेली समीक्षा. या कादंबरीचा वेगळा विषय, लेखकाची चिंतनपर प्रवाही शैली ही या कादंबरीची बलस्थाने आहेत.

रवि आमले




कादंबरी । नदीष्ट
लेखक। मनोज बोरगावकर
प्रकाशक । ग्रंथाली प्रकाशन, मुंबई
मुखपृष्ठ। नयन बारहाते, नांदेड
मूल्य। २००
पृष्ठसंख्या । १६८

नदीष्ट हे पुस्तक वाचण्याआधी दोन गोष्टींनी गोंधळायला होते. एक म्हणजे - हे नदीष्ट म्हणजे नेमके काय? आपण नादिष्ट वाचलेले असते. नदीष्टमध्ये एक काना राहून वेलांटी तर चुकली नाही ना, अशी एक शंका सहजच येऊन जाते आपल्या मनाला. खरेतर हल्ली वृत्तवाहिन्यांवरील मराठी वाचायची सवय असल्यामुळे अशा चुकांत काही चुकलेय, असे वाटतच नाही. ते सारेच स्वाभाविक मराठी वाटते.

याहून मोठा गोंधळ होतो, तो म्हणजे या पुस्तकाला नेमके बसवायचे कशात? हे 'बसवणे' फार महत्त्वाचे असते. सोपे होते त्यामुळे सगळे. माणसांना, विचारांना, कलाकृतींना असे एखाद्या चौकटीत बसवून टाकले, की मग त्यांचा समाचार घेणे सोपे असते. म्हणजे तुम्ही कोण? अमुकअमुक विषयावर लिहिताय ना? म्हणजे तुम्ही डावे, उजवे, मधले, वरचे, यातले कोणीतरी असणार, आणि ते एकदा समजले, की त्यावर प्रतिक्रिया देणे सोपे असते.

नदीष्ट वाचल्यानंतर पहिला प्रश्न मनात येतो तो हाच, की हे नेमके काय प्रकरण आहे? ही एका नादिष्टाची अनुभवयात्रा आहे? कादंबरी आहे? ललित गद्यकाव्य आहे की समाजचरित्र?

अनेकांनी या पुस्तकाला कादंबरी, असे म्हटले आहे. यात दोन महत्त्वाची पात्रे आहेत. लेखक आणि गोदावरी, ही नदी. तिचे पात्र हे एक पात्र म्हणूनच समोर येत असते. याशिवाय आणखीही अनेक पात्रे आहेत. काही कायम आहेत, काही प्रकरणानुसार येत-जात आहेत. सारा प्रवाह अनुभवयात्रेचा आहे. त्यातून एकेक गोष्ट समोर येते. संपते. दुसरी सुरू होते. अशी एकूण मांडणी. आता याला

प्राध्यापक-समीक्षक मंडळी कादंबरी म्हणत असतील, तर प्रश्नच मिटला; पण हे सारे कादंबरीच्या चौकटीत न बसणारे, त्या पलीकडचे काही आहे. विनायकदादा पाटील यांनी मलपृष्ठावर पुस्तक आणि लेखक यांच्याबाबत जे टिपण दिले आहे, त्यात 'हा विषय चाकोरीबाहेरचा आहे. शैली पहिल्या धारेची आहे,' हे सांगतानाच 'नदीष्ट ही मराठी कादंबरी विश्वातील अकरावी दिशा आहे' हे सांगून यावर शिक्कामोर्तबच केले आहे. यातून समजते काय, तर नदीष्ट हे काही वेगळेच पाणी आहे. पहिल्या धारेचे पाणी.

हे वेगळेपण समजून घेण्यासाठी समकालीन मराठी साहित्याबाबतची-सर्वसामान्य रसिक वाचकाच्या नजरेने टिपलेली-काही निरीक्षणे येथे मांडणे आवश्यक आहे. आजचे नव्या दमाचे मराठी साहित्यिक, खास करून कादंबरीकार यांनी त्यांच्या कलाकृतींतून आपल्याला हे दाखवून दिले आहे, की आजवर ग्रामीण कथा-कादंबऱ्या म्हणून आपल्यासमोर जे परोसण्यात आले होते, ते-अर्थातच काही छान अपवाद वगळता - अत्यंत भंपक होते, फोकनाड होते. गेल्या दोन-तीन पिढ्यांपूर्वीचे ग्रामीण म्हणून ओळखले जाणारे साहित्य डोळ्यांसमोर आणून पाहा. शहरी वाचकांची रंजनाची चूष भागविणे हेच त्याचे प्रमुख प्रयोजन होते, असे वाटावे. आपल्या इंग्रजीतील देशी कादंबरीकारांवर एक आरोप केला जातो, की त्यांच्या नजरेसमोर जो वाचक असतो, त्यांचा जो 'टार्गेटेड ऑडियन्स' असतो, तो सगळा युरोप-अमेरिकेतील असतो. त्या वाचकाला काय भावेल याची मापे काढून त्यांच्या त्या कादंबऱ्या बेतलेल्या असतात. आपल्या पूर्वीच्या ग्रामीण मराठी कथा-कादंबऱ्या तरी काय वेगळ्या होत्या? एक तर गावाबद्दलचे 'रोमँटिक' कढ काढलेले असायचे किंवा मग गावांतल्या माणसांच्या इरसाल किस्से-कहाण्या असायच्या त्यात. कधी ते झुंजूमुंजू, ते बासरी वाजवत आपल्या हिरव्यागार शेताकडे निघालेले शेतकरी आणि त्याची नाजूकशी कारभारीण असायची किंवा मग ते चांदण्याची झीळ ओल्या जोंधळ्याला, असे सगळे असायचे किंवा मग राम्या सुतार, गंगा न्हावी, बाजीराव पाटील आणि कुलकर्णी मास्तर अशा पात्रांचे काही तरी झेंगाट वगैरे असे ते चाललेले असायचे. कथाकथनी गोष्टी. ध्वनिफिती चांगल्या खपायच्या त्यांच्या. सगळेच असे होते, असे नव्हे; पण ग्रामीण कथा-कादंबरीचा लोकप्रिय चेहरा होता तो हा, आणि त्यामुळे मराठी शारदेच्या दरबारात शहरी साहित्याला मानाची गादी होती. त्यातही त्या मनोविश्लेषणात्मक कादंबऱ्या. म्हणजे कोणी तरी माणसाच्या मनाच्या गाभ्यातील गोष्टी सांगायचा. कोणीतरी गोष्टीच्या गाभ्यातले

**हा नदीष्टचा नायक फार शहाणा आहे. तो या नदीमध्ये, त्या माणसांमध्ये गुंतल्यासारखा वाटतो आपल्याला; पण त्याचे एक व्यक्तित्व सतत लांबून पाहत असते त्या सगळ्याकडे. तो विचार करीत असतो त्या सगळ्याचा. नदीष्टचे महत्त्व आहे, लेखकाच्या चिंतनात. त्यात नितळ भावडेपणा आहे. चलाखी आहे. मध्यमवर्गीय कातडीबचावूपणा आहे.**

मन सांगायचे. आपले जयवंत दळवी मोठे थोर कादंबरीकार; पण त्यांच्या कादंबऱ्यांमुळे पुढे झाले काय, की अनेकांना वाटू लागले, की कादंबरीत एखादे तरी विचित्र वेडे कॅरेक्टर असले म्हणजे कादंबऱ्या चालतात. मधल्या काळात हे सारे बदलले. दलित साहित्याने याला एक जोरदार झटका दिला, आणि आज पुण्या-मुंबई पलीकडच्या महाराष्ट्रात राहत असलेल्या लेखकांच्या कथा-कादंबऱ्या हाच मराठी साहित्याचा चेहरा बनलेला आहे.

याची कारणे अनेक आहेत. एकतर गेल्या काही वर्षांत आणि खास करून आर्थिक उदारीकरणानंतर ग्रामीण महाराष्ट्रात खूप काही घडू लागलेलं आहे. ऑल्विन टॉफ्लर यांनी मानवी इतिहासात तीन लाटा कल्पिलेल्या होत्या. एक शेती संस्कृतीची, दुसरी औद्योगिक क्रांतीची आणि तिसरी माहिती-तंत्रज्ञानाची. आजच्या महाराष्ट्रातील गावागावांत, इथल्या नगरांमध्ये या तिन्ही लाटा एकाचवेळी दिसत आहेत. त्यातून जी संस्कृती निर्माण झालेली आहे, जे सामाजिक बदल झालेले आहेत, त्यातून जी सत्तेची उतरंड तयार झालेली आहे, ते सगळे इथे आहे. त्याची प्रतिबिंबे आजच्या मराठी ग्रामीण साहित्यात पडताना दिसत आहेत. हे कादंबऱ्यांत आहे, चित्रपटांत आहे. त्या तुलनेत शहरी साहित्यकार मात्र आज चाचपडताना दिसत आहेत. कदाचित शहरांतील बदलांचा वेग चिमटीत पकडणे, पचविणे कठीण झालेले आहे.

मनोज बोरगावकरांची नदीष्ट ही कादंबरी वाचताना तिचे हे वैशिष्ट्य सतत जाणवत होते, की तो- आजच्या दूरचित्रवाणीच्या भाषेत बोलायचे तर-'टीआरपीसाठीचा रोमँटिसिझम' या कादंबरीत कुठेही नाही. कादंबरीत

मराठवाडा आहे, गोदाकाठ आहे. कादंबरीचा नायक अनेकदा रोमँटिक विचार करताना दिसतो; पण त्या विचारांचे लक्ष बाहेरचा वाचक नाही. वाचकांना रिझविण्यासाठी हा रोमँटिसिझम येत नसतो. मुळात ही कादंबरी अशी कोणाला नजरेसमोर ठेवून लिहिलेलीच नाही. ही एक छान ललित डायरी आहे. स्वतःसाठीच लिहिलेली, आणि म्हणूनच ती वाचकाशी बोलते. ही जी बोलण्याची भाषा आहे तीही खासच पाहण्यासारखी आहे.

ती खास या परिसरातल्या माणसांची भाषा आहे. ही माणसे नदीच्या पाण्याने 'तोंड खंगाळणारी' आहेत. या माणसांना पाऊस मोठा 'झपका' देऊन जातो. त्यांची 'सिट्टीपिट्टी गुल' होते. अशा माणसांची ही बोली आहे. तिच्यात मुद्दाम बोली वापरतोय असा आवही नाही. हल्ली हेही एक लेखकीय तंत्र फोफावलेले आहे. बोलीभाषेचा वापर करून असा काही 'टच' द्यायचा कथेला प्रादेशिकतेचा, की लोकं आपली हेलकांडूनच गेली पाहिजेत. नुसत्या बोलीभाषेने माणसे उभी राहत नसतात. त्यांच्या भाषेमागे त्यांचे अवघे जगणे, वावरणे असावे लागते. नदीष्टमध्ये ते आहे. लेखक मराठवाड्यातील आहे. तेथील जनगणांच्या मनाची ती बोली आहे. हिंदी, उर्दू, इंग्रजी अशा शब्दांतून ती साकारलेली आहे. तिला भेसळीची भीती नाही कारण ती पहिल्या धारेची आहे. मराठी मुमूर्षू वगैरे झाली आहे काय असा सवाल ज्यांच्या मनात दर मराठी राज्यभाषा दिनी उभा राहतो, त्यांनी नदीष्ट वाचावी. नदीप्रमाणेच भाषाही प्रवाही असली, की जिवंत राहते, हे त्यांच्याही लक्षात येईल.

या कादंबरीच्या शैलीचा प्रवाहीपणा ही मोठी गरजच होती. मुळात ही कादंबरी आपल्या कादंबऱ्या असतात तशी नाही. साधारणतः कादंबऱ्यांमध्ये एक गोष्ट सांगितलेली असते. ती कधी सरळ रेषेत आपल्याकडच्या शुक्रवारच्या कहाण्यांसारखी पुढे जाते. कधी त्यात सिनेमाची तंत्रे वापरलेली असतात, 'फास्ट फॉरवर्ड', 'फ्लॅश बॅक' वगैरे; पण तंत्र कोणतेही असो, कादंबरी सांगते एकच गोष्ट.

नदीष्टचे वैशिष्ट्य असे, की तिला सरळसोट एकच गोष्ट नाही. तिला कालानुक्रम आहे. तेथे उन्हाळ्यानंतर पावसाळाच येतो; पण सरळ रेषेत जाणारी एकच गोष्ट नाही. म्हटले तर तिची गोष्ट आपण अशी सांगू शकतो, की एक माणूस असतो. त्याला पोहायचा नाद असतो. तेव्हा तो नदीवर उठसूट पोहायला येतो. तिथे त्याला काही माणसे भेटतात. त्यांच्याशी तो बोलतो. झाली आमची गोष्ट; परंतु तसे ते नाही. नदीष्टचे वळण हे आपल्या परंपरेतून अवतरलेले महाकाव्याचे वळण आहे. त्यात अनेक माणसे येतात, त्यांच्या आपापल्या कथा येतात. नदीष्ट ते सांगत जाते. त्या सगळ्या गोष्टी भिन्न आहेत, स्वतंत्र आहेत. म्हटले तर त्यांचा एकमेकांशी काहीही संबंध नाही; पण त्या सर्व गोष्टींना एका धाग्याने घट्ट बांधून त्यांची माळ तयार झालेली आहे. तो धागा आहे नदीच्या काठावरच्याच नाही, तर नदीच्या डोहातल्या संस्कृतीचा. त्या संस्कृतीतल्या चांगुलपणाचा, वाईटपणाचा, आणि या दोन्हींच्याही पलीकडे असलेल्या तटस्थतेचा.

हा नदीष्टचा नायक फार शहाणा आहे. तो या नदीमध्ये, त्या माणसांमध्ये गुंतल्यासारखा वाटतो आपल्याला; पण त्याचे एक व्यक्तित्व सतत लांबून पाहत असते त्या सगळ्याकडे. तो विचार करीत असतो त्या सगळ्याचा. नदीष्टचे महत्त्व आहे, लेखकाच्या चिंतनात. त्यात नितळ भाबडेपणा आहे. चलाखी आहे. मध्यमवर्गीय कातडीबचावूपणा आहे आणि त्या सगळ्यापासून दूर जाऊन कुठल्याशा अदृश्याचा शोध घेण्याचा प्रयत्न आहे. लेखकाचे हे चिंतन कुठलीही 'पोज' वगैरे न घेता आलेले आहे, हे एक फार महत्त्वाचे. यातील एक वाक्य आहे. साधे, सोपे. नायक त्याच्याच मनाशी एक प्रश्न विचारतो, की आपण माकडांचे वंशज की पूर्वज?

फार बोचरी टीका आहे ही त्यामागील गोष्ट समजून घेतल्याशिवाय तिचा संदर्भ लक्षात येणार नाही. नायक जेथे पोहायला जातो, तेथे चिंचेचे झाड आहे. त्यावर माकडांचा मोठा कळप असतो. एके दिवशी झाले असे, की त्या झाडाखाली हरणांचा कळप आला. तसे वरच्या माकडांनी काय केले, की फांद्या हलवून चिचा पाडायला सुरुवात केली. हरणे चिंचा खायची. संपल्या की वर पाहायची, की ती माकडे पुन्हा चिंचा पाडायची. फार भारी होते ते सगळे. प्राण्यांमधली ही परोपकाराची भावना. नायकाला वाटले, की खरोखरच आपण माकडांचे वंशज आहोत. अखेर आपणही असाच परोपकार करतोच की.

तर हा प्रसंग घडल्यानंतर काही दिवसांनी पुन्हा तेच घडले. तीच त्या दिवशीची माकडे झाडावर होती. तेथे तीच त्या दिवशीची हरणे आली. पाणी प्याली आणि आशाळभूतपणे वर चिंचेकडे पाहू लागली. तोवर माकडांचा एकच कल्ला चाललेला होता. तो अचानक शांत झाला. वातावरण गपगार पडले. माकडे काही चिचा टाकत नव्हती. हरणांना कळेना काय झाले? अचानक त्यांची माकडांशी नजरानजर झाली. त्यांच्या डोळ्यांत भीतीचे काजळ दिसू लागले. त्याच क्षणी वरून दोन हुप्पी माकडे सरसर उतरली. एक पाडस उचलले त्यांनी आणि त्याला धरून सरसर झाडावर नेले. हरणे उधळली. काही त्याला सोडवण्यासाठी धावली; पण फार उशीर झाला होता त्याला.

हे सगळे महाभारत नायकाच्या डोळ्यांदेखत घडत



अनुक्रमणिका

होते. झाडावर आता माकडांनी कोंडाळे केलेले होते त्या पाडसाच्या भोवती. चार-दोन मिनिटे अशीच गेली आणि मग त्या झाडावरून रक्ताची टपोरी धार खाली पडू लागली. केविलवाणी हरणे, मागे मागे पाहत जंगलात निघून गेली. आपण माकडाचे पूर्वज की वंशज हा सवाल येतो तो या प्रसंगाला उद्देशून. तो प्रसंग संपतो येथे; पण मग प्रश्न सुरू होतात. हा प्रसंग केवळ त्या माकडांचा आणि हरणांचा राहत नाही. ही कादंबरी वाचताना सतत असे जाणवत होते, की हा नायक आपल्याला एक राजकीय गोष्ट सांगत आहे. ही एक राजकीय कादंबरी आहे.

हे सत्त्व हरवलेल्या, त्याच त्या प्रवाहात पोहत राहणाऱ्या, त्याच धारेला पकडून झोंबत राहणाऱ्या, तेच ते किनारे धुंडाळत फिरणाऱ्या समाजाचे 'पॉलिटिक्स' आहे. या कादंबरीतल्या नायकाला मध्येच नदीच्या कुंवार-व्हर्जिन-जागेवरची वाळू आणायचे खूळ लागते. अनेकांच्या मनात असते ते. जे कुणालाही गवसलेले नाही, जेथे कोणीही गेलेले नाही असे काही प्राप्त करण्याचे खूळ; पण त्यांचे प्रमाण किती असते? बाकीचे सगळे असतात ते केवळ स्वप्नच पाहणारे. त्यातले अनेक तर बामनवाडच असतात.

हा नदीत मासेमारी करणारा भोई. अनेकांना बुडताना वाचवलेय त्याने. एके दिवशी त्याच्या डोळ्यांदेखत नदीच्या किनाऱ्यावर एका तरुण विवाहितेवर बलात्कार होतो. हा काहीही करू शकत नाही. त्या गुंडांच्या टोळक्यासमोर गूपचूप बसतो. तिकडं लाबवर. जीवाची भीती, दुसरे काय? पण मग त्याचेच मन त्याला खात राहते. आपण काहीही करू शकलो नाही याची ती खंत. त्याला जाणीव होती, की अन्याय करणारे ते पोट्टे जेवढे गुन्हेगार, तेवढेच गप्प राहणारे आपणही गुन्हेगार. तो गांधी नावाचा झपाटणारा 'बुड्ढा' असा दिसतो आपल्याला कुठे तरी बामनवाड आपल्या त्या गुन्हेगारीच्या जाणिवेने ढसाढसा रडत होता. ही गुन्हेगारी वैश्विक नाही? हा तर तमाम मध्यमवर्गाचा सल आहे. ही वेदना त्याच्या जगण्याला घायाळ करीत असते. मध्यमवर्गाचे सगळे जगण्याचे 'पॉलिटिक्स' उभारलेले आहे, ते या भीतीवर आणि या गप्प बसण्याच्या गुन्हेगारीवर. बोरगावकरांनी ते अत्यंत थेटपणे आणि कुणालाही नकळत आपल्यासमोर आणून मांडलेले आहे. हा बामनवाड काय, किंवा यात भेटणारा सगुणा नावाचा तृतीयपंथीय काय, ही सगळी पात्रे आजच्या आपल्या समाजजीवनावर सतत तिखट भाष्य करणारे आहेत. ते सांगतात त्यांचीच गोष्ट. त्यांचीच कहाणी. 'पर्सनलशी' कहाणी. पण त्यातून पट उभा राहतो, तो संस्कृतीच्या घसरणीचाच. लेखक शांतपणे आपल्यासमोर तो मांडत असतो.

नदीच्या काठी संस्कृती उभी राहते. त्या अर्थाने नदी ही संस्कृतीची जननी. ऋग्वेद हे भारतीय संस्कृतीच्या मुळाशी उभे असलेले छान महाकाव्य. माणसांच्या भावभावना, त्यांचे हर्षखेद, त्यांची भीती, त्यांच्या आशा-आकांक्षा हे सगळे त्यात येते. ते काव्य रचले गेले ते सरस्वती नदीमुळेच अशी त्यांची भावना आहे. किंबहुना त्यामुळेच सरस्वतीला बुद्धिदात्री म्हटलेले आहे. बुद्धिची देवता आहे ती. माताही मानतो आपण नद्यांना. अत्यंत पवित्र भावना असते आपल्या मनात या मातेविषयी. नदीष्टमध्ये महापुराने गाव तहसनहस झाले. त्यानंतर या नदीविषयी माणसं वाईट बोलायला लागली, तसे दादाराव दापतात त्यांना. मोठा भावूक प्रसंग आहे तो. दादाराव सांगतात, नदीला आलेला महापूर ही भडास आहे तिची. आणि त्यानंतर ते जे सांगतात, ते एक वेगळेच स्रोत आहेत नदीचे. तिच्यावरचे अत्याचार पाहून दुखावलेल्या मनाच्या वेदना उतरल्यात यात. हेच नायकही वेगळ्या पद्धतीने सांगत असतो आपल्याला. आपण असे नदीचे नादिष्ट कसे, असा प्रश्न त्याला कुरतडत असतो. त्यावरचे त्याचे हे चिंतन आहे. ते कोणालाही आपल्या आत पाहायला लावील. नदीचा डोह आणि आईचा गर्भ सारखाच असे त्या ठिकाणी नायक म्हणतो. हे केवढे मोठे वाक्य आहे, ते समजले ना, तर नदीची निम्मी दुखणी आपोआप नाहीशी होतील. नदी म्हणजे विस्तारत गेलेलं गर्भाशय. आपण काय करतो? वाळूचा उपसा. विकासासाठी परवडणाऱ्या घरांसाठी वाळूचा उपसा. येथे लेखक जे लिहून जातो, ते अतिशय चिंतनीय आहे. नदीष्ट ही एका वेगळ्या अर्थाने पॉलिटिक्स सांगते या म्हणण्याचा अर्थ या अशा चिंतनात आहे.

नदीष्टचा नायक म्हणतो, 'किती खोलवर इजा होत असेल नदीला? अबॉर्शनमुळे स्त्रीला होणाऱ्या इजेसारखी.' नदीची ही प्रतिमा आणि आपले वागणे... नदीष्ट वाचून झाली तरी पाठ सोडत नाही. यातील चिंतन, यातील पात्रे, त्यांच्या गोष्टी, त्यांची जगण्याची रहाटी, भिकाजीसारखा चुकून स्वतःच्या पोरीची हत्या करणारा आणि अश्वत्थात्माप्रमाणे ती जखम वाहत राहणारा भिकारी, सगुणासारखा तृतीयपंथीय, त्यांचे जगणे, सोडून जाणे... हे सारे कोणाही संवेदनशील वाचकांच्या काळजाचा डोह खळबळून टाकणारे आहे.

साऱ्याच जाणिवा बोथट करण्याचे राजकारण सर्व प्रकारच्या माध्यमांतून चाललेले असताना अशी काही झपका देणारी कादंबरी येणे ही साहित्य रसिकांसाठी मोलाची भेटच.

---

रवि आमले । चलभाष : ९९८७०८४६६३
ravi.amale@gmail.com

पुस्तक परीक्षण

# भेद्य-अभेद्य

'भेद्य आहेत माणसामाणसांमध्ये उभ्या केलेल्या भिंती आणि अभेद्य आहेत त्या समाजपुरुषाला कुटिलतेने अपमानित करणाऱ्या विषप्रवृत्ती', या संकल्पनेवर आधारलेल्या 'भेद्य- अभेद्य'या कादंबरीचे परीक्षण.

उषा तांबे




भेद्य-अभेद्य ही एकमेकांत गुंतलेल्या तीन-चार कुटुंबांची, त्यांच्या दोन-तीन पिढ्यांची कहाणी असली तरी एका दृष्टीने ती प्रातिनिधिक आहे. त्यामधून स्वातंत्र्यपूर्व भारतातील समाज आणि त्याचे हळूहळू बदलणारे वास्तव, यांचा वस्तुनिष्ठ दृष्टीने घेतलेला आढावा जाणवतो. ज्येष्ठ वाचकांना हा पट परिचित वाटेल; तर तरुणांना आजच्या स्थितीपर्यंत आपण कसे पोचलो याचा उलगडा होईल. येथे कुठलाही वर्ग निर्दोष नाही, कुठलाही काळ पूर्णपणे अन्यायी नाही. समाजातील भल्या-बुऱ्या, सुष्ट-दुष्ट प्रवृत्तींचा हा एकमेकांमध्ये गुंफलेला गोफ आहे.

ही कहाणी सुरू होते, भार्गवराम बापट या काळाच्या कितीतरी पुढे चालणाऱ्या सात्त्विक वृत्तीच्या गृहस्थांपासून. गावातून पळून आलेल्या ग्यानूला ते घरी ठेऊन घेतात. त्यांची पत्नीही त्यांना साथ देते. आपल्या मुलींबरोबरीने त्या अनाथ, निरक्षर मुलाला ते वाढवतात. रूढींची पर्वा न करता मनाला न्याय्य वाटेल तसे वागण्याचे बाळकडू त्यांना आपल्या वडिलांकडून-श्रीधरपंतांकडूनच मिळालेले आहे. भार्गवरामांनी स्वातंत्र्यलढ्यातही भाग घेतलेला आहे. पोरवालांच्या कंपनीत काम करताना त्यांना मँचेस्टरला जायची संधी मिळते. तेथून परतल्यावर ते अत्यंत समृद्ध परंतु निर्मोही आयुष्य जगतात.

गावाकडून पळून आलेला ग्यानू त्यांच्या घरी राहून गणेश बनला आहे. त्याची बुद्धी कुशाग्र आहे. कठोर परिश्रम करण्याची त्याची तयारी आहे. लौकरच त्याची वाणी स्वच्छ-शुद्ध होते. त्या स्वच्छ मनाच्या कुटुंबात त्याची जात जाणून घेण्याची कुणाला गरजही वाटत नाही. स्वातंत्र्यपूर्व

काळातील सुज्ञाण नागरिकांची उदार दृष्टी इथे दिसून येते.

परंतु स्वातंत्र्योत्तर काळात ध्येयवाद मागे पडत जातो आणि सर्व स्तरावर, सर्व क्षेत्रांमध्ये क्षुद्र राजकारण सुरू होते. 'बापट' आडनाव लावत असलेल्या गणेशच्या दुस्वासापायी त्याचे महाविद्यालयातील सहकारी प्राध्यापक एका दलित मुलीला त्याच्या विरुद्ध भडकवतात व अॅट्रॉसिटी कायद्याखाली त्याला अटक करवतात.

एखाद्या सवर्णाने दलितावर अन्याय केला, तरच अॅट्रॉसिटी कायदा लागू पडतो. मग गणेशची मूळ जात कोणती? ती कशी सिद्ध करणार? त्याची आईसुद्धा हा आपलाच मुलगा आहे ह्याचा काय पुरावा देणार? अशा प्रकारच्या खोडसाळ आरोपातून निर्दोष मुक्तता होण्यासाठी काही मार्ग आहे की नाही?

परंतु याचा अर्थ ह्या कायद्याचा सरसकट दुरुपयोग होतो, असा नाही. मुळात गणेशच्या आईवर गावच्या खोताने असंख्य अत्याचार केलेले आहेत; आणि म्हातारपणी तिला हाकलून लावलेले आहे. त्याच बाईला- सुंद्राला भार्गवराम मानाने ठेवून घेतात, हेही सत्य आहे. गणेशविरुद्ध कट रचणारे नेने-डोईफोडे सवर्ण आहेत. तक्रार नोंदवणाऱ्या दलित मुलीचे उच्च-पदस्थ वडील, तसेच दलित संघटनाही तिला या प्रकारापासून परावृत्त करण्याचा पुरेपूर प्रयत्न करतात; परंतु ती काही ऐकून घेण्याच्या मनःस्थितीत नसते आणि गैरमार्गाने पुढे पुढेच जात राहते. सुष्ट-दुष्ट प्रवृत्तींची माणसे सर्वच समाजामध्ये आढळून येतात, हे लेखिकेने प्रभावीपणे दाखवून दिले आहे.

तसेच, बुद्धिमत्ता ही कुणा एका वर्गाची मक्तेदारी नाही, हेही या कथेतून सांगितलेले आहे. नात्याने कुणीही नसलेला गणेश भार्गवरामांइतकाच तीक्ष्ण बुद्धीचा आहे. त्याला योग्य वळण मिळाल्यामुळे तो शिक्षणात कितीतरी पुढे गेला आहे. आनुवंशिकतेपेक्षाही योग्य संगोपनाला लेखिकेने जास्त महत्त्व दिले आहे.

कादंबरीचे कथानक फ्लॅशबॅक पद्धतीने सांगितले आहे. त्यामुळे त्यातील नाट्यमयता वाढते. मूळ विषय काहीसा स्फोटक असूनही तो अतिशय संयमाने व समतोलपणे हाताळला आहे. कोर्टाची कार्यपद्धती किती चिकित्सक असते हे लेखिकेला चांगलेच माहिती आहे, तसे ती वाचकांना जाणवूनही देते.

भार्गवराम आणि गणेश यांच्यातील आणखी एक साम्य म्हणजे त्यांची समविचारी, समतोल बुद्धी. मँचेस्टरमध्ये वर्णभेदाने दुखावलेले भार्गवराम त्याही स्थितीत भारतातील जातिभेद तितकाच अन्यायकारक आहे, हे मनाशी

**बुद्धिमत्ता ही कुणा एका वर्गाची मक्तेदारी नाही, हेही या कथेतून सांगितलेले आहे. नात्याने कुणीही नसलेला गणेश भार्गवरामांइतकाच तीक्ष्ण बुद्धीचा आहे. त्याला योग्य वळण मिळाल्यामुळे तो शिक्षणात कितीतरी पुढे गेला आहे. आनुवंशिकतेपेक्षाही योग्य संगोपनाला लेखिकेने जास्त महत्त्व दिले आहे.**

कबूल करतात. त्याची प्रचीती वाचकांना सुंद्रा- गणेश यांच्याशी खोत कसा वागतो ते वाचून येतेच.

प्रसंग-व्यक्तीनुरूप भाषा हे सुद्धा या कादंबरीचे एक वैशिष्ट्य आहे. भार्गवरामांच्या पिढीची भाषा शुद्ध मराठी आहे, पुढच्या पिढीची मात्र इंग्रजीमिश्रित आहे. सुंद्रा किंवा विठा यांची बोलीभाषा वेगळी उठून दिसते. भाषेवरून व्यक्तीच्या शिक्षणाचे स्वरूप, समाजातील स्थान कळून येते, याचा अनुभवही इथे येतो.

काही वर्णनांमध्ये लेखिकेची भाषा काव्यमय, चित्रदर्शी झालेली आहे. उदाहरणार्थ, 'सूर्य मावळून गेला होता; पण त्याच्या प्रकाशाचा शेवटचा केशरी पट्टा अंधाराच्या काळ्या दाटीवर उपरण्यासारखा बिलगला होता.'

भार्गवरामांची पत्नी शालिनी हिला शिक्षणाचे किती अप्रूप वाटते- ते वाटणे त्या पिढीच्या स्त्रियांमध्ये प्रातिनिधिक आहे- ते सांगताना लेखिका म्हणते, 'पुस्तके घेतल्यावर कुबेराचे धन मिळावे तसा तिचा चेहरा झाला. भार्गवची जलद प्रगती अशा शब्दांमध्ये सांगितली आहे, 'भार्गवला शिडी चढायला लागलीच नाही. पर्वताच्या शिखरावर विमानातून अलगद उतरावा तसा तो शिखरावर पोचला.'

समाज म्हणून आपण कुठून सुरुवात केली, आणि आता कोठे येऊन पोचलो आहोत, या वाटचालीचा मागोवा या कादंबरीत घेतलेला आहे. 'भेद्य आहेत त्या माणसा-माणसांमध्ये उभ्या केलेल्या भिंती आणि अभेद्य आहेत त्या समाजपुरुषाला कुटिलतेने अपमानित करणाऱ्या विषप्रवृत्ती' या विषप्रवृत्ती अभेद्य आहेत. सार्वकालिक आहेत, सर्वत्र आहेत आणि फार कष्टाने पराभूत होणाऱ्या आहेत. शेवटी सत्याचा विजय होतो हे खरे; पण तो शेवटी होतो आणि तिथवर पोचताना सत्प्रवृत्तांची अग्निपरीक्षा होते, हेही खरे!

**उषा तांबे । चलभाष : ९८२०३२५४७३**

परीक्षण

# शालोम : प्रतिमेतून प्रतीकाकडे

नारायण लाळे संपादित प्रेषित येशू ख्रिस्त यांच्या जीवनावरील काव्य संग्रहाचे डॉ. सुधीर देवरे यांनी केलेले परीक्षण.

डॉ. सुधीर रा. देवरे




पुस्तकाचे नाव । शालोम
संपादक । नारायण लाळे
प्रकाशन वर्ष । २०१८
पृष्ठ संख्या। २०६
किंमत । २७५ रुपये.

नारायण लाळे यांनी संपादित केलेल्या आणि येशू ख्रिस्त यांच्या जीवनावर असलेल्या 'शालोम' नावाचा प्रातिनिधिक कवितासंग्रह नुकताच वाचण्यात आला. शालोम हा हिब्रू भाषेतला शब्द असून नमस्कार या अर्थाच्या आसपास जाणारा त्याचा अर्थ आहे. स्वागत करताना वा निरोप घेताना ह्या विशेष शब्दाचा वापर होतो. (या शब्दाचा अर्थउल्लेख पुस्तकात आलेला नाही. तो यायला हवा होता.) 'येशू ख्रिस्त आणि संबंधित मराठी कविता' असं या संग्रहाचं उपशीर्षक आहे.

'शालोम' या पुस्तकाला संपादक नारायण लाळे यांनी साधी, सोपी आणि तरीही अभ्यासू प्रस्तावना लिहिली आहे. मुद्यांनुसार प्रस्तावनेत बारा भाग पाडून आपल्या भूमिकेचं थोडक्यात मंडन केलं आहे. विशेष म्हणजे या प्रस्तावनेला साहाय्यभूत ठरलेल्या योग्य अशा संदर्भ ग्रंथांची जोड दिली आहे हे महत्त्वाचं. अशी अभ्यासपूर्ण प्रस्तावना लेखनाची पद्धत आवडली. यात शं. गो. तुळपुळे. सुनील आढाव, कुसुमाग्रज. सिसिलिया कार्व्हालो, दीपक घारे, भालचंद्र नेमाडे, वसंत पाटणकर, रामकृष्ण मठ (संस्था) आदींचे संदर्भ, अवतरणं विशद केली आहेत. पुस्तकाच्या सुरुवातीला भा. द. खेर आणि मिर्झा गालिब यांची उचित अवतरणंही उद्धृत केली आहेत.

येशू ख्रिस्त या व्यक्तिरेखेत दिसणारी जीवनमूल्ये, त्यातून प्रकट होणारे सामाजिक संदर्भ ही या पुस्तकाची आशयसूत्रे असल्याचं प्रस्तावनेत नारायण लाळे स्पष्ट



अनुक्रमणिका

करतात. कवितेतून संस्कृतीची व भाषेची जपणूक होत असते हे खरं आहे. येशू ख्रिस्त ही व्यक्तिरेखा कवितेचा विषय होताना साहजिकच या कवितेत धर्म आणि विशिष्ट संस्कृतीचे पडसाद उमटतात. भाषा विचार- भाषा उपयोजन- विशिष्ट भाषेचं भान आणि स्थानिक सांस्कृतिक आत्मभानही या संपादित कवितेतून दृग्गोचर होताना दिसते. मौखिक सस्कृतीतले मिथ कवितेत प्रतिबिंबीत होताना वैश्विक मूल्यभान जपतं.

दृष्टांत लोकभाषेत प्रचितीस आणून देण्याची ताकद येशू ख्रिस्तात होती. लोकांच्या साध्या सोप्या बोलीत ते प्रबोधन करायचे. येशूमधील देवत्वापेक्षा माणूसपण ठळकपणे दिसून येतं. साहित्याचं पहिलं कार्य समाजपरिवर्तनाचं असतं. येशूवर असल्या तरी कवितेतील काव्यमूल्यांना स्थान देण्याची संपादकाची अट लक्षात येते. अशी एकूण समाजाभिमुख बृहत भूमिका या संपादनामागे असल्याचं नारायण लाळे याच्या प्रस्तावनेतून स्पष्ट होत राहतं.

पुस्तकात ८२ कवींचा समावेश असून एकूण कवितांची संख्या मात्र १४८ इतकी आहे. कवितांचं बदलतं रूप दर्शवणारी उदाहरणंही संपादक निदर्शनास आणून देतात. कविता ही धर्म, भाषा, पंथ, प्रांत यांच्या भेदांपलीकडे असते, या संपादकांच्या म्हणण्याला कोणीही आक्षेप घेणार नाही. म्हणून येशू ख्रिस्त हे कवितेचे विषय असले तरी केवळ ख्रिस्तीच नव्हे तर अन्यधर्मीय कवींच्या या विषयवस्तूवरील कविताही या संग्रहात समाविष्ट करण्यात आल्या आहेत. नारायण लाळे यांच्या म्हणण्यानुसार येशू ख्रिस्त ही एक प्रतिमा आहे, हे कोणीही मान्य करील. मानवजात कवेत घेण्याइतका या प्रतिमेचा आवाका असल्याने ही प्रतिमा भारतीय संस्कृतीत मुरून एकजीव झाली, हे संपादकांचे निरीक्षणही मोलाचं आहे. येशू ख्रिस्त या व्यक्तिगत प्रतिमेसोबत जीवनप्रसंग, दया, क्षमा, शांती ही सनातन मूल्यंदेखील इथल्या मातीत प्रस्थापित करणारी ही प्रतिमा आहे, आदी भूमिका असलेलं संपादक नारायण लाळे यांचं विवेचन भावतं.

या पुस्तकात समाविष्ट झालेल्या कविता या पारंपरिक आणि आधुनिक अशा सर्व प्रकारच्या कविता आहेत. ज्यांच्या आशयात येशू ख्रिस्त ही प्रतिमा आहे, अशा आशयसूत्रानुसार या सर्व कविता पुस्तकात समाविष्ट झाल्या आहेत. पारंपरिक कवितांचे विशिष्ट शब्दसंदर्भ तळटिपेत दिलेले असल्याने जुनी कविता समजायला सोपी होते. येशू ख्रिस्त ही व्यक्तिरेखा (येशू ख्रिस्त हे प्रेषित आहेत; परंतु काव्यांगाने म्हणजे एका प्रतिमेचा उल्लेख करायचा असल्याने, व्यक्तिरेखा असा मी उल्लेख करतो.) ज्या कवितांचा विषय आहे, त्यातील फादर थॉमस स्टीफन्स, पंडिता रमाबाई, ना. वा. टिळक, लक्ष्मीबाई टिळक यांच्यापासून आजच्या आधुनिक कवितेपर्यंत, म्हणजे आशयाने आणि कलात्मकतेने सिद्ध झालेल्या कवींपर्यंतच्या महत्त्वाच्या कविता या संग्रहात वाचायला मिळतात.

कुसुमाग्रज, बाबा आमटे, विंदा करंदीकर, सदानंद रेगे, अरुण कोलटकर, चंद्रकांत खोत, गुरुनाथ धुरी आदी दरम्यानच्या काळातल्या म्हणजे साठच्या आसपासच्या कवींच्या कविता रसास्वादाचा आनंद देतातच; पण नारायण लाळे, निरंजन उजगरे, सिसिलिया कार्व्हालो, नीरजा, संदेश ढगे, अजय कांडर, बाळासाहेब लबडे, वीरा राठोड, सखूबाई गायकवाड आदी आजच्या समकालीन कवींच्या कविताही या संग्रहात वाचायला मिळतात. या सर्वच आधुनिक कवितांत केवळ येशू ख्रिस्त यावा म्हणून मुद्दाम येत नाही. येशू ख्रिस्ताच्या मूर्त- अमूर्त सूत्राने ही समग्र कविता प्रतिमेतून प्रतीक होत जाते. अनेक पदरी व्यामिश्रतेतून कवितेचा अर्थ उलगडत जातो. ही कविता आधी कविता असते आणि नंतर ती कोणावर लिहिली वगैरे गोष्टींचा ऊहापोह करावा लागेल. या संग्रहातील बहुतांश कवितांतून कवींच्या जीवन- जाणिवा उपयोजित होत जातात.

**सत्य बोलणाऱ्यालाच नेहमी क्रुसावर जावं लागतं. जो संधिसाधू आहे वा अंधश्रद्ध लोकानुनयी आहे अशा लवाडांना समाजात नेहमीच मानसन्मान मिळत राहतात. तोंडपूजेसाठी का होईना वाईट लोकांना जनमानसात नावाजलं जातं. अशा दांभिक लोकांच्या प्रार्थना मात्र कोणताच देव मनावर घेत नाही. अशांच्या देवभोळेपणाचा देव कंटाळा करतो. याचा प्रत्यय 'नीरजा' यांच्याच 'जांभई' नावाच्या सहा ओळींच्या छोट्याश्या कवितेतही येतो.**



अनुक्रमणिका

अशाच काही कवितांपैकी या पुस्तकात समाविष्ट झालेल्या कवितांचा उदाहरणादाखल धांडोळा घेता येईल:

इसवी सन १६०५ ते १६०८ आणि आसपासच्या कालखंडातल्या मराठी भाषेतल्या गेय कवितांतील शब्दरूप कसे आविष्कृत होत असे हे पुढील कवितेच्या मासल्याकडे पाहून अभ्यासता येईल:

'तूं रिधी-सिधीचा दातारू। क्रुपानिधी करुणाकरु।
तूं सर्व सुखाचा साघरु। आदि अंतु नातोडे ।।२।।' (फादर थॉमस स्टीफन्स, पृ. १)

ही कविता वाचताना आपण भावार्थदीपिकेतील ओव्या तर वाचत नाहीत ना, असा भास होत राहतो. (पण फादर स्टीफन्सच्या काळाला जवळची अशी संत तुकाराम आणि इतर समकालीन संतसाहित्य यांची शैली त्यांच्या कवितेत पहायला मिळत नाही.) पारंपरिक वारकरी संप्रदायाची वाटावी; पण भिन्न जीवन-जाणिवा आविष्कृत करणारी अशी समकालीन कविता या संग्रहात भेटते:

'इथेच जाहालें महाधर्मवीर। जयां थरथर विश्व कांपे।।
इथेच जहालें योगीश्वर। अहो आजवर प्रभा ज्यांची।।'
(ना. वा. टिळक, पृ. १४)

अशी प्रस्तावना करून टिळक पुढे येशू माहात्म्य गातात.

खालील कवितेत प्रतिमा किती चपखल वापरल्यात वाचे नवल करत काव्यात्मतेशी तादात्म्य पावत कोणीही संमोहित होत जाईल.

'दंताविण गज शून्य। जलाविण मीन दीन।
पक्षी ते पंखावाचून। तुजविण मी तशी ।।१२।।
कांतावांचून कामिनी। नक्षत्रविण यामिनी।
शोभा तया कोठुनी। तुझ्यावांचूनी मी तैशी ।।१३।।'
(लक्ष्मीबाई टिळक, पृ. २२)

इथल्या एकूण पारंपरिक कवितेत वारकरी संप्रदायातील अभंग- ओव्यांचे वा अन्य पोथ्या पुराणांचे पडसाद पहावला मिळतात हे नाकारता येणार नाही. असे पडसाद दिसणे हे साहजिकही आहे कारण पारंपरिक वारकरी कविता- अन्य पोथ्यांची रचना ही या कवितेला समकालीन मोठ्या प्रमाणात आविष्कृत- प्रवाहित होत होती. जनमानसात जे काव्य प्रचलित असतं त्याच साच्यात आपलं काव्य ओतून विशिष्ट भावविश्वाचा प्रसार केला, तर त्या काव्याला लोकांकडून प्रतिसाद मिळत असतो.

पारंपरिक कवितेपासून अलीकडील पन्नास- साठीच्या दशकातील, साठोत्तरी, आधुनिक आणि आजची अतिआधुनिक अशी सर्वच कविता या संग्रहात समाविष्ट झाली आहे.

'इथे 'परां'ची सीमा सरते
मानवतेचे अजिंक्य नाते
अंधाराच्या अथांगतेवर
हेच दिवे तरती।' (कुसुमाग्रज, पृ. ३१)

अशा सहज सोप्या काव्यात्मकतेने नटलेल्या कवितेपर्यंत आपण केव्हा येऊन पोचतो हे हा संग्रह वाचताना कळत नाही.

स्वत: संपादक नारायण लाळे यांच्या 'बायबल' नावाच्या कवितेतील दुसरे कडवे बघू या :

'...आठवते मला
चर्चच्या बाहेर
पायात चपला नाहीत म्हणून
रडत बसलेला भिकारी
आणि ज्याला पायच नाहीत
असे एक दु:ख
रस्त्यावरून
खुरडत जाणारे!' (पृ. ८३)

कवितेतल्या या मूळ साध्यासुध्या आणि भेदक शब्दांव्यतिरिक्त या कवितेवर अजून काय अर्थबोधाचं नवं भाष्य करता येईल? अशी कविता वाचून कोणताही संवेदनशील माणूस आतल्याआत अंतर्मुख होईल. दैवाधीन असलेला माणूस दु:ख करत एकाच जागी रडत बसतो, तर स्वत:वर विश्वास असणारा पाय नसूनही खुरडत चालतो, हा खरा कर्मयोग.

'आज आम्ही धुऊन घेतो आपापली पापं
आमच्या सोयीनुसार -
एखाद्या कुंडात किंवा नदीत डुबकी मारून,
किंवा एखाद्या जाळीपुढे कन्फेस करून,
किंवा एखादं संगमरवरी मंदिर,
अनाथाश्रम, अन्नछत्र, नारी-वसतिगृह
किंवा असंच काहीसं बांधून.'
(निरंजन उजगरे, पृ. ९९)

ही आधी कविताच आहे. ही कविता कोणावर वगैरे बाबी नंतरच्या. काही लोक धर्म वा देवपूजा म्हणजे आपली पापं धुण्याचा साबण समजतात. अशा समजामुळेच लाचलुचपतीने कोट्याधीश होणारी माणसं एखाद्या देवाला पापक्षालनार्थ सोन्याचा मुकुट अर्पण करतात. म्हणजे आपल्या पापकमाईतून देवालाही लाच देतात. अनाथाश्रम, अन्नछत्र वगैरे चालवणं त्यातल्यात्यात नक्कीच बरं.

'तू पुस्तकं लिहिली नाहीस
मंदिरं नि संस्था उभारल्या नाहीस
पण तू 'शब्द' कोरलेस,
मानवाच्या हृदयात' (जोसेफ तुस्कानो, पृ. ११७)

अशीही प्रचिती कोणाला येशूकडून मिळू शकते. हे 'शब्द' म्हणजे क्षमा, करुणा, दया, शांती, बंधुभाव, माणुसकी आदी असू शकतात, आणि येशूने हे नुसते शब्द लिहिले नाहीत, तर ते तळागाळातल्या जीवनात उपयोजित करून दाखवले.

'स्टेन्सची मुलं बंद मोटारीत जाळल्यावर
'त्या' आईचा जीव कुठे असेल?
– तरीही तिने त्याला माफ केलं.
एका स्त्रीनं मनूला माफ केलं.' (लोकनाथ यशवत, पृ. १२०)

ही खरी मानवतेची शिकवण, जी या कवितेत भारतातील एका क्रूर घटनेचा संदर्भ देत काव्यातून प्रकट होते. माफ करायला येशू वा कोणत्याही देवाइतकं महान असावं लागतं.

'अंतर्बाह्य सर्वत्र कोलाहल...
गावात आणि देवळातही.
चर्चबेलचा नाद विरत चाल्लाय,
विरत चाल्लेय स्वर्गीय संगीत,
पक्ष्यांच्या चोचीतलेही
हिरावून घेतलेय गीत...'
(सिसिलिया कार्व्हालो, पृ. १२३)

आज नावापुरतेच धर्म उरलेत की काय? धर्माच्या नावावर चाललेला अनाचार, दांभिकता वा कर्मकांड देखावा या कवितेतून अधोरेखित होतो. अशा दांभिक कर्मकांडातून जीवनसंगीत कसं ऐकू येईल?

'हातात करवंटी घेऊन तो ओरडत होता,
'कालच सगळ्या देवांना देवआज्ञा झाली
आपापल्या देशात.
त्यांच्या श्राद्धासाठी शिधा हवाय
वास नसलेला –'
तेव्हा लोकांनी त्याला चढवला
अडगळीत पडलेल्या येशूच्याच क्रूसावर.'
(नीरजा, पृ. १३०)

सत्य बोलणाऱ्यालाच नेहमी क्रूसावर जावं लागतं. जो संधिसाधू आहे वा अंधश्रद्ध लोकानुनयी आहे अशा लबाडांना समाजात नेहमीच मानसन्मान मिळत राहतात. तोंडपूजेसाठी का होईना वाईट लोकांना जनमानसात नावाजलं जातं. अशा दांभिक लोकांच्या प्रार्थना मात्र कोणताच देव मनावर घेत नाही. अशांच्या देवभोळेपणाचा देव कंटाळा करतो. याचा प्रत्यय 'नीरजा' यांच्याच 'जांभई' नावाच्या सहा ओळींच्या छोट्याश्या कवितेतही येतो.

**येशू ख्रिस्त या व्यक्तिरेखेत दिसणारी जीवनमूल्ये, त्यातून प्रकट होणारे सामाजिक संदर्भ ही या पुस्तकाची आशयसूत्रे असल्याचं प्रस्तावनेत नारायण लाळे स्पष्ट करतात. कवितेतून संस्कृतीची व भाषेची जपणूक होत असते हे खरं आहे. येशू ख्रिस्त ही व्यक्तिरेखा कवितेचा विषय होताना साहजिकच या कवितेत धर्म आणि विशिष्ट संस्कृतीचे पडसाद उमटतात. भाषा विचार– भाषा उपयोजन– विशिष्ट भाषेचं भान आणि स्थानिक सांस्कृतिक आत्मभानही या संपादित कवितेतून दृग्गोचर होताना दिसतं. मौखिक संस्कृतीतले मिथ कवितेत प्रतिबिंबीत होताना वैश्विक मूल्यभान जपतं.**

'प्रश्न इतकाच आहे :
शिक्षेत सूट दिल्यास
परिश्रमपूर्वक बनवलेल्या क्रूसाचं काय?'
(सायमन मार्टिन, पृ. १३६)

कायदा केला म्हणजे शिक्षा झालीच पाहिजे. त्याशिवाय इतरांना वचक बसणार नाही, अशी धारणा शासकीय यंत्रणेत असते. या राजकीय वा हुकूमशाहीचं प्रतिबिंब या कवितेत हुबेहूब पडलेलं दिसतं.

संदेश ढगे यांनी निरंजन उजगरे यांच्यावर लिहिलेल्या कवितेत म्हटलंय,

'मला तू दिसला नाहीस कधी
माणसांच्या गर्दीत
झुलताना– क्वचित डुलताना
मग तुझ्या जाण्यानंतर
हा असा अचानक माणसांचा फुलोरा
कसा काय उगवून आला स्मशानात?
की तूच पेरून ठेवले होतेस
संबंधाचे बी

तुला हवे तेव्हा उगवून येणारे?' (पृ. १४३)

इथं निरंजन उजगरे हे नक्की 'ख्रिस्तवासी'च झाल्याचं अधोरेखित केलं आहे कारण उजगरे हे व्यक्तिमत्त्व कुठं मुद्दाम मिरवून घेणारं नव्हतं. आपण आणि आपलं काम भलं, याव्यतिरिक्त ते कुठं विनाकारण चमकत राहणारे कवी नव्हते.

'तुला
क्रुसावर चढवतानाही
तू म्हणत होतास
'त्यांना माफ कर'
इथे तर
माफीचा प्रश्नच येत नाही
चूक नसतानाही
मजबुरीने माफी मागणाऱ्यालाच
चढवलं जातं सुळावर' (अजय कांडर, पृ. १४८)

आजच्या जगात मग्रुर माणसाला निरपराध समजलं जातं. झूठ पण ताठ बोलणाऱ्या माणसाला तोंडावर का होईना प्रामाणिक म्हटलं जातं. अशा माणसाविरुद्ध पुरावा असला तरी तो सादर करायला लोक दहा वेळा विचार करतात. असे लोक स्वत:च स्वत:ला चारित्र्याचे प्रमाणपत्र देऊन ठेवतात. मात्र या जगात नम्रपणे वागणाऱ्याला गुन्हेगार समजलं जातं, आणि असे पापभीरू, प्रामाणिक, जगाचं कल्याण व्हावं असं चिंतणारे लोक येशूसारखंच कायम सुळावर जात राहतात.

'तो निराधार सैलानी वेश्यालयात गेला
माणसात आल्याचा भास झाला त्याला
तिने स्वागत केले हसून त्याचे
ना कोणताच निरर्थक प्रश्न विचारला
तिच्या आत डोकावून पाहिल्यावर
उद्याचे प्रकाशकोंब
क्रांतीचे अनौरस पुत्र धरीत होते बाळसे...'
(वीरा राठोड, पृ. १५८)

आज प्रामाणिकपणा, सचोटी, खरेपणा, व्यवहाराला चोख असणारे अनुभव फक्त वेश्यागृहासारख्या तिरस्कृत जागी पाहायला मिळतात, हे नाईलाजाने का होईना खरं वास्तव आहे, आणि तथाकथित धार्मिक, प्रतिष्ठित, सश्रद्ध लोक कसे दांभिक असतात, यावर ही कविता तिरकस भाष्य करते.

विस्तारभयास्तव काही मोजक्याच कवितांचा इथं थोडक्यात आढावा घेतला आहे. पुस्तकात संपादित केलेल्या सर्वच कवितांचं वाचन-मनन-चिंतन करताना मनस्वी आनंद होत राहतो.

मराठी कवितेत येशू ख्रिस्त ही प्रतिमा उपयोजित व्हायला चारशे वर्षांची परंपरा आहे. ही चारशे वर्षांची परंपरा धुंडाळत अशा कवितेचा शोध घेणं ही साधी गोष्ट नव्हती. तरीही अनेक खस्ता खाऊन संपादक नारायण लाळे यांनी हे संपादन पूर्णत्वास नेलं व साहित्य अकादमीसारख्या प्रतिष्ठित प्रकाशनाने ते प्रकाशित करावं यात सर्व काही आलं. पुस्तकाच्या तलपृष्ठावर (मलपृष्ठावर) पाठराखणात (ब्लर्ब) म्हटल्याप्रमाणे, 'कवितांचा हा प्रवाह संस्कृती, नीती, श्रद्धा, सद्सद्विवेकबुद्धी, जीवननिष्ठा वृद्धिंगत करणारी मूल्यं ह्याचे जतन करणारा आहे.' या अवतरणाशी कोणीही पूर्णपणे सहमत होईल.

मराठीतल्या इतर महत्त्वपूर्ण संपादित कविता संग्रहांच्या पुस्तकांत आता या पुस्तकाचाही समावेश झाला आहे. या पुस्तकाला औरंगाबादच्या सरदार जाधव यांनी मुखपृष्ठ केलं असून मुखपृष्ठातील चित्रात आभाळातल्या बापाचा ढगातून खाली लोंबकळलेला एक हात आणि तळहातावर ठोकलेल्या खिळ्यांमुळे साकळलेला रक्तरूपी अवशेष दिसतो. पुस्तकाच्या विषयाला यथार्थ न्याय या मुखपृष्ठ चित्रकाराने दिलेला आहे.

**डॉ. सुधीर रा. देवरे**
सायास, १८७, टेलिफोन कॉलनी, पाठक मैदानाच्या पूर्वेला,
बसस्थानकामागं, सटाणा- ४२३ ३०१ जि. नाशिक.
मोबाइल: ९४२२२७०८३७, ७५८८६१८८५७
Email: drsudhirdeore29gmail.com



अनुक्रमणिका

परीक्षण

# असो आता चाड : अधांतरी जगण्याचे आक्रंदन

व्यवस्थेला प्रश्न विचारणाऱ्या आणि जनसामान्यांच्या दुःखांना मुखर करणाऱ्या 'असो आता चाड' या संदीप जगदाळे यांच्या काव्यसंग्रहाचे मनोहर सोनवणे यांनी केलेले परीक्षण.

मनोहर सोनवणे




कवी संदीप जगदाळे यांची कविता अधांतरी जगण्याच्या ठसठसत्या वेदना मांडते. मराठी कवितेत साधारणपणे गेल्या तीन दशकांत ग्रामीण जगण्याची झालेली परवड मांडणारा जोरकस प्रवाह निर्माण झाला आहे. ग्रामीण जगण्यावर झालेले आक्रमण-अतिक्रमण, तळामुळाला जात असलेले तडे, शेती- मातीतल्या जगण्याचा झालेला कोंडमारा या प्रवाहातून ठळकपणे अभिव्यक्त होत आहे. महाराष्ट्राच्या सर्व भागांतून, हवामानाच्या वेगवेगळ्या विभागांतून, समाजाच्या वेगवेगळ्या स्तरांतून येत असलेले हे आवाज आहेत. त्यांचे शब्द सच्चे आहेत. त्यांचे दुःख सच्चे आहे. एक व्यापक भोवताल, मोठा जनसमूह आपल्या अस्तित्वासाठी झगडतो आहे, त्याचे पडसाद कवितेतून उमटत आहेत. ही एक मोठी घडामोड आहे. संदीप जगदाळे या प्रवाहातील कवी आहेत. त्यांच्या 'असो आता चाड' या कवितासंग्रहात त्यांनी विस्थापित जगण्याची विदारकता मांडली आहे.

'तुम्हाला कीव आलीय का कधी
शेतीमातीशिवाय, मुळांशिवाय
अधांतरी जगणाऱ्या माणसांची ?'

असा प्रश्न संदीप जगदाळे विचारत आहेत. धरणामुळे विस्थापित झाल्याची व्यथा ते मांडत आहेत. धरणात जे गाव बुडालं त्याच्या खुणा कवीनं उरात जपल्या आहेत. कवी म्हणतो, 'मी एक गाव मरताना पाहिलंय / एका मेलेल्या गावातून जिवंत राहून बाहेर पडलोय.' ( पा.४४ ) ज्या नदीने गावाला गिळंकृत केलं, त्या नदीशी जन्मोजन्मीचं नातं आहे.

किती पिढ्या तिच्या पाण्यावर जगल्या. किती पिढ्यांची राख तिच्यातून वाहिली. त्या नदीनेच जीवन दिलं. सुख दिलं. या नदीसोबतच्या किती आठवणी साठलेल्या आहेत. किती संवेदना चिकटलेल्या आहेत.

'दांडातून खेळायचीस तू वावरभर / शिगोशीग भरून टाकायची कणग्या ... ' (पा.२४) ' 'मी शोधतोय / नदीत कुठं दिसतेय का / माझ्या आजापंज्यांची राख ... त्यांनी नदीत उतरून / घामाने भिजलेला देह धुतला असेल / तेव्हा पाण्यात उमटलेली त्यांची घालमेल / अजूनही शिल्लक असेल का पात्रात कुठंतरी ... ' (पा.२२)

अशी ही नदी मुळावर का उठली? कवीच्या प्रश्नात अस्वस्थता आहे. 'पण बाई, अशा कोणत्या तहानेने व्याकूळ झालीस की/ ओलांडलास उंबरठा / पाळली नाहीस काळी पांढरीची कोणतीच वहिवाट / गिळून टाकल्यास/ आमच्या सगळ्या सुपीक खाणाखुणा ' (पा.२४)

एक जितंजागतं, नांदतं गाव धरणासाठी नदीच्या पाण्यात गेलं. वाट्याला अधांतरी जिणं आलं. कवी म्हणतो, 'गाव मेलं तरी त्यातली माणसं अशी / सहजासहजी कशी मरतील / तर मी कोठेही दिसू शकतो तुम्हाला / अधांतरी लटकलेला' (पा.४४) मुळापासून उखडून टाकल्याची भळभळती जखम घेऊन माणसं गाव सोडतात. विस्थापित होतात.' गाव पाठीवर घेऊन निघणं / हे सगळं इतकं सोपं असतं का?...मला सांगा ना, माणसं गावाला कायमचं/ पारखं होऊन चालू लागतात / तेव्हा कसे दिसतात '
(पा. ४६-४७)

गाव नाहीसं होण्याच्या, गाव दुरावण्याच्या वेदना या कवितांमध्ये खोलवर झिरपलेल्या आहेत. 'माझं गाव पाण्यात राहतं ', 'मी खांद्यावर माझ्या गावाचं मढं घेऊन फिरतोय', 'सोडली गावशीव कायमची', 'आपण तर आख्खं घरच विसरून आलोय' अशा कितीतरी ओळींतून हे दुःख पुनःपुन्हा वर आलं आहे. त्याची आर्तता शब्दांत सांगणं कठीण आहे, आपण त्यासाठी कितीतरी चपखल विशेषण शोधत राहिलो तरी कारण ते कवीच्या भोगण्यातून आलेलं आहे, आणि म्हणून कवी जेव्हा म्हणतो, 'माती म्हणजे काय? हे ठाऊकच नसतं तुम्हाला / मी मातीसोबत माती झालोय' ( पा. ३३ ), तेव्हा गाव, घर, रान, माती आणि त्यासोबत जगणारा माणूस, नव्हे प्रत्येक जीव हे एकच अस्तित्व आहे, त्यांना अलग कसं राहता येईल, सुटं सुटं कसं जगता येईल हे त्याला सांगायचं असतं. त्यांचं अविभाज्य नातं अधोरेखित करायचं असतं. माणसं गावाला, घराला गिळंकृत करणाऱ्या पाण्याला विसरतील; पण त्यांच्या आठवणीत गावाला, घराला जिवंत ठेवतील, असा कवीचा विश्वास आहे, भावना आहे (पा.२०).

मात्र व्यवस्था भावनाशून्य असते. कोरडी असते. तिच्या 'दफ्तरी' या संवेदनांना जागा नसते. ती विचारते, 'माती काय छातीवर बांधून नेणार आहात का ? इतका काय जीव गुंतवता या जुनाट छपरांमध्ये ...आता उचला तुमचं गबाळ / निघा इथून ... नाहीतर आम्ही उचलून फेकूच तुम्हाला' (पा.२९). कोरडीठक्क व्यवस्था हातात एक नोटीस ठेवते. व्यवहाराला 'जागत' चार-दोन कवड्या अंगावर फेकते आणि म्हणते, 'इथं आता तुझं काहीच काम नाही.' निरर्थक जन सुनावण्या, खेटे घालायला लावणाऱ्या कोर्टकचेऱ्या, न्यायालयाचे सत्राशेसाठ पानांचे निवाडे, मढ्यावरचे लोणी खाणारे दलाल सगळेच संवेदनशून्य आहे. अवतीभवती स्वार्थी गिधाडं टपून आहेत. हिरव्या तुकड्यांवर डूख धरणारे आहेत. कवी म्हणतो, 'इथं कोणीच नाहीय तुमचा वाली/परक्या वाटांवर पाय खोरुन मरण्याशिवाय / तुमच्यासमोर ठेवलेला नाहीय/दुसरा कोणताच पर्याय' (पा.३०)

पुनर्वसन म्हणजे परक्या ठिकाणी परकं जगणं. तिथल्यांसाठी तुम्ही परके आणि तुमच्यासाठी ते परके. हे कठोर वास्तव आहे. दोहोबाजूंचं हे परकेपण कवी नाकारत नाही. परकेपणाचं हे शल्य तो पुनःपुन्हा उच्चारतो आहे. 'कुठल्याच मातीनं पोटाशी धरलं नाही / उपरा उतरकरी झालो.', ' ही परकी माती / माझ्या तळपायांना बिलगत नाही / पाय मूळ गावधूळ विसरत नाहीत.' जन्मभराचं उपरेपण पदरात पडल्याचं हे शल्य आहे. ते घेऊन जगण्याशिवाय पर्याय उरलेला नाहीय. ज्या धरणासाठी राबलो, ज्या धरणापायी गाव गेलं, त्या ' धरणाचं पाणी पिऊन / फुललं परक्याचं माळरान ....' आमच्या सगळ्या सुपीक खाणाखुणा पुसल्या गेल्या. कवी नदीला म्हणतो, 'धरणाला मी आता / धरण मानत नाही / मानतो तुझ्या देहावरची जखम' (पा.२५). हे जखमीपण कवीच्या प्रत्येक शब्दातून ध्वनित होतं.

विस्थापनामुळे झालेली वाताहत कवी पाहत आहे. 'हातावर पडलेल्या तुरी / कुठवर जपून ठेवणार होते फाटके खिसे ' (पा.४६), 'आता उगवतो मावळतो दिवस / ओपन क्लोजच्या गारुळाने / चावडीवरच्या डावात / पत्त्यांसंगे पिसून निघतात डोळ्यांतील स्वप्नं / दिवसभराचा अपमान /घोटाघोटात बुडवून /रोज नव्यानं मरतं गाव /

**एक जितंजागतं, नांदतं गाव धरणासाठी नदीच्या पाण्यात गेलं. वाट्याला अधांतरी जिणं आलं. कवी म्हणतो, 'गाव मेलं तरी त्यातली माणसं अशी / सहजासहजी कशी मरतील / तर मी कोठेही दिसू शकतो तुम्हाला / अधांतरी लटकलेला' (पा.४४) मुळापासून उखडून टाकल्याची भळभळती जखम घेऊन माणसं गाव सोडतात. विस्थापित होतात.' गाव पाठीवर घेऊन निघणं / हे सगळं इतकं सोपं असतं का?...मला सांगा ना, माणसं गावाला कायमचं/ पारखं होऊन चालू लागतात / तेव्हा कसे दिसतात '**
**( पा. ४६-४७)**

झिंगलेली रात्र उशाला घेऊन' (पा.१७).

कवी विचारतो, 'गेलं पाणी दूरदूर / पण गेलं नेमकं कुठे?/ आमच्या वुडीत घशाला तर / सदाचीच कोरड' (पा.१६). आणि कवी जेव्हा जायकवाडी, सरदार सरोवर, रिहंद, भाक्रा, कोलार अशा खुणा सांगतो, स्वत:च्या गावाचं उद्ध्वस्तपण धनुष्कोडीत पाहतो, तेव्हा ही कविता त्याच्या एकट्याची राहत नाही, ती व्यापक होते. समान दुःखाचा आवाज बनते. हे या कवितेचं श्रेय आहे.

पण ही कविता इथेच थांबत नाही. 'एक अजस्र सावली सारखी सरकतेय त्याच्याकडे / ती अंगावर पडेल / अन् अचानक होत्याचं नव्हतं होईल' असं म्हणताना कवी जागतिकीकरणाचा परिणाम अधोरेखित करतो. 'सातासमुद्रापलीकडून येणारी / झगमगती धूळ / शिरू दिली चुल्हांगणात / आपल्या मातीच्या बदल्यात' (पा.८४) अशी नोंद करताना जल, जंगल, जमीन आणि जीव यांवर होत असलेले राक्षसी अतिक्रमण आणि त्यामुळे होत असलेली वाताहत सांगतो, 'आपण थाळा वाजवून साप घरात घेतले' अशी दाहक प्रतिक्रिया तो देतो.

'त्या ऐन मध्यरात्री लाल किल्ल्यावरून आकाशात कबुतरं सोडल्यानंतर ...' (पा.४२) आणि ' मला माहितीय / तुम्ही इथं / कापसाला पंतप्रधानांच्या महागड्या सूटमध्ये/ बटाट्याला वेफर्समध्ये/ धान्याला बियरमध्ये बदलणार आहात' (पा.३४) या ओळी केवळ एक कालपट सांगत नाहीत, तर मूल्यांच्या पडझडीचा चढता क्रम समोर आणतात. ही कविता आपण कोठे आहोत, कोठे चाललो आहोत, आपली दिशा नेमकी काय आहे याचा विचार करण्यास भाग पाडते. ती व्यवस्थेला प्रश्न विचारत आहे. आणि म्हणूनच ती समकालीन महत्त्वाची कविता आहे.

---

मनोहर सोनवणे
चलभाष : ९७६३३५८८९५
बी /, श्री दत्त अपार्टमेंट, माणिकबाग, सिंहगड रस्ता, पुणे

परीक्षण

# मानवी जगण्यातील वाताहतीची 'यसन'

ऊस तोडणी मजुराच्या जीवनावरील 'यसन' या कादंबरीची समीक्षा.

प्रेमसागर राऊत

अलीकडच्या काळात मराठी कादंबरी लेखकांनी वेगवेगळ्या भूसांस्कृतिक पर्यावरणाच्या प्रभावातून केलेले कादंबरीलेखन समृद्ध आहे. आशयनिष्ठ, प्रयोगशील असणारी समूह संस्कृतीच्या जाणिवांनी स्तिमित असणारी या काळातील कादंबरी बदलत्या मूल्यकल्पनांचे विश्लेषण करताना दिसून येते. वेगवेगळ्या भूप्रदेशातील, समूह सांस्कृतिक जडणघडणीतून आलेल्या लेखक वर्गाने या काळातील कादंबरीलेखन केल्यामुळे त्यांच्या अभिरुचीचे, समकालीन पर्यावरणाकडे पाहण्याच्या दृष्टिकोनाचे, स्वजाणिवेतील अस्सल जीवनधारणांचे, अनुभवांचे अंतःस्वर कादंबरीलेखनातून उमटत आहेत. अलीकडेच प्रकाशित झालेली 'यसन' ही ज्ञानेश्वर जाधवर यांची कादंबरी याच धाटणीची असल्याचे दिसून येते.

यसन हे वामन सोनवणेचे आत्मकथन आहे. वामन या कादंबरीचा नायक आहे आणि तो निवेदनातून त्याच्या जगण्याची कथा आपल्या समोर आणतो. ऊसतोडणी मजुराच्या कुटुंबात तो जन्माला येतो, त्याआधी आईच्या गर्भातून त्याची गोष्ट सांगायला सुरुवात होते. त्यातून ऊसतोडणी फडावरचा भोवताल उभा करतो, मग तिथे त्याची आई, बप्पा, बैलं, तिथली आजूबाजूची फडकरी माणसं, कोप्यावरचं जगणं, उन्हातले कष्ट सगळं काही लख्खपणे दिसायला लागते.

ऊसतोडणी मजूर हे अल्पभूधारक शेतकरी, शेतमजूर किंवा भूमिहीन असतात. ऊसतोड, शेती आणि पूरक व्यवसायावर जगण्याचं अर्थकारण करणारा हा समाज व्यवस्थेनं प्रवाहापासून उपेक्षित ठेवलेला आहे. वामन त्याचं प्रतिनिधित्व करतो. त्याच्यासमोर असलेल्या भयाण सभोवतालाला तो अनुभवतो, त्याला प्रश्न पडतात, त्याची उत्तरं व्यवस्था देऊ शकत नाही. वामनच्या कुटुंबासमोर जगण्याचे प्रश्न आहेत, शिक्षणाचे-आरोग्याचे आहेत. वामननं शिकावं, असे आईला वाटते; पण ऊसतोडणीच्या स्थलांतरनाने प्राथमिक शिक्षणाची हेळसांड झालेल्या कित्येक मुलांप्रमाणे त्याचाही अनुभव आहे. वामनने शिकून मास्तर व्हावे आणि आपल्या या अभावग्रस्त जगण्यातून बाहेर पडावं, असं त्याच्या कुटुंबाला वाटतं. वामन हुशार आहे. तो सवूअक्काबरोबर कामाला जाऊन पैसे मिळवतो. तो आगाऊ असल्याचे काही प्रसंग कादंबरीतून घडून येतात. सामाजिक-आर्थिक विषमतेने त्याच्या कुटुंबाच्या दैनंदिन आयुष्यातल्या प्रश्नांची तीव्रता भयावह दिसून येते. ऊसतोडणीच्या अतिकष्टाच्या कामाने अडचणी संपत नाहीत. अव्याहत कर्जबाजारीपण, आर्थिक पिळवणूक, प्रसगी शारीरिक अत्याचाराला सामोरं जाणं, त्यातून येणारा मानसिक ताण, या सबंध अस्तित्वहीनतेच्या कसोट्या, त्यांचे जगणे घुसमटीच्या चक्रव्यूहात कशा आणून ठेवतात याचे चित्रण कादंबरीत दिसून येते. श्रमाचा अव्यावहारिक मोबदला, शेतीच्या अशाश्वत स्थितीने रोजगारासाठी होणारी धडपड यानंतर त्यांच्या वाट्याला येते. खेड्यातल्या कष्टकरी समूहाचे उपेक्षेने भरलेले जगणे त्यांच्या जाणीवनेणिवेसह कादंबरीतून ठळकपणे दिसून येते. निरक्षरता, गैरसमज, अंधविश्वास, कर्मकांड यातून रूढींचं बळकट होणं हे माणूस म्हणून जगण्यावर प्रश्न उभे करतात.

'यसन'मधून लेखकाने वामनच्या जगण्यातल्या मोठ्या कालावकाशाची मांडणी करताना व्यक्तिकेंद्राकडून समष्टीकडे येण्याचे भान आलेल्या, उत्तरआधुनिक कालपटावर उभा असलेल्या एका पिढीच्या जगण्याचे विस्तारलेपण कादंबरीतून उलगडून दाखवले आहे. वामन, त्याचं गाव, उसाचे फड आणि शिक्षण- नोकरीनिमित्ताने अनुभवलेल्या प्रदेशाचे, तिथल्या परिसराचे, समाजमनाचे चित्रण करताना कादंबरीच्या आशयाचे प्रवाहीपण टिकून राहते. वामनला लहानपणापासून आईवडिलांसोबत काम करावे लागते. ऊसतोडणी फडावर सुरुवातीला तो पाचट गोळा करतो. उन्हात कष्ट करणाऱ्या आई बापाला मदत करतो. कोपीवरचं जगणं त्याच्या भावविश्वात महत्त्वाचं आहे. न कळत्या वयात ऊसतोड करणाऱ्या आपल्या कुटुंबाची हेळसांड त्याच्यासमोर असते. शिक्षण आपल्या या परिस्थिती बदलाचे माध्यम ठरू शकते याची त्याला जाणीव आहे. तो शिक्षणासाठी संघर्ष करतो. वामनने फडावर अनुभवलेले कितीतरी प्रसंग ऊसतोड मजुराच्या आयुष्याची परवड दाखवून देतात. स्त्रियांना ऊसतोडणी करून घरकाम

अशी दुहेरी कसरत करावी लागते. कादंबरीच्या सुरुवातीला असलेले वामनचे कथन कष्टकरी वर्गाच्या पार्श्वभूमीवर समूह वास्तवाची दखल घेताना दिसते. निरक्षर आईवडिलांची मुलांच्या शिक्षणाविषयीची अनास्था कशी त्रासदायक ठरते याचे काही प्रसंग कादंबरीत आहेत. वामन धडपडत प्राथमिक शिक्षण पूर्ण करतो. या संदर्भात कादंबरीतले अनेक घटना-प्रसंग, शाळेतलं आणि त्याबाहेरचं शिकणं त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणीसाठी पूरक असल्याचे चित्र निर्माण करतात. वर्तमान जगण्यासाठीचा अटीतटीचा संघर्ष करत असतानाच येणाऱ्या धूसर काळाच्या बदलासाठी प्रयत्न करत राहणं या समातर जाणिवेतून वामनचं शहाणपण कादंबरीतून आकारास आले आहे.

वामनच्या स्वकेंद्राभोवतीच्या वास्तवाची, सांस्कृतिक-सामाजिक पर्यावरणाची व्यामिश्र गुतावळ अधोरेखित करताना लेखक व्यवस्थेने रचलेले यसनींचे प्रतीकात्मक बंध मानवी जगण्याची वाताहत कशा रीतीने करतायेत याचे वर्णन करताना दिसतो. वामनला चांगल्या मार्कांविना डी. एड करता येत नाही. तो पुढे शिकून प्राध्यापक होण्याची स्वप्ने पाहतो, त्यासाठी तो प्रयत्न करतो. यामध्ये आई-वडिलाचे हालहाल पाहत असताना स्वत:चा अपमान, सतत नाकारलं जाण त्याला अस्वस्थ करतं; पण आपण शिकून या स्थितीला बदलवू शकू ही जाणीव त्याला पुन्हा आशेला लावत राहते. स्वत:चे अंगभूत कलागुण शिक्षणापुरती आर्थिक गणित जमवून त्याला नेमक्या वाटेवर उभं ठेवण्यास मदत करतात, छोट्या-मोठ्या कामातून वामनमधील परंपरेने मिळालेल्या श्रममूल्यांना ठळक करत राहतात. शिक्षण पूर्ण करून प्राध्यापकाच्या तात्पुरत्या नोकरीतून आपलं आणि कुटुंबाचं जगणं रेटताना शिक्षण व्यवस्थेच्या अवमूल्यनाने भारलेले समकालीन पर्यावरण वामनमध्ये टोकाची निराशा निर्माण करते. सुशिक्षित बेरोजगार पिढ्यांच्या शोषणात मग्न बाजारू शिक्षण व्यवस्थेत तोही शोषित बनल्याचे चित्र समोर येते. मानवी जगण्याची अशाश्वतता या काळाला प्रखर करत असताना कादंबरीतून आलेली तरुण पिढीच्या लग्नाच्या समस्यांना सामोरे जाताना होणारी तगमग चिंतन करायला लावणारी आहे.

यसनमध्ये लेखकाने कथानकाच्या माध्यमातून आशयसूत्रांच्या रचनेतून समूह संस्कृतीच्या अस्तित्वाचे अनेक पदर दाखवून दिले आहेत. उपेक्षितांच्या समूह संस्कृतीच्या अस्सल देशीय जाणिवा, त्यांच्या नेणिवेतील समज-अपसमजांचे स्तर, वर्गविशिष्ट तत्त्वज्ञान यांच्या सेंद्रिय रूपाने कादंबरी भरलेली आहे. वामन गर्भात असल्यापासून ते प्राध्यापकाची नोकरी गमावण्यापर्यंतच्या त्याच्या जगण्यातला कोलाहल चित्रित होताना त्याला निराशाजनक अवस्थेला पोहोचवण्याचे काम व्यवस्था कशी करत राहते त्याचे वर्णन कादंबरीतून होताना दिसते. वामनची गोष्ट जेवढी रंजक आहे तितक्याच वास्तवाच्या अनेकांगी कंगोऱ्यांनी बांधली गेलेली आहे. आपल्या जगण्यासाठी झगडणं हा एकमेव स्थायिभाव असलेल्या या समूहातील वामनसारख्या शिक्षण घेऊ शकलेल्या मुलांचे त्यांच्या दृष्टिकोनातून स्वत:च्या आयुष्याविषयीचे आकलन मांडू पाहणं गरजेचं आहे, ही कादंबरी लिहिण्यामागची भूमिका असल्याचे जाणवते.

यसनमध्ये वामनची माय, आई-बप्पा, नाना, वेळप्रसंगी स्वार्थाने वागणारी काकू, सवूअक्का यांसारखी वेदनेने बरबटलेली कष्टावलेली माणसे आहेत. वामनचे शिक्षक, कलाकेंद्रावरची बाई, गायतोंडे सर कादंबरीत माणूसपण आणू पाहतात. संवेदनहीन शर्मा मॅडम आणि वामनच्या प्रेयसीचा बाप चीड आणणारी पात्रं बनून राहतात. वामनचं कादंबरीतले प्रेमप्रकरण निखळ असल्याचे दिसून येते. कादंबरीतल्या पात्रांचं अस्सल जगणं लेखकावर असणाऱ्या उदारमतवादी दृष्टिकोनासह प्रकट होताना दिसून येते. वामनचे जगणे केंद्रस्थानी ठेवून सभोवतालच्या समूह वास्तवाचे चित्रण यसनमधून लेखकाने केले आहे.

वंचिताच्या सार्वत्रिक शोषणांच्या आयामांचे अधोरेखन करणारी यसन ही कादंबरी जागतिकीकरणानंतर सामाजिक-सांस्कृतिक मूल्य ऱ्हासाने पारंपरिक शोषणाच्या बदलत्या केंद्राच्या संदर्भातून मानवी जगण्याची घुसमट मांडते. प्रदेशबोलीच्या विशेष लयीने कादंबरी वाचनीय बनवलेली आहे. लोकगीतांचे उठाव परिणामकारक शैलीसह कादंबरीत अवतरले आहेत. वामनचे निवेदन लेखकाचेच आत्मकथन वाटावे इतकं प्रभावी आहे. आत्मनिष्ठ, व्यक्तिकेंद्री, व्यापक चिंतन आणि सामाजिक जाणिवेचा अभाव, अपवादात्मक तर्कहीन भाषिक संकर कादंबरीतील मर्यादा दाखवून देतात. यसन अलीकडच्या काही कादंबऱ्यांसारखी तिच्यातल्या आत्मकेंद्रिततेने एकसुरी वाटत असली तरी उपेक्षित समूहाच्या जगण्याच्या हक्कासंदर्भात लोकशाही व्यवस्थेतील कल्पनेपलीकडचा अवकाश रेखाटत असल्याने महत्त्वाची कादंबरी ठरते.

**प्रेमसागर राऊत**
चलभाष : ९१३०५७५१५२

---

कादंबरी । **यसन**
लेखक । **ज्ञानेश्वर प्रकाश जाधवर**
प्रकाशन । **स्वयंदीप प्रकाशन, पुणे**
पृष्ठे । **२६०** मूल्य । **२५० रुपये**



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

## मुख्य शाखा कार्यवृत्तांत

(दि.९ डिसेंबर २०१९ ते १५ मार्च २०२०)

१) दि. ९. डिसेंबर :- मसाप गप्पा- या उपक्रमात क्रिकेटपटू चंदू बोर्डे यांची मुलाखत प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी घेतली. क्रीडा क्षेत्रातील रमेश तावडे व सदानंद मोहोळ हे मान्यवर उपस्थित होते. क्रीडा रसिकांच्या उपस्थितीतून भरघोस प्रतिसाद मुलाखतीला मिळाला. श्रोत्यांच्या प्रश्नांना चंदू बोर्डे यांनी दिलखुलास उत्तरे दिली.

२) दि. १५ डिसेंबर २०१९ : - पंतप्रतिनिधींच्या प्रतिमेचे परिषदेत अनावरण. म.सा.प. च्या ११३ वर्षांच्या इतिहासात आज प्रथमच मसापच्या वास्तू पुण्यात जिथे उभी ती जमीन, सुमारे ११५ वर्षांपूर्वी परिषदेच्या माध्यमातून साहित्य संवर्धनाचे कार्य चालावे या हेतूने ज्यांनी ९९९ वर्षांच्या कराराने, देणगी दाखल दिली, त्या औंध संस्थानचे थोर संस्थानिक अधिपती राजा भवानराव तथा बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचे भव्य रंगीत तैलचित्र मसापला भेट देण्यात आले. लो टिळक स्मारक वाचन मंदिर चिपळूण, व मसाप चिपळूण शाखा यांनी हे तैलचित्र मसाप पुणेला आज भेट दिले. त्याचे अनावरण संमेलनाध्यक्ष डॉ. अरुणा ढेरे यांच्या हस्ते एका हृद्य सोहळ्यात झाले. देवरुखचे चित्रकार विक्रम परांजपे यांनी हे तैलचित्र साकारले आहे. मसाप चिपळूण शाखेचे प्रतिनिधी प्रकाशराव देशपांडे, विश्वस्त उल्हासदादा पवार, प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, सुनिताराजे पवार व मसाप कार्यकारिणीचे सभासद या खास कार्यक्रमास उपस्थित होते. मसापच्या इमारतीत दर्शनी भागात हे तैलचित्र लावण्यात आले.

३) दि. १६ डिसेंबर २०१९ :- मासिक मनोरंजनकार- का. र. मित्र व्याख्यानमाला : पहिले पुष्प. कवी कृ.ब. निकुंब यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने 'कवी कृ. ब. निकुंब- जीवन आणि काव्य' या विषयावर डॉ. विद्यागौरी टिळक यांचे व्याख्यान झाले.

४) दि. १७ डिसेंबर २०१९ :- मासिक मनोरंजनकार का. र. मित्र व्याख्यानमाला: द्वितीय पुष्प : डॉ. वंदना बोकिल कुलकर्णी यांचे 'कवी रेव्हरंड टिळक : जीवन आणि काव्य या विषयावर टिळकांच्या स्मृतीशताब्दी वर्षानिमित्त व्याख्यान झाले. या व्याख्यानाला डॉ. राजा दीक्षित उपस्थित होते.

५)दि. १८ डिसेंबर २०१९ : - मासिक मनोरंजनकार का. र. मित्र व्याख्यानमाला : तिसरे पुष्प : महात्मा गांधीजींच्या १५०व्या जयंतीनिमित्त : अरुण खोरे यांचे 'म. गांधीजींचे आत्मकथन : सत्याचे प्रयोग ' या विषयावर व्याख्यान झाले.

६) दि. २० डिसेंबर २०१९ : - दिवाळी अंक- २०१९ स्पर्धा पारितोषिक वितरण समारंभ:- श्री आनंद अंतरकर यांच्या हस्ते यंदाच्या स्पर्धेतील विजेत्यांचे सत्कार करण्यात आले. प्रारंभी अंतरकर, मीनाक्षी केळकर (देणगीदार) महेंद्र मुंजाळ (देणगीदार) बबन पोतदार व भालचंद्र कोळपकर (परीक्षक) यांचे ग्रंथ भेट देऊन सत्कार करण्यात आले. बबन पोतदार यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. पारितोषिक वितरण समारंभ पार पडल्यावर पारितोषिक प्राप्त विजेत्यांपैकी गीताली वि. म (पुरुष उवाच) लोकसत्ता (प्रतिनिधी), डॉ. वंदना बोकिल कुलकर्णी (संवादसेतू), महावीर माध्वण्णा (चौफेर समाचार), अक्षय वाटवे (लिंग) छात्रप्रबोधनचे प्रतिनिधी यांची प्रातिनिधिक भाषणे झाली. या वर्षी गेली ४१ वर्षे 'शतायुषी' हा दिवाळी अंक प्रकाशित करणाऱ्या डॉ. अरविंद संगमनेरकर यांचा 'खास' सत्कार करण्यात आला. या सत्काराबद्दल त्यांनी आपल्या भाषणातून मनोगत व्यक्त केले. (या स्पर्धेचे सविस्तर निकालपत्रक सोबत प्रसिद्ध आहे.

७) दि. २२ डिसेंबर २०१९ हेरिटेज वॉक :- विशेष कार्यक्रम : दै. महाराष्ट्र टाईम्स, टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचा संस्कृत आणि भारतीय विद्या विभाग आणि हेरिटेज इंडिया या तीन संस्थांतर्फे आयोजित करण्यात येत असलेल्या 'हेरिटेज वॉक' या उपक्रमातर्गत महाराष्ट्र साहित्य परिषदेला भेट देण्यासाठी कार्यक्रम आखला होता. उपस्थितांसमोर कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी परिषदेची सर्व रंजक माहिती सांगितली. यावेळी टिमविच्या डॉ. मंजिरी भालेराव, परिषदेचे कार्यवाह दीपक करंदीकर व कर्मचारी संदीप खाडे उपस्थित होते.

८) दि. ६ जानेवारी २०२० :- १४व्या किर्लोस्कर वसुंधरा आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवातले ५वे पर्यावरणस्नेही साहित्य संमेलन :- महाराष्ट्र साहित्य परिषद, स.प. महाविद्यालय यांच्या संयुक्त विद्यमाने, दिवसाचे साहित्य संमेलन झाले त्याला महाविद्यालयीन विद्यार्थी व पर्यावरणस्नेही नागरिकाचा भरपूर प्रतिसाद मिळाला. यंदा अध्यक्षपदी अतुल धामणकर यांची निवड झाली होती. लक्ष्मीकांत नावाच्या रोपट्याला पाणी अर्पण करून व 'वृक्षवल्ली आम्हा वनचरे' हा संत तुकारामांचा अभंग सराफ नावाच्या विद्यार्थिनीने सादर करून संमेलनाचे उद्घाटन झाले. उद्घाटक व स प. महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. दिलीप शेठ, महोत्सवाचे संयोजक वीरेंद्र चित्राव, कॉलेजच्या पर्यावरण विभागाचे प्रमुख प्रा. हनुमंत ठोंबरे, मसापचे कार्यवाह दीपक करंदीकर व अतुल धामणकर व्यासपीठावर उपस्थित होते. प्रा. ठोंबरे, यांनी प्रास्तावि केले. चित्राव यांनी भूमिका स्पष्ट केली व प्राचार्य डॉ. शेठ यांनी उद्घाटकाचे मनोगत व्यक्त केले. चंद्रपूरच्या जंगलातील वाघाचे जीवन याविषयीची अनुभवसिद्ध माहिती सांगत स्लाईड शोच्या मदतीने अध्यक्ष अतुल धामणकर यांनी जंगली प्राण्यांचे पर्यावरणातील नैसर्गिक साखळीतील स्थान माहात्म्य वर्णन केले. यावेळी धामणकरांच्या हस्ते 'आपलं पर्यावरण' या पर्यावरणविषयक विशेषांकाचे प्रकाशन झाले. सुरभी वालावलकर या विद्यार्थिनीने दिवसभरातील कार्यक्रमांचे उत्तम सूत्रसंचालन केले. दुसऱ्या सत्रात अंजली कुलकर्णी, संजय बोरुडे यांचे कवितावाचन झाले. डॉ संगीता बर्वे यांच्या 'अंतरीच्या गूढ गर्भी' या कवितासंग्रहाचे प्रकाशन व त्यांच्या गाण्याचा कार्यक्रम सादर झाला.

९) दि. २७ जानेवारी २०२०:- मसाप गप्पा :- या उपक्रमांतर्गत सुप्रसिद्ध प्रवासवर्णनकार मीना प्रभू यांची मुलाखत सुधीर गाडगीळ यांनी घेतली. या कार्यक्रमास रसिक चाहत्यांचा तुडुंब गर्दीचा प्रचंड प्रतिसाद मिळाला. जगभरच्या मुसाफिरीचे अदभुत अनुभव मीना प्रभू यांनी श्रोत्यासमोर मांडले

१०) दि. २८ जानेवारी २०२० :- प. पू. प. स्वामी स्वरुपानंद स्मृती व्याख्यान :- प्रारंभी कै. वसंतराव देसाई यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. योगगुरु डॉ. संप्रसाद विनोद यांचे 'योगविद्येचे अंतरंग' या विषयावर व्याख्यान झाले. शेवटी सौ. सीमा देसाई यांनी स्वामी स्वरुपानंद विरचित पसायदान सादर केले.

११) दि. १७ फेब्रुवारी २०२० :- कथामुग्ध :- डॉ. अरुणा ढेरे याच्या

'सीतेची गोष्ट' या कथेचे अभिवाचन डॉ. वंदना बोकिल कुलकर्णी यांनी केले. त्यानंतर डॉ.ढेरे यांनी कथेमागची कथा उलगडून दाखविली.

१२) दि. २० फेब्रुवारी २०२०:– ज्येष्ठ पत्रकार बाळशास्त्री जांभेकर जयंतीनिमित्त व्याख्यान मसाप व महाराष्ट्र पत्रकार कल्याण निधी, फलटण यांच्या संयुक्त विद्यमाने माजी संमेलनाध्यक्ष प्रा. डॉ. श्रीपाल सबनीस यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. अध्यक्षस्थानी प्रकाश पायगुडे होते. श्री. रवींद्र बेडकीहाळ यांनी प्रास्ताविक केले व प्रकाश पायगुडे यांनी समारोप केला. श्री. शिंदे यांनी सूत्रसंचालन केले.

१३) दि. २४ फेब्रुवारी २०२० : – मसाप गप्पा :– तालयोगी पद्मश्री सुरेश तळवलकरांची प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी मुलाखत घेतली. निर्मला गोगटे व सुचेता चाफेकर हे मान्यवर उपस्थित होते. श्रोत्यांच्या प्रश्नांना तळवलकरांनी उत्तरे दिली.

१४) दि. २६ फेब्रुवारी २०२०:– स्वा. सावरकर पुण्यतिथी कार्यक्रम :– विश्वास गांगुर्डे रचित सावरकर गीतांचा 'अग्निपूजा' हा कार्यक्रम झाला. श्रीपाद भावे, आनंद भीमसेन जोशी, ईश्वरी महाबळेश्वरकर, रमेश वैद्य व विश्वास गांगुर्डे यांनी ही गीते सादर केली. सावरकरांच्या प्रतिमेला फुले अर्पण करण्यात आली.

१५)दि. २७ फेब्रुवारी २०२० :– मराठीभाषा दिनानिमित्त विशेष साहित्य पुरस्कार प्रदान समारंभ – साहित्यिक भारत सासणे यांच्या हस्ते विविध पुरस्कारांचे वितरण एकत्रितरीत्या करण्यात आले. कुसुमाग्रजांच्या प्रतिमेला हार घालण्यात आला. एकूण नऊ पुरस्कारांचे समारंभपूर्वक वितरण करण्यात आले. देणगीदारांचे सत्कार झाले. निवड समिती सदस्यांच्या सन्मान करण्यात आला. धनंजय तडवळकर, विनायक अभ्यंकर, प्रा. मिलिंद जोशी, भारत सासणे यांची यथोचित भाषणे झाली.

१)म.म. द. वा . पोतदार पुरस्कार :– 'अप भूमीवर' – निवृत्त नौदल अधिकारी विनायक व विशाखा अभ्यंकर

२) के. विद्याधर पुंडलीक पुरस्कार :– 'वार' कथासंग्रह – अनघा केसकर

३) कवी यशवंत पुरस्कार :– गात्रगात्रात – कवितासंग्रह – नितीन मोरे.

४) ग.ना.जोशी पुरस्कार :– अंजिठा – डॉ. राधिका टिपरे

५) रा.श्री.जोग पुरस्कार :– छंदोमीमांसा – डॉ. शुभांगी पातुरकर

६) रा.श्री.जोग पुरस्कार : श्री. अरुण जाखडे (प्रकाशक) – पद्मगंधा प्रकाशन

कै. चिं.वि. जोशी पुरस्कार:– मस्त झकास अफाट –विनोदी कथा – डॉ. सुमन नवलकर ग्रंथाली प्रकाशन, मुंबई (प्रकाशक)

७) सुहासिनी इर्लेकर पुरस्कार :– नवोदित कवींसाठी – 'आदितृष्णा' विजय पाटील, मुंबई. हे पुरस्कार भारत सासणे यांच्या हस्ते देण्यात आले.

१६) दि. २८ फेब्रुवारी २०२० : –विज्ञान दिन :– मसाप व मराठी विज्ञान परिषद (पुणे विभाग) यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. डॉ. विद्यासागर पंडित यांचे व्याख्यान झाले. 'अंतराळातील जीवन' असा विषय होता. विनय र.र. यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. नीता शहा यांनी वक्तांचा परिचय करून दिला. राजेंद्र सराफ यांनी समारोप केला. अंजनी देसाई यांनी सूत्रसंचालन केले. यावेळी परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे उपस्थित होते.

१७) दि. ६ फेब्रुवारी २०२० :– संपादिका व सामाजिक कार्यकर्त्या विद्या बाळ यांच्या श्रद्धांजलीपर सभा झाली. बाबा आढाव, मंगला गोडबोले, डॉ. रेखा इनामदार-साने, डॉ. निलिमा गुंडी, मुक्ता मनोहर, सय्यदभाई, सुधीर गाडगीळ, अंजली कुलकर्णी यांनी श्रद्धांजली सभेत आपले विचार मांडले. प्रारंभी उभे राहून सामुदायिक श्रद्धांजली वाहण्यात आली.

१८) दि. २ मार्च २०२० :– एक कवयित्री एक कवी : – या उपक्रमात म. भा. चव्हाण, पद्मरेखा धनकर यांचे काव्य वाचन व संवाद झाला. प्रमोद आडकर व उद्धव कानडे यांनी संवाद साधला.

१९) दि. ७ मार्च २०२० :– जागतिक महिला दिनाच्या पूर्वसंध्येला विशेष कार्यक्रम:– डॉ. राधा मंगेशकर यांचे 'मीरा समजून घेताना' या विषयावर व्याख्यान झाले.

कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर
(कार्यवाह, म.सा.प. पुणे)

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# इतर शाखा कार्यवृत्त नोंद

## डोंबिवली शाखा

१) ३० नोव्हेंबर २०१९ रोजी मसाप डोंबिवली शाखेतर्फे, ज्येष्ठ कलाकार प्रदीप देसाई यांच्या, भारतरत्न गानकोकिळा लतादीदी यांचावरील 'आनंदी सूर, नव्वदी पार!' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. कार्यक्रमाचे अध्यक्ष श्री वामनराव देशपांडे हे होते.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक सुरेश देशपांडे यांनी, सूत्रसंचालन उमा आवटे पुजारी, तर विनायक जोशी यांनी आभार मानले. या प्रसंगी दीपाली काळे यांचा चतुरस्र पुरस्कार मिळाल्याबद्दल सत्कार करण्यात आला.

२) दि. ४ जानेवारी २०२० रोजी ज्येष्ठ कलाकार आरती मुनीश्वर यांच्या महाभारतातील धगधगती व्यक्तिरेखा, अग्निशिखा द्रौपदी या व्यक्तिरेखेचे पैलू उलगडून दाखविणारा एकपात्री कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक सुरेश देशपांडे यांनी केले, तर प्रज्ञा जोशी यांनी सूत्रसंचालन केले आणि आभार मानले.

३) ४५ वे, महानगर मराठी साहित्य संमेलन

मुंबई मराठी साहित्य संघ आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, डोंबिवली यांच्या संयुक्त विद्यमाने, रविवार दि. ९ फेब्रुवारी २०२० रोजी, डोंबिवली येथे ४५ व्या महानगर मराठी साहित्य संमेलनाचे आयोजन करण्यात आले होते. डॉ. राजन गवस उद्घाटक होते, लोकप्रतिनिधी आमदार श्री. रविंद्र चव्हाण स्वागताध्यक्ष होते. गतवर्षीच्या संमेलनाच्या अध्यक्ष कवयित्री नीरजा यांनी 'शरद जोशी स्मृती ग्रंथ प्रदर्शनाचे उद्घाटन केल्यावर दीपप्रज्वलन करून मान्यवर व्यासपीठावर स्थानापन्न झाले.

स्वागताध्यक्ष माधवराव जोशी यांनी डोंबिवलीतील साहित्यिक, कवी, पत्रकार, प्रकाशक, वाचनालये या सर्वांचा यथायोग्य उल्लेख केला. मुंबई मराठी साहित्य संघाच्या कार्याध्यक्ष प्रा. उषा तांबे यांनी प्रास्ताविक केले. उमा आवटे- पुजारी आणि दीपाली काळे यांनी सूत्रसंचालन केले.

## अहमदनगर शाखा

१) मसापचा गौरव सोहळा

मसापच्या नगर शाखेचे अध्यक्ष तथा 'दिव्य मराठी' चे ब्युरो चीफ अनिरुद्ध देवचक्के अध्यक्षस्थानी होते.



अनुक्रमणिका

या सोहळ्यात सर्वश्री प्रशांत गडाख, साहित्यिक आमदार लहू कानडे, सकाळचे कार्यकारी संपादक अॅड. बाळ बोठे पाटील, लोकमतचे आवृत्ती प्रमुख सुधीर लंके, ज्येष्ठ कादंबरीकार डॉ. संजय कळमकर, मसापच्या सावेडी शाखेचे कार्यवाह जयंत येलूलकर, राष्ट्रपती पदक प्राप्त शिक्षक अमोल बागुल यांना आ. मोनिका राजळे यांच्या हस्ते गौरविण्यात आले.

या वेळी अॅड. बाळ ज. बोठे पाटील, सुधीर लंके, प्रेस क्लबचे अध्यक्ष शिवाजी शिर्के यांची भाषणे झाली. साहित्य भवनासाठी सर्वतोपरी प्रयत्न करण्याचे आश्वासन सर्वांनी या वेळी दिले. कार्यक्रमाच्या सुरुवातीला मसापचे कार्याध्यक्ष किशोर मरकड यांनी प्रास्तविक करून शाखेच्या कार्याचा आढावा सादर केला. कार्यकारिणी सदस्य दशरथ खोसे यांनी गौरवपत्राचे वाचन केले, उपाध्यक्ष डॉ. शीतल म्हस्के यांनी प्रमुख पाहुण्यांचा परिचय करून दिला. कार्यकारिणी सदस्य शिल्पा रसाळ यानी सूत्रसंचालन केले. मसापचे कार्यवाह प्रा. एन. बी. मिसाळ, नसीर शेख, डॉ. मेधा काळे, क्रांतीकला अनभूले, उपाध्यक्ष डॉ. शरद सांव, केंद्रीय प्रतिनिधी चंद्रकांत पालवे तसेच ज्ञानदेव पांडुळे, कमल टेमकर, शशिकांत नजन, अभिजीत कांबळे, वृद्धेश्वर कारखान्याचे उपाध्यक्ष आबासाहेब काकडे, सुभाष ताठे, प्रा. दीपक आरडे, प्रा. देवठे, सविता बोठे, वैशाली मरकड आदी अनेक मान्यवर या वेळी उपस्थित होते.

## उत्तर सोलापूर शाखा

**१) मासिक महिला प्रबोधिनी दिवाळी विशेष अंक उद्घाटन सोहळा**

१. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उ. सोलापूर शाखेच्या वतीने दि. २४-१०-२०१९ रोजी राष्ट्रविकास शिक्षण संस्था, शिंदे चौक, सोलापूर येथील प्रांगणात प्रा. डॉ. हनुमंत मते (मराठी विभाग प्रमुख, वालचंद कला व विज्ञान महाविद्यालय, सोलापूर) व प्रा. मा. आनंद जाधव, संपादिका व माजी आमदार निर्मलाताई ठोकळ, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उ. सोलापूर चे अध्यक्ष ह. भ. प. सुधाकर इंगळे महाराज, शहा मंडप तसेच म. सा. प. उत्तर चे विविध पदाधिकारी, लेखक, कवी व अनेक मान्यवर उपस्थित होते. सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्याध्यक्ष श्री. निवृत्ती दळवी यानी केले, तर आभार नितीन आवताडे यांनी मानले.

**२) महात्मा गांधी सुवर्ण वर्षानिमित्त निबंध स्पर्धा**

२. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उ. सोलापूर शाखेच्या वतीने दि. ०२.१०.२०१९ रोजी महात्मा गांधी सुवर्णमहोत्सव वर्षानिमित्त स्वच्छता अभियान अंतर्गत प्रभात फेरी, बाळे परिसरातून काढण्यात आली व त्याच दिवशी निबंध स्पर्धा घेण्यात आली. जवळजवळ तालुक्यातून विविध शाळांतून ४०० विद्यार्थी सहभागी झाले होते.

आमदार निर्मलाताई ठोकळ तसेच नगरसेवक पुजारी म. सा. प. उत्तर शाखेचे अध्यक्ष सुकर महाराज इंगळे व म.सा.प. शाखेचे विविध पदाधिकारी उपस्थित होते. सदर कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी निवृत्ती दळवी व नितीन आवताडे यांनी परिश्रम घेतले.

**३) वाचन प्रेरणा दिन**

३. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उ. सोलापूर शाखेच्या वतीने दि. १५.१०.२०१९ रोजी डॉ.एपीजे अब्दुल कलाम वाचन प्रेरणा दिन म्हणून साजरा करण्यात आला. या कार्यक्रमासाठी महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ बाळे विविध शाखातील मुख्याध्यापक व संस्थेच्या कोषाध्यक्षा शिल्पाताई ठोकळ, म.सा.प. शाखेचे विविध पदाधिकारी उपस्थित होते.

**४) शिवणकला व व्यवसाय पुरस्कार**

४. महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उ. सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने दि. २४.०१.२०२० रोजी स्वा. सै. स्व. सौ. जनाबाई जाधव २७ या शिवणकला व व्यवसाय पुरस्कार देण्यात आला. शिवणकलेमध्ये सौ. मंदाकिनी सिद्धलिंग निंबर्गी (रा. शेळगी, सोलापूर), सौ. रुपाली सुनिल वाळे (रा. जुळे सोलापूर) तर व्यावसायिक शिवणकला पुरस्कार श्री. सुरेश रा. बिद्री (रा. सोलापूर) यांना पुरस्कार देण्यात आले.

प्रमुख पाहुणे म्हणून मा. हर्षवर्धनजी शहा सचिव (श्राविका संस्था, सोलापूर), माजी आमदार निर्मलाताई ठोकळ, सचिन ठोकळ, म. सा. प. शाखेचे विविध पदाधिकारी उपस्थित होते.

## ठाणे शाखा

**१) 'एक दिवसीय कथा महोत्सव'**

महाराष्ट्र साहित्य परिषद ठाणे जिल्हा शाखेच्या वतीने दिनांक २४ नोव्हेंबर २०१९ रोजी एक दिवसीय कथा महोत्सव हा कार्यक्रम आयोजित केला होता. सुप्रसिद्ध साहित्यिक पद्मश्री मधु मंगेश कर्णिक हे या संमेलनाचे अध्यक्ष होते. 'मराठी कथा आणि अनुवाद' या परिसंवादात चंद्रकांत भोंजाळ, वसुधा सहस्रबुद्धे आणि कृष्णा किंबहुने यांनी सहभाग घेतला होता. 'नवकथेचे युग संपले आहे काय?' या परिसंवादात मोनिका गजेंद्रगडकर, किरण येले आणि सुरेखा सबनीस सहभागी झाले होते. 'बहुविध कथा' हा तिसऱ्या सत्राचा विषय होता. यात सुबोध जावडेकर, नितीन आरेकर यांनी सहभाग घेतला होता. 'माझी कथा आणि मी' हा चौथ्या सत्रात विषय होता. या विषयावर नीरजा, प्रणव सखदेव, जयंत पवार यांनी त्यांच्या कथेविषयीच्या दृष्टिकोनाविषयी आपली भूमिका मांडली. पद्माकर शिरवाडकर, कार्याध्यक्ष यांनी प्रास्ताविक केले. डॉ. अनंत देशमुख, कार्यवाह यांनी मान्यवरांना परिचय करून दिला. एकूण मराठी कथेविषयीचा आढावा मधु मंगेश कर्णिक यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात घेतला. मांगदेव काळे, कार्यवाह, यांनी या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले आणि उपस्थित मान्यवरांचे आभार व्यक्त केले.

## चाळीसगाव शाखा (जि. जळगाव)

**१. व्याख्यान – 'लोकराजा शाहू–व्यक्ती आणि विचार'**: दि. २६ जून २०१९ रोजी म.सा.प. चाळीसगाव व राष्ट्रीय कन्याशाळा, चाळीसगाव यांच्या संयुक्त विद्यमाने राजर्षी शाहू महाराज यांच्या जयंतीच्या निमित्ताने विद्यार्थिनींसाठी 'लोकराजा शाहू- व्यक्ती आणि विचार' या विषयावर प्रा. पी. एस. चव्हाण यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. याप्रसंगी शाखेचे संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, उपाध्यक्ष प्रा. अशोक वाबळे, कार्य. सदस्य शालिग्राम निकम तसेच मुख्याध्यापिका सौ. साधनाताई बारवकर, उपमुख्याध्यापिका सौ. कुसुमावती पाटील, पर्यवेक्षक श्री. एस. आर. जाट तसेच शिक्षक व शिक्षकेतर सहकारी वृंद उपस्थित होते.

**२.व्याख्यान – 'लोकशिक्षक शाहीर अण्णाभाऊ साठे'**

दि. १ ऑगस्ट २०१९ रोजी शाहीर अण्णाभाऊ साठे यांच्या जयंती निमित्ताने म.सा.प. शाखा-चाळीसगाव व नालंदा माध्यमिक विद्यालय, चाळीसगाव यांच्या संयुक्त विद्यमाने शाळेचे संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप यांनी 'लोकशिक्षक शाहीर अण्णाभाऊ साठे' या विषयावर अतिशय अभ्यासपूर्ण व्याख्यान सादर केले. याप्रसंगी कार्याध्यक्ष श्री. विजय पाटील, उपाध्यक्ष प्रा. अशोक वाबळे, कार्यवाह श्री. बी. एल. ठाकरे त्याचप्रमाणे विद्यालयातील ज्येष्ठ शिक्षक श्री. पी. एम. पाटील, श्री. दिपक चव्हाण, श्री. एम. एन.पाटील यांच्यासह सर्व शिक्षक व शिक्षकेतर सहकारी वृंद उपस्थित होता.

**३) कवी संमेलन –खुली काव्यस्पर्धा– लोकशाहीर अण्णाभाऊ साठे**

जन्मशताब्दी वर्ष व संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप यांच्या अमृतमहोत्सवाची सांगता असे दुहेरी औचित्य साधून शाखेने स्वरचित गेय कवितांची काव्यस्पर्धा दि.१/९/२०१९ रोजी आयोजित केली होती. या कार्यक्रमासाठी सुप्रसिद्ध कवी नारायणजी सुमंत (सोलापूर) यांना प्रमुख पाहुणे म्हणून आमंत्रित करण्यात आले होते. या समारंभासाठी संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, कार्याध्यक्ष विजय पाटील, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कोषाध्यक्ष अण्णा धुगाळ यांचेसह डॉ. सौ. उज्ज्वलाताई देवरे, शिल्पकार म.सो.वाविस्कर, स्वयंदीप संस्थेच्या प्रमुख मिनाक्षीताई निकम या प्रमुख अतिथी म्हणून उपस्थित होत्या. या बहारदार कविसंमेलनाचे सूत्रसंचालन शालीग्रामजी निकम यांनी केले. तर कवी रमेश पोतदार यांनी आभार प्रदर्शन केले.

**४) वार्षिक सर्वसाधारण सभा–** म. सा. प. शाखा- चाळीसगावची वार्षिक सर्वसाधारण सभा दि. १८ ऑगस्ट, २०१९ रोजी आयोजित करण्यात आली होती. संस्थापक अध्यक्ष प्रा.तानसेन जगताप यांच्या अध्यक्षतेखाली सदर सभा संपन्न झाली. या वेळी व्यासपीठावर कार्याध्यक्ष विजय पाटील, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव यांचेसह कोषाध्यक्ष अण्णा धुगाळ उपस्थित होते. या वेळी सुमारे ४० आजीव सभासद सभेस उपस्थित होते.

**५) कोजागिरी काव्यसंध्या–** यंदा शाखेच्या सर्व कार्यकारिणी सदस्यामध्ये कौटुंबिक जिव्हाळा जोपासला जावा या हेतूने स्थानिक कवी व कार्य. सदस्य मिळून दि. १८/१०/१९ रोजी रात्री काव्यापेक्षल आयोजित करण्यात आली होती. या वेळी संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप यांचेसह कार्याध्यक्ष विजय पाटील, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कार्यवाह बी. एल. ठाकरे, उपाध्यक्ष प्रा. अशोक वाबळे व अॅड. सुषमा पाटील, कार्य. सदस्य कवी रमेश पोतदार, कवी मनोहर आंधळे, शालीग्राम निकम, सौ. संगीता देव, राकेश वारसे व सर्वांचे कुटुंबीय उपस्थित होते. हा कार्यक्रम कार्य. सदस्य मा. राकेश वारसे यांच्या औदार्यातून दुग्धपान व जेवणासह संपन्न झाला.

**६) गीतोत्सव –भूपाळी ते अंगाई–** म.सा.प. शाखा-चाळीसगाव, कवीकट्टा तसेच विठ्ठल मंदिर, पवारवाडी यांचे संयुक्त विद्यमाने दिवाळी दीपोत्सवाचा सांगता सोहळा म्हणून 'भूपाळी ते अंगाई' हा सुगम संगीताचा कार्यक्रम दि. ३०/१०/१९ रोजी विठ्ठल मंदिरात आयोजित करण्यात आला. कार्यक्रमाचे उद्घाटन मा. गोविंद मोकाशी (संगीत विशारद, पाचोरा) शाखेचे संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, नगरसेविका सौ. विजयाताई पवार व सौ. संगीताताई गवळी, अॅड. सौ. आशा शिरसाठ, श्री. भिकन पवार यांच्या प्रमुख उपस्थितीत करण्यात आले.

या वेळी उपाध्यक्ष प्रा. अशोक वाबळे, कार्यवाह बी. एल. ठाकरे यांनी मोलाचे सहकार्य करून कार्यक्रम यशस्वी केला. शेवटी शालीग्राम निकम यांनी आभार मानले.

**७) खान्देशकन्या बहिणाबाई स्मृतीदिन–** दि. ३ डिसेंबर रोजी खान्देशकन्या कवयित्री बहिणाबाई चौधरी यांचा स्मृतीदिन शाखा कार्यालयात कार्यकारिणी सदस्य व पदाधिकाऱ्यांच्या उपस्थितीत साजरा करण्यात आला. या वेळी अॅड. सुषमाताई पाटील यांनी बहिणाबाईंचा जीवनपट उपस्थितांसमोर मांडला.

**८) 'अत्तदिप प्रकाशन सोहळा'–** शाखेचे संस्थापक अध्यक्ष आबासाहेब तानसेन जगताप याच्या अमृतमहोत्सवी वर्षाची सांगता स्मृती रूपाने कायम रहावी म्हणून यंदा 'अत्तदिप' हा साहित्य विशेषांक दि. २२ जानेवारी २०२० रोजी प्रकाशित करण्यात आला. सदस्य शालीग्राम निकम प्रमुख संपादक होते. त्याना सह-संपादक म्हणून कवी रमेश पोतदार तसेच प्रा. पी. एस. चव्हाण व प्रा. अशोक वाबळे यांचे सहकार्य लाभले.

**९) म. सा. प. व्याख्यानमाला–**प्रतिवर्षाप्रमाणे यावर्षीही दि. २६,२७ व २८ फेब्रुवारी २०२० रोजी म.सा.प. व्याख्यानमालेचे आयोजन करण्यात आले. व्याख्यानमालेचे यंदा सहावे वर्ष आहे. शहरातील वाणी मंगल कार्यालयात हा कार्यक्रम आयोजित केला होता. यात दि. २६ रोजी नाशिक येथील सुप्रसिद्ध कवी विष्णू थोरे यांच्या 'गाव-शिवारच्या कविता' सादर झाल्या. यासाठी सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ मा. अविनाश शिरुडे (संचालक, नासा) यांचे प्रायोजकत्व लाभले होते.

व्याख्यानमालेसाठी कायमस्वरूपी मदत देणारे डॉ. सुनिल राजपूत यांच्या प्रायोजकत्वातून दि. २७ फेब्रुवारी २०२० रोजी अभिनेत्री मेघना झुझम, पुणे यांचा 'मी तुमची सावित्रीबाई फुले' हा एकपात्री प्रयोग सादर झाला. तसेच दि. २८ फेब्रुवारी २०२० रोजी मा. वि. दा. पिंगळे (पिंपरी-चिंचवड), 'लोकशिक्षक संत गाडगेबाबा' या विषयावर बोलले. या दिवसाचे प्रायोजकत्व ज्येष्ठ पत्रकार मा. किसनरावजी जोर्वेकर यांनी स्वीकारले होते.

संकलन – गणेश आढाव, प्रमुख कार्यवाह

## नाशिकरोड शाखा

**१) 'उस्मानाबाद एक अनुभव'**

दि. : शनिवार दि. २५, जानेवारी २०२० वेळ : सायं.६.०० वा

ठिकाण : 'ऋतुरंग सभागृह', दत्त मंदिर चौक, नाशिकरोड, नाशिक.

कार्यक्रमासाठी शाखा कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, श्री. रमेश औटे, श्री. अनिल गुरव, डॉ. वसंत सहस्रबुद्धे, श्री. सुर्यकांत गुरव, श्री म. रंजना शिंदे, श्री. गो. तु. पाटील, अॅड. मुकुंद आढाव आदी उपस्थित होते.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. योगेश कापडणीस यांनी केले. कु. प्राजक्ता नागपुरे यांनी स्वागत काव्य सादर केले. कार्यकारणी सदस्य श्री. प्रशांत केंदळे यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले. श्रीम. ज्योती कदम यांनी अतिथींचा परिचय करून दिला. श्री. गणपतराव मुठाळ यांनी आभार मानले. कु. इंद्रायणी लोखंडे हिने पसायदान गायले. कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी श्रीम. सुरेखा गणोरे, श्री. हर्षल भामरे व श्री. पांडुरंग चव्हाण यांनी प्रयत्न केले.

**२) 'संवाद सृजनाशी–२८ वे पुष्प – श्रीम. वासंती देशपांडे'**

दिनांक : शनिवार दि. २३, नोव्हेंबर २०१९

कार्यक्रमासाठी वासंती देशपांडे, शाखा कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, कार्यवाह श्री. रवींद्र मालुंजकर, कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई, श्री. गोपाळराव सबनीस, श्री. प्रकाश देशपांडे, श्री. नरेंद्र शुक्ल, श्रीम. हेमा बक्षी, श्रीम. वृषाली सबनीस, श्री. विजय जैन, श्री. चंद्रकांत गुरव आदी उपस्थित होते.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्रीम. अलका अमृतकर यांनी केले. स्वागत काव्य श्री. दशरथ लोखंडे यांनी सादर केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक श्री. अनिल गुरव यांनी केले. श्रीम. सुमन हिरे यांनी अतिथींचा परिचय करून दिला. आभार श्री. योगेश कापडणीस यांनी मानले. श्रीम. सुजाता हिंगे यांनी गायलेल्या पसायदानाने कार्यक्रमाची सांगता झाली.

कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी श्री. हर्षल भामरे, श्री. विलास गोडसे, श्री. रामचंद्र शिंदे आदींनी प्रयत्न केले.

**३) 'संवाद सृजनाशी– पुष्प २९ वे – डॉ. विनीत वानखेडे'**

दिनाक : शनिवार दि. २८ डिसेंबर २०१९

कार्यक्रमासाठी डॉ. विनित वानखेडे, शाखा कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, माजी नगरसेवक प्रकाश बोराडे, मधुकर वानखेडे, कोषाध्यक्ष सुदाम सातभाई, नि. जि. न्या. वसंत पाटील, गणपतराव मुठाळ, डॉ. अंजना

वानखेडे. डॉ. शिल्पा कुंभार. रमेश औटे. अनिल गुरव. अॅड. अरुण वाकचौरे आदी उपस्थित होते.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्रीम. मंगला सातभाई यांनी केले. राजेंद्र सोमवंशी यांनी स्वरचित स्वागत काव्य सादर केले. श्रीम. सविता पोतदार यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले. रवींद्र मालुंजकर यांनी अतिथींचा परिचय करून दिला. विलास गोडसे यांनी आभार मानले. श्रीम. मनीषा विसपुते यांनी पसायदान गायले.

**४) 'संवाद सृजनाशी – ३० वे पुष्प – श्री. प्रवीण जोंधळे'**

दिनांक: मंगळवार दि. २८ जानेवारी २०२०

कार्यक्रमासाठी प्रवीण जोंधळे. शाखा कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी. कार्यवाह श्री. रवींद्र मालुंजकर. कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई. श्री. रमेश औटे. कवी श्री. देविदास खडताळे. श्री. पी. बी. गायधनी. श्रीम. सीमा महाबळ आदी उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्रीम. रेखा पाटील यांनी केले. कार्यकारणी सदस्य श्री. शिवाजी म्हस्के यांनी स्वागत काव्य सादर केले. अॅड. संगीता पाटील यांनी कार्यक्रमाचे प्रास्तविक केले. कार्यकारणी सदस्य श्री. दशरथ लोखंडे यांनी अतिथींचा परिचय करून दिला. श्रीम मंगला सातभाई यांनी आभार मानले. कु. प्राजक्ता पगार हिने पसायदान गायले.

कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी कार्यकारणी सदस्य श्रीम सुरेखा गणोरे व श्रीम. कामिनी तनपुरे. श्री. पांडुरंग चव्हाण. श्री. वसंत पाटील. श्रीम सुमन हिरे. श्री. राजेंद्र सोमवंशी. श्रीम. रंजना शिंदे यांनी प्रयत्न केले

**५) 'संवाद सृजनाशी– २९ वे पुष्प' डॉ. विनीत वानखेडे, दिनेश पैठणकर**

दिनांक: शनिवार दि. २८ डिसेंबर २०१९. कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी. श्री. प्रकाश बोराडे. डॉ. अंजना वानखेडे. डॉ शिल्पा कुंभार. श्री. अरुण वाकचौरे. श्री. वसंत पाटील आदी उपस्थित होते. कार्यक्रम यशस्वितेसाठी श्रीम. मंगला सातभाई. श्री. राजेंद्र सोमवंशी. श्रीम. सविता पोतदार. श्री. रवींद्र मालुंजकर. श्री, विलास गोडसे. श्रीम मनीषा विसपुते यांनी प्रयत्न केले

**६) उस्मानाबाद एक अनुभव : अलका अमृतकर**

दिनांक : शनिवार २५ जानेवारी २०२०. कार्यक्रमास डॉ. वसंत सहस्रबुद्धे. श्री. रमेश औटे, श्री. अनिल गुरव, श्री. गो. तु पाटील. श्री. उन्मेष गायधनी आदी उपस्थित होते. कार्यक्रम यशस्वीतेसाठी श्री. योगेश कापडणीस. कु प्राजक्ता नागपुरे, श्री. प्रशात केंदळे. श्रीम. ज्योती कदम. श्री. गणपतराव मुठाळ, कु. इंद्रायणी लोखंडे यांनी प्रयत्न केले.

**७) संवाद सृजनाशी – ३०वे पुष्प – श्री. प्रवीण जोंधळे, रामचंद्र शिंदे**

दिनांक : शनिवार २८ जानेवारी २०२०

कार्यक्रमास कवी देविदास खडताळे, श्री. पी. बी. गायधनी, श्रीम. सीमा महाबळ, श्री.पांडुरंग चव्हाण, कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी आदी उपस्थित होते. कार्यक्रम यशस्वितेसाठी श्रीम. रेखा पाटील. श्री. शिवाजी म्हस्के. अॅड. संगीता पाटील, श्री. दशरथ लोखंडे. श्रीम. मंगला सातभाई, कु. प्राजक्ता पगार यांनी प्रयत्न केले.

**८) संवाद सृजनाशी – ३१वे पुष्प – डॉ. विनोद गोरवाडकर**

दिनांक : शनिवार २२ फेब्रुवारी २०२०

कार्यक्रमास श्री. जितेंद्र बर्वे, श्री. विकास गायकवाड, श्री. सूर्यकांत गुरव, श्री. अश्विन ठोके, श्री. गौरवकुमार आठवले, श्रीम. विना बनकर, कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी आदी उपस्थित होते. सूत्रसंचालन श्री. राजेंद्र सोमवंशी, स्वागत काव्य श्रीम. सुजाता हिंगे, प्रास्ताविक श्री. योगेश कापडणीस, परिचय प्रा. मनीषा विसपुते, आभार कु. इंद्रायणी लोखंडे. पसायदान श्री. रामचंद्र शिंदे यांनी गायले.

## धुळे शाखा

**१) साहित्य समीक्षा संमेलन व राष्ट्रीय चर्चासत्र**

जयहिंद शैक्षणिक ट्रस्ट संचालित झुलाल भिलाजीराव पाटील महाविद्यालयात ७ डिसेंबर २०१९ रोजी म. सा. प आणि कबचौ उमवि. जळगाव अनुदानित. महाविद्यालयाच्या मराठी विभागातर्फे 'साहित्य समीक्षा: नवे दृष्टिकोन या विषयावर साहित्य समीक्षा संमेलन व राष्ट्रीय चर्चासत्र झाले. साहित्य समीक्षा संमेलन व राष्ट्रीय चर्चासत्राचे उद्घाटन माजी कुलगुरू डॉ. के. बी पाटील याच्या हस्ते करण्यात आले.

साहित्य समीक्षा संमेलन व राष्ट्रीय चर्चासत्रास पुणे येथील ज्येष्ठ समीक्षक मा. रेखा इनामदार –साने अध्यक्ष म्हणून लाभल्या होत्या.

कोल्हापूर चे डॉ. रणधीर शिंदे बीजभाषक म्हणून आमंत्रित होते.

'साहित्यसमीक्षा नवे दृष्टिकोन' या विषयावर प्रा. डॉ. आशुतोष पाटील यांच्या अध्यक्षतेखाली प्रा. डॉ. एकनाथ पगार., प्रा. डॉ. संजयकुमार करंदीकर, प्रा. डॉ. रामचंद्र काळुंखे यानी परिसंवादात सहभाग नोंदवून समीक्षेवर प्रकाशझोत टाकला अद्याप खूप प्रवास करावा लागणार आहे असे सांगत काव्यसमीक्षेतील, नियतकालिकांचे महत्त्वही विशद केले.' सदर चर्चासत्रास जयहिंद शैक्षणिक संस्थेचे अध्यक्ष मा. डॉ दादासाहेब अरुण साळुंके, उपाध्यक्ष मा. भाऊसाहेब प्रमोद पाटील, सचिव मा दादासाहेब प्रदीप भदाणे, माजी अध्यक्ष मा आबासाहेब विजय पाटील, महाविद्यालय विकास समितीचे अध्यक्ष मा. दादासाहेब प्रा. सुधीर पाटील यांची उद्घाटन प्रसंगी विशेष उपस्थिती होती.

म सा.प , पुणे येथील कार्याध्यक्ष मा प्रा मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह मा. प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनिताराजे पवार, संमेलन निमंत्रक मा. रावसाहेब पवार यांनीही विशेष उपस्थिती कार्यक्रमास लाभली.

चर्चासत्राच्या समारोप प्रसंगी जयहिंद शैक्षणिक संस्थेचे मा. संचालक भैयासाहेब अजित मोरे यांनी अध्यक्षस्थान भूषविले त्या वेळी त्यानी समीक्षेच्या विविध पैलूंवर विषयानुसार प्रकाशझोत टाकला समाजाच्या विविध समस्यांचा विचारही समीक्षकांनी करावा. त्यातून नवसमाज निर्मितीस चालना मिळण्यास मदत होईल हे विचार मांडले. मसाप, पुणे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यानी महाराष्ट्र साहित्य परिषद स्थापनेचे उद्दिष्ट, इतिहास व वाटचालीची माहिती दिली. महाविद्यालयाचे मा प्राचार्य डॉ. पी. एच. पवार यांनी उद्घाटनपर स्वागत. मनोगत व्यक्त केले. धुळे जिल्हा प्रतिनिधी मा. प्रा डॉ. शशिकला पवार यांनी प्रास्ताविक केले. धुळे जिल्हा अध्यक्ष प्रा. उषा पाटील यांनी समारोपप्रसंगी मनोगत व्यक्त केले. मराठी विभाग प्रमुख व समन्वयक प्रा डॉ. योगिता पाटील यानी गोषवारा सादर केला. मा प्रा. मिलिंद जोशी, मा. श्री. प्रकाश पायगुडे, मा. सुनिताराजे पवार यांनी मनोगत व्यक्त केले. महाविद्यालयाच्या उपप्राचार्य मा. डॉ. विद्या पाटील यांनी आभार व्यक्त केले. चर्चासत्रासाठी महाविद्यालयाचे उपप्राचार्य मा. डॉ. चुडामण पगारे (कार्याध्यक्ष, मसाप पुणे, धुळे शाखा) आणि प्रा. व्ही. एस. पवार यांचे मार्गदर्शन लाभले. सूत्रसचालन प्रा. डॉ. वर्षा पाटील आणि प्रा. भाग्यश्री पाटील यांनी केले परिसंवादाचे सूत्रसंचालन समन्वयक प्रा. डॉ. योगिता पाटील यानी केले.

संयोजन समिती सदस्य प्रा. डॉ. प्रविणसिंग गिरासे, प्रा. पंडित गायकवाड, प्रा एस. एच खलाणे, प्रा. डॉ. मोरेश्वर नेरकर, प्रा. डी. के. पाटील, प्रा डॉ. अमोल पाटील, प्रा. प्रियंका निकुंभ, प्रा. अर्चना पाटील, प्रा. अश्विनी पाटील, प्रा. पूनम देवरे, प्रा गितांजली बागल, प्रा. राहुल पाटील, प्रा. मनोज बच्छाव, प्रा. विशाल बोरसे, योगेश्वर पाटील, प्रा. डॉ.सुरेंद्र मोरे यांनी यशस्वितेसाठी मेहनत घेतली. शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनेही



अनुक्रमणिका






सहकार्य लाभले. मसाप, धुळे शाखेने प्रा. डॉ. सजीव गिरासे, प्रा. डॉ. वाल्मिक आढावे, डॉ. सुनिल पवार, प्रा. सदाशिव सूर्यवंशी , सौ. सुमन महाले, डॉ. पापालाल पवार, प्रा. रमेश राठोड, डॉ. सविता बहाळकर यांचे कार्यक्रमासाठी सहकार्य लाभले.

**२) ऑगस्ट २०१९–** झुलाल भिलाजीराव पाटील महाविद्यालयात म. सा. प., धुळे जिल्हा शाखा आणि महाविद्यालयातील साहित्य सृजन मंडळातर्फे अण्णाभाऊ साठे जन्मशताब्दीनिमित्त निबंध स्पर्धेचे आयोजन करण्यात आले.

सदर स्पर्धेच्या निबधांचे परीक्षण प्रा. भाग्यश्री पाटील आणि प्रा डॉ. सोमेश्वर नेरकर यांनी केले. मसाप, पुणे-धुळे जिल्हा प्रतिनिधी प्रा.डॉ. शशिकला पवार आणि कार्यक्रमाच्या संयोजिका प्रा. डॉ. योगिता पाटील (मराठी विभाग प्रमुख) यांचे मार्गदर्शन लाभले.

**३) सप्टेंबर २०१९–** झुलाल भिलाजीराव पाटील महाविद्यालय, धुळे (सामाजिकशास्त्र मंडळ) व महाराष्ट्र साहित्य परिषद, धुळे जिल्हा शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने लो टिळक यांच्या स्मृतिशताब्दी निमित्त महाविद्यालयात प्रा. डॉ. सर्जेराव आस्कर यांचे 'लो. टिळक यांच्या विचारांची समकालीनता' या विषयावर व्याख्यान केले होते. प्रमुख पाहुणे म्हणून महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. पी. एन. पवार उपस्थित होते. या कार्यक्रमाचा अध्यक्षीय समारोप प्रा. उषा पाटील (अध्यक्ष, मसाप, धुळे शाखा) यांनी केला. प्रास्ताविक डॉ शशिकला पवार यांनी केले. सूत्रसंचालन डॉ. सुरेंद्र मोरे यांनी केले. कार्यक्रमाच्या संयोजनास कार्याध्यक्ष डॉ. चुडामण पगारे व उपप्राचार्य डॉ. विद्या पाटील यांचे सहकार्य लाभले.

## सोपान नगर शाखा (सासवड)

वाल्हे ता. पुरंदर जि पुणे येथील महर्षी वाल्मिकी विद्यालय वाल्हे येथे महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे शाखा सोपाननगर (सासवड) यांच्यावतीने निबध स्पर्धा आयोजित करण्यात आली. या स्पर्धेत एकूण दोनशे विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला. या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्राचार्य अंकुश साळुंके होते. या वेळी गुणवंत विद्यार्थ्यांना पारितोषिक वितरण करण्यात आले. या वेळी सोपाननगर शाखेचे अध्यक्ष-डॉ. सुरेश कोडीतकर (सेवा निवृत्त) मा. सिद्राम भुजबळ, उपाध्यक्ष (से. नि. कृषिअधिकारी, उपसंचालक) प्रा. पांडुरंग शिरवळकर, कार्याध्यक्ष (से. नि. मुख्याध्यापक), मोहन साळवी, कोषाध्यक्ष (से.नि साहाय्यक विक्रीकर आयुक्त) यांनी सहभागी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले या वेळी संस्थेचे पर्यवेक्षक बाबासाहेब कुंभार, आम्रपाली गडवे, राजेंद्र डोंगरे इत्यादी उपस्थित होते

२) भुलेश्वर विद्यालय माळशिरस ता. पुरंदर जि पुणे येथे महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे शाखा सोपाननगर यांच्या मार्फत डिसेंबर २०१८ मध्ये निबंध स्पर्धा आयोजित करण्यात आली होती. या कार्यक्रमासाठी शिक्षण संस्थेचे अध्यक्ष बाळ तात्या यादव, उपसरपंच माउली यादव, ज्येष्ठ मार्गदर्शक बबन भाऊ यादव, तंटा मुक्तीचे अध्यक्ष- गायकवाड हे उपस्थित होते. याच कार्यक्रमात इ. दहावीच्या सर्व विद्यार्थ्यांना माजी सनदी अधिकारी संभाजी झेंडे यांच्याकडून प्रश्न संच देण्यात आला. विद्यालयाचे मुख्याध्यापक रामदास शिंदे व इतर सर्व शिक्षकानी लेखन स्पर्धेच्या नियोजनासाठी विशेष असे परिश्रम घेतले

## दामाजीनगर शाखा (जि. सोलापूर)

**१) १० ऑगस्ट २०१९–** अ. भा. वारकरी मंडळाच्या मंगळवेढा शहर अध्यक्षपदी शाखेचे सदस्य ज्ञानेश्वर भगरे यांची निवड झाल्याबद्दल त्यांचा सत्कार प्रा. शिवाजीराव काळुंगे यांच्या हस्ते करण्यात आला. अध्यक्षस्थानी म. सा. प. प्रा. विश्वनाथ ढेरे होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. राजेंद्र जाधव यांनी केले.

**२) १७ ऑगस्ट २०१९–** म.सा प. दामाजीनगर शाखेचे उपाध्यक्ष प्रा. विश्वनाथ ढेरे व कार्यकारणी सदस्या सौ. सुषमा सुतार यांना मनोरमा परिवाराचा आदर्श शिक्षक व आदर्श साहित्य सेवा पुरस्कार मिळाल्याबद्दल त्यांचा सत्कार शाखाध्यक्ष प्रकाश जडे यांच्या हस्ते करण्यात आला.

**३) २० ऑगस्ट २०१९–** कोणत्याही संस्थेच्या कामाचे गमक बुजुर्गांचा अनुभव व सळसळत्या तारुण्याचा उत्साह यांच्या मिलाफात असते. काटेकोर नियोजनाचे पाठबळ असेल, तर संस्थेचे उपक्रम नेहमीच यशस्वी होतात, असे विचार कवी श्रीकांत मोरे यांनी शाखा भेटीत व्यक्त केले.

**४. ९ सप्टेंबर १९ सप्टेंबर २०१९ –** शाखेच्यावतीने गणेशोत्सवात विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले. **९ सप्टें.** रोजी सौ. सुषमा सुतार व सौ. रेश्मा गुंगे यांचे कथाकथन झाले.**१० सप्ट.** सुख ही सापेक्ष कल्पना, तर समाधान हे निरीक्षतेतून साकारते. मन व बुद्धी यांच्या निरामय प्रकटीकरणासाठी ज्ञानाचे रूपातर प्रज्ञेत करावे लागेल. प्रज्ञावंत माणसेच प्रतिभावंत ठरतात, असे विचार प्रा. विश्वनाथ ढेरे यांनी व्याख्यानात मांडले. अध्यक्षस्थानी शाखाध्यक्ष प्रकाश जडे होते. सौ. दया वाकडे यांनी सूत्रसंचालन केले, तर लहू ढगे यानी आभार मानले. **११ सप्टें.** डॉ शरद शिर्के हॉस्पिटलच्या सौजन्याने महिला स्वास्थ्य शिबीर झाले. शिबिराचे उद्घाटन सौ. दया वाकडे व सौ. रेश्मा गुंगे यांच्या हस्ते करण्यात आले.

**१९ सप्टें.** सुरसंगम ग्रुपच्या मराठी गाण्याचा ट्रॅक शो झाला. **१४ सप्टें.** हिंदी भाषा राष्ट्रीय एकात्मता दृढ करते. ही भारताच्या विविधतेतला दुवा आहे. तिच्याकडे प्रतिस्पर्धी भाषा म्हणून पाहू नका, असे मत कवयित्री सौ. संगीता मासाळ यांनी हिंदी दिनी बोलताना व्यक्त केले. या वेळी आयोजित कवी संमेलनात रवी सोनार, राकेश गायकवाड, हिना शेख, सौ. सुषमा सुतार, विश्रांती ढावरे, गोरक्ष जाधव, लक्ष्मी शेजाळ, सौ. रेश्मा गुंगे, सौरभ पाटील, सौ. दया वाकडे यांनी कविता सादर केल्या. सूत्रसंचालन गोरक्ष जाधव यांनी केले. **१७ सप्टें.:** मराठी चित्रपट अभिनेते कमलाकर सातपुते यांनी शाखेस भेट देऊन उपक्रमाची माहिती घेतली.**२७ सप्टें.:** संतांची भूमी असलेल्या मंगळवेढे येथील संतांच्या वाङ्मयाची ओळख महाराष्ट्राला करून देण्यासाठी दामाजीनगर शाखेने पुढाकार घ्यावा, असे आग्रही प्रतिपादन लेखिका सुशिला सकपाळ यांनी शाखा भेटीत केले.

**८. १० ते १४ ऑक्टोबर २०१९ :** वाचक प्रेरणा दिनाच्या निमित्ताने शाखेच्या सभासद कार्यकर्त्यांनी परिसरातील वाचन चळवळीचा आढावा घेणारे सर्वेक्षण-अक्षरनामा या शीर्षकाने केली. वाचक चळवळीची दिशा व दशा स्पष्ट करणारा अहवाल स्थानिक वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यात आला.

**१४ ऑक्टो.:** वाचक प्रेरणा दिनानिमित्त मराठीतच स्वाक्षरी करू या! ही मोहीम सुरू केली. **१५ ऑक्टो. :** कवयित्री प्रा. डॉ. स्वाती शिंदे-पवार यांनी म. सा.प कार्यालयास भेट दिली. या वेळी त्यांनी ग्रामीण प्रतिभावंताना हेरून त्यांच्यावर पैलू पाडण्याचे मोठे काम ही शाखा करत असल्याचे गौरवोद्गार काढले. **४ नोव्हें.:** प्रेरणा प्रतिष्ठानच्या सहकार्याने देण्यात येणाऱ्या विविध वाचक पुरस्कारांचे वितरण शिक्षक आमदार दत्तात्रय सावंत यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी म. सा. प. पुणे चे विभागीय सचिव कल्याण शिंदे होते. यंदाचा बहुश्रुत वाचक पुरस्कार, श्री. राहुल सुभाष शहा यांना, तर वाचनप्रेमी पुरस्कार, श्री. दिगंबर यादव व डॉ. शरद शिर्के यांना देण्यात आला. या वेळी शाखेच्या नियोजित ग्रंथालयास डॉ. शरद शिर्के यांनी १० हजार रुपये, तर सौ. प्रफुल्लता स्वामी यांनी ३ हजार रुपयांची देणगी दिली.

१२. ९ नोव्हें. : दिल्ली येथे झालेल्या आंतरराष्ट्रीय हिंदी अधिवेशनासाठी शाखेच्या कार्यकारणीचे सदस्य कवी गोरक्ष जाधव यांची निवड झाल्याबद्दल



अनुक्रमणिका

त्यांचा सत्कार करण्यात आला.

१३. १४ नोव्हें.: स्व-भावानुसार स्वभाव बनतो! मनावरचा ताण सम्यक विश्लेषण करुन कमी करावा, असे विचार लोणावळा येथील मन:शक्ती केंद्राचे डी.के. सूर्यवंशी यांनी शाखेने आयोजित केलेल्या उद्बोधन वर्गात व्यक्त केले. अध्यक्षस्थानी डॉ. शरद शिर्के होते. सूत्रसंचालन प्रकाश जडे यांनी केले.

१४. २९ नोव्हें. : शाखेचे अध्यक्ष कवी प्रकाश जडे याचा सत्कार शाखेच्यावतीने कविवर्य नारायण सुमंत यांच्या हस्ते करण्यात आला. अध्यक्षस्थानी माजी प्राचार्य बी.टी. पाटील होते. म.सा.प. पुणेचे विभागीय सचिव कल्याण शिंदे यांची प्रमुख उपस्थिती होती. या वेळी प्रकाशपर्व या गौरव पुस्तिकेचे प्रकाशन करण्यात आले. नंतर झालेल्या कविसंमेलनात गोरक्ष जाधव, रवी सोनार, सचिन कुलकर्णी, सुषमा सुतार, प्रा. दत्ता सरगर, संगीता मासाळ यांचे कविता वाचन झाले. दिगंबर भगरे, भाऊ उन्हाळे, लहू ढगे, सुदर्शन फुगारे, नवनाथ सावळे, संतोष ढावरे, नितीन बाभळे यांनी बहारदार गीते सादर केली. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन सौ. दया वाकडे यांनी केले. अॅड. रमेश जोशी यांनी आभार मानले.

## सावेडी-उपनगर शाखा (जि. अहमदनगर)

**१) मसाप सावेडी उपनगर शाखेचा 'वारसा' या दिवाळी अंकाचा प्रकाशन सोहळा :** शाखेचे अध्यक्ष व प्रसिद्ध उद्योगपती नरेंद्र फिरोदिया यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या प्रकाशन समारंभास अहमदनगर शहराचे नवनिर्वाचित आमदार संग्राम जगताप, महापौर बाबासाहेब वाकळे, ज्येष्ठ साहित्यिक प्राचार्य अनिल सहस्रबुद्धे, कवी व पलूसचे उपजिल्हाधिकारी गणेश मरकड, प्रसिद्ध विनोदी कथाकथनकार डॉ. संजय कळमकर, ज्येष्ठ लेखिका मेधाताई काळे, मसाप सावेडी उपनगर शाखेचे प्रमुख कार्यवाह जयंत येलूलकर, डी. एम. कांबळे, नगरसेवक रविंद्र बारस्कर आदी मान्यवर या वेळी व्यासपीठावर उपस्थित होते. जयंत येलूलकर यांनी प्रास्ताविक केले. शारदा होशिंग यांनी सूत्रसंचालन केले. सदानंद भणगे यांनी आभार मानले. कार्यक्रमाच्या यशस्वितेसाठी सुरेश चव्हाण, नंदकिशोर आढाव, नंदा माडगे, दिपाली देऊतकर, विजय पिंपरकर, विनायक वराडे, तुषार बुगे, सुदर्शन कुलकर्णी, तेजस आतितकर आदींनी परिश्रम घेतले.

२) मराठी राजभाषा दिनानिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा सावेडी उपनगर व शांतीकुमारजी फिरोदिया मेमोरियल फाऊंडेशन आयोजित अहमदनगर येथे प्रथमच संपन्न झालेले विद्यार्थी साहित्य संमेलन हजारो विद्यार्थ्यांच्या उत्स्फूर्त सहभागाने रंगतदार झाले. संमेलनाध्यक्ष साहित्य अकादमी विजेते बाल साहित्यकार श्री. ल. म. कडू स्वागताध्यक्ष म. सा. प. च्या सावेडी उपनगर शाखेचे अध्यक्ष श्री. नरेंद्र फिरोदिया, महापौर श्री. बाळासाहेब वाकळे, जिल्हा पोलीस उपअधीक्षक श्री. संदीप मिटके, सौ शीतल जगताप, ज्येष्ठ साहित्यिक डॉ. संजय कळमकर, प्रा. श्री शशिकांत शिंदे, प्रशासनाधिकारी सुभाष पवार हे मान्यवर प्रमुख पाहुणे उपस्थित होते. जयंत येलुलकर प्रमुख कार्यवाह तथा संयोजक, म. सा. प. सावेडी उपनगर शाखा, अहमदनगर

## येवला शाखा (जि. नाशिक)

१) माहे सप्टेंबर आणि ऑक्टोबर २०१८ या महिन्यात येवले तालुक्यातील सर्व शाळांमध्ये काव्य स्पर्धा आणि अभिनय स्पर्धांचे आयोजन करण्यात आले होते. या उपक्रमात ९० शाळांनी सहभाग नोंदवला असून ४९८ विद्यार्थ्यांनी स्पर्धेत भाग घेतला होता. या उपक्रमात आम्ही जिल्हापरिषदेच्या शाळांना सहभागी करून घेण्याच्या उद्देशाने स्पर्धा प्रथम पंचायत समितीच्या शिक्षण विभागाच्या मदतीने तालुक्यातील १६ केंद्रांवर घेऊन त्या केंद्रात प्रथम क्रमांकाच्या विद्यार्थ्याला सन्मान चिन्ह तसेच द्वितीय, आणि तृतीय क्रमांकाच्या स्पर्धकांना प्रमाणपत्राने सन्मानित केले. या समारंभास अभिनेत्री गार्गी फुले आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह मा. श्री. प्रकाश पायगुडे तसेच कवी सुरेशकुमार वैसळकर यांचे प्रमुख उपस्थितीत आणि त्यांचे हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आले आहे. या समारंभास महाराष्ट्र साहित्य परिषदेचे नाशिक जिल्हा प्रतिनिधी श्री. नितीन ठाकरे आणि कवी प्रकाश होळकर हे उपस्थित होते.

**२. सहवेदना सभेचे आयोजन :** ज्येष्ठ समीक्षक डॉ. म.सु. पाटील आणि सुप्रसिद्ध लेखक आणि नाटककार गिरीश कार्नाड याच्या निधनामुळे त्यांचे साहित्य क्षेत्रातील योगदान याची माहिती नव्या पिढीला व्हावी म्हणून सहवेदना सभेचे आयोजन येवला शाखेच्या वतीने आयोजित केले होते. या सभेकरिता प्रमुख अतिथी मराठी साहित्यातील समीक्षक डॉ. एकनाथ पगार, प्रा. रणजित परदेशी, कवी खलील मोमीन हे होते. अध्यक्ष स्थानी प्रा. गो. तु. पाटील होते.

**३. नवोदित कवींचे काव्यवाचन आणि नाट्य अभिवाचनाचे आयोजन:** येवला शाखेच्या वतीने तालुक्यातून नव्याने सहभागी झालेल्या नवोदित कवींच्या कविताचे काव्यवाचन आणि नाटकाचे अभिवाचन याचे आयोजित करण्यात आले होते. त्याचप्रमाणे कोजागिरीच्या निमित्ताने कविसंमेलनाचे आयोजन करण्यात आले होते. या कविसंमेलनाचे अध्यक्षस्थानी कवी लक्ष्मण बारहाते होते. वरीलप्रमाणे कार्यक्रमाचे आयोजन येवला शाखेने केले आहे

**४. प्रस्तावित काव्य स्पर्धा :** सन २०१९ ची तालुकास्तरीय काव्य स्पर्धा दि. २० डिसेंबर २०१९ रोजी आयोजित केली गेली. मागील वर्षीप्रमाणे अटलबिहारी वाजपेयी काव्य करंडक, तसेच कवी कुसुमाग्रज पुरस्कार आणि कवी बाबुराव बागूल काव्य पुरस्कार यावर्षीही प्रदान करण्यात आले

## नांदगाव शाखा (जि. नाशिक)

**१) नांदगाव मसाप शाखेतर्फे मराठी भाषादिन साजरा-** नांदगाव येथील महाराष्ट्र साहित्य परिषद शाखेतर्फे कविवर्य ज्ञानपीठ पुरस्कार विजेते कुसुमाग्रज तथा वि. वा. शिरवाडकर यांचा जन्मदिवस आणि मराठी भाषा दिन उत्साहात साजरा झाला. सर्जेराव दादा हायस्कूल जामदरीचे मुख्याध्यापक अशोक कदम यांनी वि. वा. शिरवाडकर यांच्या प्रतिमेचे पूजन केले. या वेळी मसापचे अध्यक्ष प्रा. सुरेश नारायणे, उपाध्यक्ष सचिन साळवे, कार्यवाह कवी काशिनाथ गवळी, सहकार्यवाह रमेश घोडके, खजिनदार सौ. विद्या देवरे, सहखजिनदार किरण मोरे व सदस्यांनी कुसुमाग्रज याच्या प्रतिमेचे पूजन केले. सूत्रसचालन कवी काशिनाथ गवळी यांनी केले.

## मावळ शाखा (जि. पुणे)

**१) ५ सप्टेंबर २०१९:** शिवणे येथील स्वामी विवेकानंद प्रबोधिनी व मावळ शाखेच्या वतीने शिक्षक दिनाचे आयोजन करण्यात आले होते. कार्याध्यक्ष दीपक बिचे यांनी डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या जीवनचरित्रावर विद्यार्थ्यांना व शिक्षकांना मार्गदर्शन केले. याप्रसंगी मनोज ढमाले, उद्योजक रवींद्र घारे, प्रा. योगेश घोडके व एकनाथ टिळे उपस्थित होते.

**२) १५ ऑक्टोबर २०१९ :** साहित्य कट्टा व म. सा. परिषदेच्यावतीने वाचना प्रेरणा दिन साजरा करण्यात आला. श्रीकृष्ण मुळे यांनी वाचनाची महती सांगून मोबाइलच्या वापरामुळे एकूणच वाचनाची आवड, पुस्तकाची जवळीक कमी झाल्याचे नमूद केले. या वेळी श्रीकृष्ण पुरंदरे, कवयित्री मीनाक्षी भरड, सुधाकर देशमुख व उर्मिला छाजेड उपस्थित होत्या.

**३) २९ नोव्हे २०१९ :** स्थानिक आमदाराचा सत्कार: विधानसदस्य सुनील

शेळके यांचा शाखेच्या वतीने सत्कार करण्यात आला. त्या वेळी मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळावा यासाठीच्या निवेदन देण्यात आले. या प्रसंगी कार्याध्यक्ष दीपक विचे, कार्यवाह नंदकिशोर नागुलपिल्ले उपस्थित होते.

४) २२ डिसेंबर २०१९ : महाराष्ट्र साहित्य परिषद व शेजार ज्येष्ठ नागरिक संघ यांच्या संयुक्त सहकार्याने लेखक आपल्या भेटीला या उपक्रमांतर्गत श्रीकृष्ण पुरंदरे व दीपक विचे यांनी लेखक प्रभाकर ओव्हाळ यांची मुलाखत घेतली. 'जीवनातील संघर्ष हा लेखनाची ऊर्जा व प्रेरणा देत असतो.' असे ओव्हाळ यांनी प्रतिपादन केले.

५) ३ जानेवारी २०२० : प्रा. रामकृष्ण मोरे महाविद्यालयात 'लेखक आपल्या भेटीला' प्रा. दीपक विचे लिखित पुस्तकावर चर्चा आयोजित करण्यात आली. वाचनाचे महत्त्व या विषयावर लेखकांनी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले. विद्यार्थ्यांना साहित्यकृतींविषयी प्रश्न विचारले. प्राचार्य डॉ. अभय खंडागळे, ग्रंथपाल जाधव सुहास उपस्थित होते

६) २९ जानेवारी २०२० : न्यू इंग्लिश स्कूल आंबोली जुन्नर येथे शाखेच्या वतीने मार्गदर्शन करण्यात आले त्याप्रसंगी कवी शिवाजी चाळक, डॉ. सुधाकर न्हाळदे उपस्थित होते. जीवनात यश मिळवण्याकरिता आत्मविश्वास व योग्य परिश्रमाची गरज आहे, असे प्रतिपादन केले.

७) २७ फेब्रुवारी २०२० : पुस्तक प्रकाशन : श्रीकृष्ण पुरंदरे लिखित इमारत व दोन चार ओळी गंमतीच्या. कवी व गझलकार म. भा. चव्हाण, ग्रामीण साहित्यकार बबन पोतदार, सुरेश साखवळकर, सुरेश अत्रे, दीपक विचे उपस्थित होते.

८) २७ फेब्रुवारी २०२० : मराठी राजभाषा दिन : साहित्यिक बबन पोतदार यांचे 'मराठी भाषेची आजची स्थिती' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. त्या वेळी ते म्हणाले, 'आजच्या आधुनिक काळात मराठी भाषेवर होणारे आक्रमण थांबविण्याची गरज आहे. याकरिता सर्वांनी प्रयत्न केले पाहिजे, या वेळी सतिश साठे, डॉ. प्रमोद बोराडे, अरविंद करंदीकर, ओंकार वर्तले व नंदकिशोर नागुलपिल्ले उपस्थित होते.

## उल्हासनगर शाखा (जि. ठाणे)

**१) मराठी राजभाषा दिन : २७ फेब्रु २०२०**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या उल्हासनगर शाखे द्वारा मराठी 'राजभाषा दिन' मोठ्या उत्साहात साजरा' उल्हासनगर या बहुसंख्य सिंधी भाषिक बाधव असलेल्या शहरात 'महाराष्ट्र साहित्य परिषद' मराठी भाषेचा प्रचार आणि प्रसाराचे कार्य जिद्दीने गेली अनेक वर्षे करीत आहे.

महाराष्ट्राचे 'लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांच्या जन्मशताब्दी वर्षाचे औचित्य साधत' कविश्रेष्ठ कुसुमाग्रजांच्या जन्मदिनी अर्थात 'मराठी राजभाषा' दिवस साजरा करण्यासाठी कोल्हापूरहून प्राध्यापक श्री प्रकाश नाईक (अण्णाभाऊ साठेंच्या साहित्याचे गाढे अभ्यासक) यांनी कविवर्य कुसुमाग्रज, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे, स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या साहित्याची ओळख करून दिली.

या प्रसंगी विकास मंदिर शाळेच्या शिक्षिका सौ. पुष्पा पाटील, शिल्पा पाटील, अस्मिता वाढविंदे यांनी तसच पाच विद्यार्थ्यांनी फकिरा कादंबरीतील घटनाचे सादरीकरण करून फकिरा प्रेक्षकांच्या नजरे समोर उभा केला.

प्रा. प्रकाश माळी (कार्याध्यक्ष) यांनी प्रास्ताविकातून उल्हासनगर शाखेची वाटचाल विशद केली, तर मा. प्रा. व्हि. व्हि. पाटील सर(अध्यक्ष) यांनी अध्यक्षीय भाषणात शाखेचा भावी संकल्प व्यक्त केला. कार्यक्रमात प्रारंभीच जिजाऊ सावंत, उषा वानखेडे, कुंदा झोपे यांनी कुसुमाग्रजांचे साहित्य परिचय, भावगीत कविता सादर केले. साहित्यरत्न अण्णाभाऊ साठे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त घेण्यात आलेल्या त्यांच्या कादंबरीवर आधारित प्रसंग सादरीकरण आंतरशालेय स्पर्धेत पुरस्कार प्राप्त विद्यार्थ्यांना पारितोषिक देऊन गौरविण्यात आले.

सदर कार्यक्रमाचे प्रायोजकत्व श्रीमती. मनाबाई विठ्ठल पाटील दयाळीबाळ ट्रस्ट तथा विकास मंदिर या शाळेने स्वीकारले होते. सदर कार्यक्रमाचे सूत्र संचालन व आभार प्रदर्शन शाखेचे प्रमुख कार्यवाह श्री. प्रल्हाद कोलते यांनी केले. पसायदानाने कार्यक्रमाची सांगता झाली.

## चोपडा शाखा (जि. जळगाव)

**१. दि. २५फेब्रुवारी २०२० : मसाप चोपडा तर्फे 'प्रियजन स्मृती व्याख्यानमाला–** महाराष्ट्र साहित्य परिषद पुणेच्या चोपडा शाखेतर्फे मराठी भाषा समृद्ध व संपन्न करण्यासाठी तसेच चोपडेकर रसिकांची सांस्कृतिक श्रीमंती वाढविण्याचा एक भाग म्हणून प्रियजन स्मृती व्याख्यानमालेचे आयोजन करण्यात आले होते. दोंडाईचा येथील तहसीलदार व अहिराणी भाषेचे अभ्यासक सुदाम महाजन यांनी पहिले पुष्प गुंफले.

'प्रियजन स्मृती व्याख्यानमाले'चे पहिले पुष्प गुंफताना 'अहिराणी लोकवाङ्मयातील गोडवा' या विषयावर ते बोलत होते. याप्रसंगी मंचावर तहसीलदार अनिल गावित, मसाप विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष घनश्याम अग्रवाल, अध्यक्ष अशोक नीलकंठ सोनवणे, कार्याध्यक्ष विलास पं. पाटील, डॉ. विकास हरताळकर, रमेश शिंदे, पत्रकार चंद्रकांत पाटील, श्रीकांत नेवे, ललित जैन यांच्यासह व्याख्यानमालेच्या पहिल्या पुष्पाचे प्रायोजक अॅड. डी. पी. पाटील, दिपक लोहाणा, राजेश पाटील हे होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन राधेश्याम पाटील यांनी तर वक्त्यांचा परिचय पंकज शिंदे यांनी व आभार प्रदर्शन एस. बी. पाटील यांनी केले.

**२) दि. २६ फेब्रुवारी २०२०–** अहमदनगर येथील प्रसिद्ध व्याख्याते डॉ. संजय कळमकर यांनी दुसरे पुष्प गुंफले. यावेळी मंचावर मसाप शाखेचे अध्यक्ष अशोक सोनवणे, विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष घनःशाम अग्रवाल, प्रमुख अतिथी नगराध्यक्षा सौ. मनीषा चौधरी, माजी जि. प. सदस्या सौ. इंदिराताई पाटील, डॉ. गायत्री पाटील, प्राचार्य डी. ए. सूर्यवंशी, राजाराम पाटील, पत्रकार सुनील पाटील, राकेश पाटील, मसापचे कार्याध्यक्ष विलास पं. पाटील, रमेश शिंदे हे उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन योगिता पाटील यांनी, तर वक्त्यांचा परिचय जयश्री चव्हाण यांनी व आभार प्रदर्शन कुसुम पाटील यांनी केले.

**३. दि. २७ फेब्रुवारी २०२०–** मराठी राजभाषा गौरव दिनाचे औचित्य साधून तसेच आधुनिक वाल्मिकी ग. दि. माडगूळकर, संगीतकार सुधीर फडके, महाराष्ट्राचे लाडके व्यक्तिमत्त्व पु. ल. देशपांडे, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांच्या जन्मशताब्दी वर्षाचे औचित्य साधत शाखेच्या सदस्यांनी शब्दसुरांची मैफिल सादर केली या मैफिलीत गाजलेल्या कवितांचे वाचन, गायन, काही किस्से, प्रसंग यांची खुमासदार गुंफण करण्यात आली होती. गौरव महाले, संजय बारी, योगिता पाटील, विलास पं. पाटील यांनी कवितांचे वाचन करत काही किस्से सांगत उपस्थितांना रिझवले, तर शाखेचे अध्यक्ष कवी अशोक सोनवणे यांनी स्वरचित कविता सादर केल्या. मनोज चित्रकथी, योगेश चौधरी, विवेक बाविस्कर, प्रदीप कोळी, ए. पी. पाटील यांनी गीते सादर केली. त्यांना नरेंद्र भावे, विवेक बाविस्कर, बी. यु. जाधव, विजय पालीवाल, स्वप्नील ठाकूर, सोनार यांनी साथ संगत केली. मैफिलीचे संचालन संजय बारी, योगेश चौधरी यांनी केले.

यावेळी मंचावर मसाप शाखेचे अध्यक्ष अशोक सोनवणे, प्रमुख अतिथी डॉ. प्रेमचंद्र महाजन, डॉ. महेंद्र जयस्वाल, डॉ. मनोज पाटील, कार्यक्रमाचे प्रायोजक सौ. राजश्री सोनवणे, महेश शर्मा, डॉ. राहूल पाटील यांच्यासह पत्रकार तुषार सूर्यवंशी हे उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन

तुषार लोहार यांनी, तर आभार प्रदर्शन संजय सोनवणे यांनी केले.

४. दि. २८ फेब्रुवारी २०२०- प्रियजन स्मृती व्याख्यानमालेचे चौथे पुष्प गुंफताना 'जगणं सुंदर आहे' या विषयावर प्रा. मिलिंद जोशी यांनी व्याख्यान दिले होते. यावेळी मंचावर चोपडा मसाप शाखेचे अध्यक्ष कवी अशोक सोनवणे, प्रमुख अतिथी म्हणून काँग्रेसचे जिल्हा अध्यक्ष अॅड. संदिप सुरेश पाटील, राजाराम पाटील, माधुरी मयूर, पंकज बोराले, तेजस कदम, डॉ. नीता हरताळकर, पत्रकार विश्वास वाडे हे उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन गौरव महाले यांनी, तर वक्त्यांचा परिचय विलास पं. पाटील यांनी व आभार प्रदर्शन योगेश चौधरी यांनी केले.

## चाळकवाडी-जुन्नर

१)१५ डिसेंबर २०१९ रोजी साहित्यिक सहवास हा कार्यक्रम आयोजित केला होता. यावेळी अध्यक्ष जालिंदरमामा डोंगरे, प्रमुख पाहुणे डॉ. देविदास इंदापवार(नागपूर), शिवाजी चाळक हे उपस्थित होते. सूत्रसंचालन : बाबासाहेब जाधव यांनी, स्वागत रघुनाथ काकडे व आभार रवींद्र काशिद यांनी मानले. 'माझी साहित्यिक वाटचाल' अंतर्गत वक्ते : डॉ. देविदास इंदापवार, नागपूर... 'पुस्तकावर बोलू चला' अंतर्गत 'यशोदीप पब्लिकेशन'ने प्रकाशित केलेल्या 'कवी संदीप वाघोले' यांच्या 'ती'ची स्पंदने' या कविता संग्रहावर प्रा. जयसिंग गाडेकर यांनी भाष्य केले तर 'सकाळ प्रकाशन' ने प्रकाशित केलेल्या 'सुधीर फाटककर' यांच्या 'अपोलो ११' या पुस्तकावर प्रशांत शेटे यांनी भाष्य केले

२) कविसंमेलन- त्यानंतर जालिंदरमामा डोंगरे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कविसंमेलनात सर्वश्री पारु कडाळे, वसीम सय्यद, बाबासाहेब जाधव, रणजित पवार, बासू सुरवसे, प्रा. जयसिंग गाडेकर, स्मिता विटे, मंगल लेंडे, प्रा. वैशाली सावंत, अर्चना नेरकर, दीपक सोनवणे, फकीर आतार, डॉ. गणेश सोनवणे, डॉ. देविदास इंदापवार, संदीप वाघोले, नवदिप आहेर, रवींद्र काशीद, शिवाजी चाळक, सुनील जगताप, आदींनी सहभाग घेतला.हा कार्यक्रम हा शिवांजली साहित्यपीठाच्या सहयोगाने संपन्न झाला.

३) मराठी भाषा संवर्धन पंधरवडा : ९ जानेवारी २०२० रोजी 'मराठी भाषेचा उगम आणि वाटचाल' हो कार्यक्रम संपन्न झाला. अध्यक्ष शंकरराव घोरसे, वक्ते राजेश वैरागडे (नागपूर) प्रमुख पाहुणे सुनील वाडे, शिवाजी चाळक हे उपस्थित होते. प्रास्ताविक भानुदास चासकर, सूत्रसंचालन बाबासाहेब जाधव तर आभार सुनंदा गोपाळे यांनी मानले.

४) कविसंमेलन : या व्याख्यानानंतर शिवांजली विद्यानिकेतन, चाळकवाडीमधील ८ विद्यार्थी व विद्यार्थिनींनी मराठी भाषेविषयक स्वतःच्या व इतर नामांकित कवींच्या कविता सादर केल्या. सदरचा कार्यक्रम हा शिवांजली साहित्यपीठाच्या सहयोगाने संपन्न झाला.

५) साहित्यिक सहवास : हा कार्यक्रम २५ जानेवारी २०२० रोजी अध्यक्ष एकनाथ रावळ, प्रमुख पाहुणे विश्वास काळे, अशोक खरात, संतोष गाढवे, शिवाजी चाळक यांच्या उपस्थितीत संपन्न झाला. सूत्रसंचलन संदीप वाघोले, आभार जालिंदरमामा डोंगरे, 'माझी साहित्यिक वाटचाल' अंतर्गत वक्ते इंजि. नंदकुमार पाडेकर, मुंबई 'पुस्तकावर बोलू चला' अंतर्गत...कवयित्री मीनाक्षी वाकचौरे यांच्या 'माहेर' या कवितासंग्रहावर संतू जेडगुले व इरफान शेख (चंद्रपूर) यांच्या 'माझ्यातील कवी मरत चाललाय' या कवितासंग्रहावर प्रा. डॉ. गणेश सोनवणे यांनी भाष्य केले.

६) कविसंमेलन- त्यानंतर एकनाथ रावळ यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कविसंमेलनात अर्जुन हाडवळे, आबा कांबळे, लक्ष्मण क्षीरसागर, भागाजी आवटे, भाऊ वाळुंज, संतोष गाढवे, दत्तात्रय वडगावकर, भोगाडे महाराज, प्रल्हाद शिंदे, फकीर आतार, नंदकुमार पाडेकर, प्रा. केशव धोंगडे, रवींद्र काशीद, वसीम सय्यद, मीनाक्षी वाकचौरे, बासू सुरवसे, सौ. पानसंद, प्रा. डॉ. गणेश सोनवणे, संदीप वाघोले, प्रा. जयसिंग गाडेकर, रणजित पवार, बाळासाहेब ताजवे, नवदीप आहेर, बाबासाहेब जाधव, दीपक सोनवणे, शिवाजी चाळक, सुनील जगताप आदींनी सहभाग घेतला.

या प्रसंगी सर्वश्री माधव लांडगे, संजय वाघ, भानुदास चासकर, बाळकृष्ण चाळक, शामसुंदर मालुंजकर, बडू सदामते, प्रा. संजय वाकचौरे, सुधीर फाटककर, सुरेखा फाटकटकर व अन्य ग्रामस्थ बहुसंख्येने उपस्थित होते. सदरचा कार्यक्रम शिवांजली साहित्यपीठाच्या सहयोगाने संपन्न झाला.

## शिरुर शाखा (जि. पुणे)

महाराष्ट्र साहित्य परिषद शिरूर व चांदमल ताराचंद बोरा महाविद्यालय आणि मराठी भाषा अभ्यास समिती याच्यावतीने मराठी राजभाषा गौरव दिन साजरा करण्यात आला.

या कार्यक्रमास संगीता झिजुरके, नंदकुमार निकम, डॉ. के. सी मोहिते, डॉ. बाळकृष्ण लळीत, महाराष्ट्र साहित्य परिषद शिरूर शाखेचे अध्यक्ष निलेश खाबिया, उपाध्यक्ष प्रा. सतीश धुमाळ, डॉ. राजभाऊ भैलुमे, प्रदीप बारवकर, मोनिब शेख, विजय ढमढेरे, रणकर्मी दीपक घारू, प्रवीण गायकवाड, माधुरी वाघ, चैतन्य वाघ, ग्रंथपाल मोरे आदी उपस्थित होते.

## वारजे शाखा (कोथरूड)

१)१७ जानेवारी २०१९ गुरुवार रोजी, वारजे-कोथरूड शाखेचा ८ वा वर्धापन दिन संपन्न झाला. त्या वेळी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कोषाध्यक्ष सुनीताराजे उपस्थित होत्या

२) वर्धापनदिनाच्या कार्यक्रमात सुप्रसिद्ध गायिका श्रीमती कीर्ती मराठे आणि सहकारी यांनी उपशास्त्रीय संगीतातील विविध प्रकारच्या गीतांचा सुश्राव्य कार्यक्रम सादर केला. त्यानंतर कल्पना शिरोडे यांनी 'वऱ्हाडी ठेवा' हा एकपात्री कार्यक्रमाचे उत्तम सादरीकरण केले. कार्यक्रमानंतर रसिकांनी रुचकर भोजनाचा आस्वाद घेतला.

३) २७ फेब्रुवारी २०१९ रोजी 'मराठी भाषादिन' निमित्त माधवी गोखले आणि सहकारी यांचा एक अभ्यासपूर्ण साहित्यिक कार्यक्रम झाला.

४) २८ मार्च २०१९ रोजी 'महिला दिन विशेष' कार्यक्रमात 'स्त्री एक अक्षर ओळख' हा कार्यक्रम, मृणाल धोंगडे, मंजुषा उकीडवे, राधिका पटवर्धन या कलाकारांनी उत्कृष्ट सादर केला.

५) १५ मे २०१९ रोजी वारजे-कोथरूड शाखेच्या सभासदांच्या 'विविध गुणदर्शन' ह्या वैविध्यपूर्ण कार्यक्रमाचा रसिकांनी आनंद घेतला

६) ३१ जुलै २०१९ रोजी 'पावसाची गाणी-कविता' आणि महाकवी कलिदासांच्या साहित्यावर आधारीत 'कविता-गाणी-गप्पा' अशा विविधरंगी कार्यक्रमाचा सभासदांनी आनंद घेतला. ह्यामध्ये शाखेच्या सभासदांचा सहभाग उल्लेखनीय ठरला.

७) १७ ऑक्टोबर२०१९ रोजी, कोजागिरी पौर्णिमेनिमित्त- कविता-किस्से, गोष्टी, संगीत, कथाकथन अशा बहुरंगी कार्यक्रमाचे यशस्वी व उत्तम सादरीकरण झाले. त्यानंतर उपस्थितांनी मसाला दुधाचा आस्वाद घेतला.

८) २१ नोव्हेंबर २०१९ गुरुवार रोजी, लोकमान्य टिळक स्मृतिशताब्दी वर्षानिमित्त म. सा. प. वारजे- कोथरूड शाखेने एक विशेष व्याख्यान आयोजित केले होते. सुप्रसिद्ध निवेदिका-व्याख्याती- निरूपणकार सौ. ऋचा थत्ते- (ऋचा पाणकर) यांनी लोकमान्य टिळक व स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी बंदिवासात केलेली साहित्य निर्मिती' या विषयावर आधारीत 'ती धन्य बंदीशाला' हे अतिशय समर्पक आणि अभ्यासपूर्ण व्याख्यान दिले.



अनुक्रमणिका




मराठी भाषा दिनानिमित्त मसापच्या विविध वाङ्मय पुरस्कारांचे वितरण प्रसिद्ध लेखक भारत सासणे यांच्या हस्ते करण्यात आले यावेळी उपस्थित मसापचे पदाधिकारी व पुरस्कार विजेते.



महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेच्या चोपडा (जळगाव) शाखेतर्फे तीन दिवसीय प्रियजन व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती. या व्याख्यानमालेला उपस्थित श्रोता वर्ग.

Maharashtra Sahitya Patrika Quarterly : March 2020
Registered with the Register of Newspaper for India under No 6398/57
Book Pkt. Periodical category. Publishing Date : 31 March 2020



प्रेषक ।
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०,
दूरभाष : ०२०-२४४७ ५९ ६३

अनुक्रमणिका